

उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७.
दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७

**विश्वस्त मंडळ : ओंकार ट्रस्ट**

**श्री. सु.भि.ढवळे**
अध्यक्ष
आर्किटेक्ट व इंजिनिअर
दूरध्वनी : २४२१७१०८

**श्री. म.वा.सरदेशपांडे**
उपाध्यक्ष
निवृत्त महाव्यवस्थापक
राष्ट्रीयकृत बँक
दूरध्वनी : २५४३ ३६०५

**श्रीमती रजनी काळे**
निवृत सरकारी कर्मचारी
दूरध्वनी : २७२० ७०७०

**सौ. ज्योति शेटे**
गृहिणी
दूरध्वनी : २४२१ १५६०

**श्री. स.द. देशपांडे**
निवृत्त शाखाधिकारी
राष्ट्रीयकृत बँक
दूरध्वनी : २४२२८३३६

**श्री. स.चं. भुजबळ**
लघु उद्योजक
दूरध्वनी : २४३३५५८४

**श्रीमती मालती निमोणकर**
समाजकार्य
दूरध्वनी : २६९५९७८७

**श्री. अशोक शिवले**
निवृत्त सहाय्यक
महाव्यवस्थापक, राष्ट्रीयकृत बँक
दूरध्वनी : ९४२२२०७७१४

**श्री. भा.वा. सातवळेकर**
निवृत्त मुख्य प्रबंधक, राष्ट्रीयकृत बँक
दूरध्वनी : २४२१ ००४७

॥ श्रीराम ॥

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी - दिनांक २६ जुलै १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे - सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे -

१) गुजरवाडी - निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२) मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर - मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर - बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर - गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नांवाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रक्कम रु.५०००/- असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था - १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर - पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे - कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ - ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा - पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा - पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे - चिंचवड १०) मानव्य संस्था - (संस्थापिका - कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. वेणूताई दांडेकर - ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपल घर (संस्थापक - श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी ''यांनी घडविला महाराष्ट्र'' या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक - श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक - डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य - डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख - ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे - श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण - श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे - श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्या -पारितोषिके देत आहे -

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/- ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/- ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावांने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले-मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन-पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/- खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले-मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वतः मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना परी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करुन घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नांवे अशी - श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.



ज्ञानोत्तम नरोत्तम असे देहोत्तम वरदोत्तम। मानवता उदारता लीनता जिथे त्रिवेणी संगम ।
तो ज्ञानदेव संत श्रेष्ठ महायोगी सर्वोत्तम । विश्वा एक जाणावा ॥

# ॥ श्री ज्ञानदेवांची भूपाळी ॥

ऊठ ज्ञानदेवा राजिवा जीवींच्या जीवा ।
तूंच आमुचा सखा सद्‌गुरू अक्षय सुख ठेवा ॥धृ॥

चैतन्याचा मूर्तिमंत तूं सोनसळा पुतळा ।
कैवल्याचा दिव्य कल्पतरू अवतरला भूतळा ।
श्री गीतेला तुझ्यामुळें ये अमृतमय गोडवा ॥१॥

अजानवृक्षातळीं बैसुनी प्रेमें आळवितो ।
सुवर्ण पिंपळ सळसळ करूनी साथ सुखें देतो ।
इंद्रायणिचे झुळझुळते जळ नित्य करी धावा ॥२॥

पांडुरंगही येथे आला सोडुनिया पंढरी ।
धन्य जाहली पृथ्वीवरती आळंदी नगरी ।
दुर्लभ असले भाग्य पाहुनी देव करिति हेवा ॥३॥

नामा एका तुकया चोखा सकल संत जमले ।
तुझ्या कीर्तनी भान हरपुनी रात्रंदिन रंगले ।
गजर ऐकुनी जाग्या झाल्या मिटलेल्या जाणिवा ॥४॥

ओवी ओवी दिसू लागली विष्णुरूप सांवळे ।
सहज प्रगटले तळिं लपलेलें परब्रह्म कोवळें ।
तुझ्या वाणीचा विलास घडवी साक्षात्कार नवा ॥५॥

गीतार्थानें विश्व कोंदलें ज्ञाननेत्र उघडला ।
सुरू जाहला उरीं निरंतर सौख्याचा सोहळा ।
आनंदाच्या महासागरीं पूर्ण बुडे चांदवा ॥६॥

तूंच माऊली, कृपासाऊली, तूंच एक सर्व ।
तुझ्याच पायीं विराम पावो जन्ममरणपर्व ।
तुळशीमाळा अहेव राहो, भक्तां वर द्यावा ॥७॥

मधुकर कुलकर्णी



उज्वल भवितव्यासाठी

## ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)
'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७.
टेलिफोन क्रमांक : ४२००४७
मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये
नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -
ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१
कलम ८०ग खाली आयकर सवलत क्रमांक :
पी एन् / १६५ / ०२० १९९३-९४ दिनांक १३-९-९३
१-४-९३ ते ३१-३-९६ पर्यंत

● विश्वस्त मंडळ ●
अध्यक्ष – श्री. सु. भि. ढवळे, आर्किटेक्ट / इंजिनियर
श्री. भा. बा. सातवळेकर, राष्ट्रीयकृत बँक अधिकारी (निवृत्त)
डॉ. (सौ.) शरयू अरुण घोले, एम्.डी. (गायनॉकॉलॉजी), मेडिकल प्रॅक्टीशनर
सौ. रजनी गो. काळे, निवृत्त सरकारी कर्मचारी
सौ. भारती शंकर, व्यावसायिक

● संस्थापक कार्यवाह ●
कै. सौ. वसुंधरा भा. सातवळेकर

● कार्यवाह ●
सौ. उज्वला काळे

● सहकार्यवाह ●
श्री. श्रीकांत काशीकर

● खजिनदार ●
श्री. गोपाळ काळे

● संस्कार वर्ग संचालक ●
कु. अश्विनी जेरे
कु. दिपा पाठारे
कु. स्मिता पाठारे
सौ. नियती फराटे
कु. गौरी भट
सौ. उज्वला भुस्कुटे
कु. राणी पोकर्णा
सौ. अनुराधा ढवळे
कु. आदिती काशीकर



## संपादकीय

ज्ञानीयांचा राजा, संत शिरोमणी, लेकुरवाळ्या विठाई माऊलीच्या लेकरांचे नेतृत्व करणारा ज्ञानदेव, मुक्ताईचा ज्ञानदादा, विश्वाच्या कल्याणाचे दान मागणारा निवृत्तीनाथांचा सत्‌शिष्य आणि अवघ्या मराठी मनाची माऊली असलेले ज्ञानदेव त्यांच्याचसाठी निर्मिलेले हे साहित्यपुष्प त्यांचे चरणी समर्पित करताना लाभणारा आनंद अवर्णनिय आहे.

स्वामी भीमानंद, बाबुमहाराज मानवतकर व दत्तमहाराज कविश्वर यांचा शुभाशिर्वाद लाभलेले आणि परमहंस स्वामी माधवनाथ यांच्या प्रेमळ स्पर्शाने पुलकित व सुगंधित झालेले हे साहित्यपुष्प वाचकांच्या हाती देणे हा दुग्धशर्करा योगच म्हणायला हवा.

माऊलीच्या जीवनाचा आणि वाङ्मयाचा सखोल अभ्यास केलेल्या विद्वानांनी आपल्या विचारधनानी कल्याणीच्या गोरस कुंभास ज्ञानामृताची अवीट गोडी आणली आहे. असा हा ओतप्रोत भरलेला ज्ञानामृताचा कलश वाचकांना तृप्त करेल यात शंका नाही.

आमच्या विनंतीला मान देऊन मोठमोठ्या नामवंत व्यक्तींनी आपले लेख देऊन आम्हाला उपकृत केले आहे. लेखकांचा सहभाग आणि त्या विषयावरील त्यांचा अधिकार लक्षात घेता लेखांची मांडणी कशी करावी असा एक संभ्रमच निर्माण झाला. तथापि भक्ती, ज्ञान आणि कर्म यांनी सुरवात करून त्याची समाप्ती पसायदानाने केली आहे.

चार वर्षापूर्वी पेरलेल्या बीजाचा आता नुसता अंकूर राहीला नसून त्याच्या रोपट्याने आता सुंदर आकार घेतला आहे. हे ट्रस्टच्या उज्वल वाटचाली-वरून वाचकांच्या सहज लक्षात येईल.

सढळ हाताने मदत करणाऱ्या देणगीदारांचे जाहीरातदारांचे आणि अंक काढणाऱ्यासाठी हस्ते, परहस्ते मदत करणाऱ्या सर्व हितचिंतकांचे तर आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत. कारण हाती घेतलेले हे व्रत त्यांच्याच सहकार्यामुळे पुढेही चालू राहीलच याची खात्री आहे.

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

**सौ. रजनी काळे**

---

ओंकार ट्रस्ट, १९९५ च्या 'श्रीज्ञानेश्वर महाराज कल्याणी विशेषांक'. संपादक सौ. रजनी गोपाळ काळे, ट्रस्टी यांनी गणेश प्रिंटर्स, पुणे ३० येथे छापून श्री. भालचंद्र वासुदेव सातवळेकर, ट्रस्टी, यांनी फेब्रुवारी १९९५ मध्ये 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७. येथे प्रकाशित केला.

टीप : (१) सदरचा विशेषांक फक्त खाजगी वितरणासाठी असून तो विनामूल्य आहे.

(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.

**मुखपृष्ठ व चित्रे**
भरत केतकर

**व्यवस्थापकीय सहकार्य**
शाम देऊळकर
अनंत सर्व्हीसेस, पुणे ३८.

**अक्षरजुळणी**
गणेश मुद्रा, ६९२ बुधवार पेठ, पुणे २.
दूरध्वनि : ४५११४४, ४५११०९

**छपाई**
गणेश प्रिंटर्स
अजित एजन्सीज, पुणे

# ओंकार ट्रस्टची उज्वल वाटचाल

## १९९१-९२

- २१ जुलै १९९१ गुरुपौर्णिमा ओंकार ट्रस्टची स्थापना आद्यसंस्थापक कै. सौ. वसुंधरा सातवळेकर



- गुजरवाडी, निंबाळकरवाडी, मांगडेवाडी येथे शाळेमधे संस्कारवर्गास सुरवात.



## १९९२-९३

- प्रथम वर्धापन दिन गुरुपौर्णिमा 'कल्याणी' प्रथम विशेषांकाचे प्रकाशन.
- मांगडेवाडी येथे शिवणवर्गाची सुरवात.
- गुजरवाडी, निंबाळकरवाडी येथे दवाखान्याची सुरवात.
- मांगडेवाडी, गुजरवाडी, निंबाळकरवाडी येथे मोफत वाचनालय सुरू.
- गुलबर्गा कर्नाटक राज्य येथे वर्षातून दोनदा वर्ग घेतला जातो.

## १९९३-९४

- नियोजित प्रकल्पासाठी ४२ गुंठे जागेची खरेदी.
- सुनील चिंचोलकर, सौ. सोमण, के. एन्. दिक्षूड, चिं. ग. काशिकर, चं. पां. भिशीकर आदींची व्याख्याने.
- शिवणवर्गाचे रूपांतर दासबोध वर्गात.



- दासनवमी विशेषांकाचे प्रकाशन.
- सौ. अलका देव मारूलकर यांचे गायनाचा कार्यक्रम.
- किर्तन सौ. मोने

## १९९४-९५

- 'स्वामी विवेकानंद' विशेषांकाचे प्रकाशन.



- मोफत नेत्रचिकीत्सा शिबीर. २०६ लोकांची तपासणी. १०५ जणांना मोफत चष्मे. ४ जणांवर मोफत शस्त्रक्रिया.
- युवा संघटनेमार्फत आयोजित गरबानृत्य स्पर्धेत भाग.
- कास्पच्या हस्तकला प्रदर्शनात संस्कारवर्गाचा सहभाग.

नव्याने संस्कारवर्गाची सुरवात. मार्केटयार्ड (भटक्या मुलांसाठी), हिंगणे स्त्री-शिक्षण संस्था, धनकवडी शाळा.

'गतीमानता'
दृश्यसृष्टीचा नैसर्गिक भाव.
गतीबरोबर वाटचाल सजीवांचा स्थायीभाव.
सर्वश्रेष्ठ नरदेहास भाग्याने लाभणारा
संत सहवास, त्यातूनच सुपंथाकडे वाटचाल.

रामकृष्ण मठ
१३१/१ अ, विठ्ठलवाडी रस्ता,
पुणे - ४११ ०३०



PHONE : 44 01 32

RAMAKRISHNA MATH
131/1A, Vitthalwadi Road,
Pune - 411 030.

## शुभेच्छा

एका उच्च ध्येयाने प्रेरित झालेली ओंकार ट्रस्ट ही संस्था पुण्यापासून सुमारे ५ किलोमीटर अंतरावर कात्रजच्या परिसरात सामाजिक सेवाकार्यात गेली ३ / ४ वर्षे कार्यरत आहे. धर्मार्थ दवाखाना, लहानमुलांसाठी कल्याण केंद्र, ग्रंथालय वाचनालय व आध्यात्मिक उपक्रम इ. कार्यांची व्याप्ती आहे.

संस्थेतर्फे प्रतिवर्षी कल्याणी नामक एक स्मरणिका काढली जाते. त्याद्वारे झालेल्या कार्यांची माहिती जनसाधारणाला देणे व विविध योजनांच्या परिपूर्तीसाठी निधिसंकलन करणे हा हेतू. स्मरणिकेतील लेखही विविध क्षेत्रातील मान्यवरांच्या लेखणीतून उतरलेले व विचारांना चालना देणारे असतात.

शुद्ध अध्यात्माची बैठक असलेल्या या संस्थेच्या सर्व उपक्रमाला सुयश हे ठेवलेलेच. या संस्थेच्या सेवाकार्याशी संबंधित सर्व व्यक्तींना माझ्या हार्दिक शुभेच्छा व पुढील वाटचालीसाठी श्रीप्रभूंपाशी विनम्र प्रार्थना.

स्वामी भौमानंद
स्वामी भौमानंद
अध्यक्ष
रामकृष्ण मठ, पुणे - ३०.

पुणे
धनत्रयोदशी
१ नोव्हेंबर १९९४

# 'मनोगत'

स्वामी माधवनाथ

'कल्याणी' वार्षिक १९९४-९५ ज्ञानेश्वर विशेषांक काढीत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. ९३-९४ मध्ये त्यांनी विवेकानंदांचा, तत्पूर्वी समर्थांचा विशेषांक काढलेला आहे. ज्ञानेश्वरांच्याविषयी सर्व बाजूंनी जेवढा विचार करावा तेवढा थोडाच आहे. ते संत सम्राट होते, संतांचेही संत होते. रसिक कवी होते. सर्व महाराष्ट्राचे पूजास्थान होते आणि आजही पूजनीय आहेत.

केवळ २२ व्या वर्षी कृतार्थ होऊन हसतमुखाने जगाचा निरोप घेणारा असा कोणी महापुरूष पूर्वी ऋषिमुनींच्या काळात झाला नाही, आजही अस्तित्वात नाही व पुढे होणारही नाही. त्यांनी लिहिलेले सर्वच ग्रंथ शिरसावंद्य असून परमार्थाचे मार्गदर्शन करणारे आहेत. चांगदेव-पासष्टी, अमृतानुभव, अभंगगाथा श्रेष्ठच आहेत, तथापि ज्ञानेश्वरी या त्यांच्या ग्रंथाने सर्व संतांचे हृदयही आकृष्ट केलेले आहे. श्री एकनाथ महाराजांनी ज्ञानेश्वरी प्रतिशुद्ध केल्यापासून ते श्री स्वामी स्वरूपानंदांपर्यंत जे संत आजवर महाराष्ट्रात होऊन गेले त्या सर्वांनी 'ज्ञानेश्वरी' शिरोधार्य मानलेली आहे. या ग्रंथाने मोठमोठ्या पंडितांचे हृदयही आकृष्ट केलेले आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितल्याप्रमाणे –

*तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगचि अधिकारियें ।*
*परी लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥*

*ज्ञानेश्वरी अ.१८-श्लो. ७८-ओवी १७४९*

जो कोणी अंतरंगभक्त असेल, ज्याची परमेश्वरावर नितांत श्रद्धा असेल, या जगतामध्ये आपल्या वाट्याला आलेली सर्व कर्मे करत असतानाही जीवनाची पूर्णता आत्मज्ञानाशिवाय होत नाही अशी ज्याची खात्री असेल त्याला या ज्ञानेश्वरी ग्रंथापासून कितीतरी नव्यानव्या गोष्टी शिकण्यासारख्या आहेत. ज्ञानेश्वरीतील कर्मयोग –

*तरी उचितें कर्में आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं ।*
*परी चित्तवृत्ति न्यासावी । आत्मरूपीं ॥ ज्ञा. अ. ३-३०-१८६*
*आणि हें कर्म मी कर्ता । कां आचरैन या अर्था ।*
*ऐसा अभिमानु झणें चित्ता । रिगों देसीं ॥ ज्ञा. अ. ३-३०-१८७*
*हें ऐसें असे स्वभावें । म्हणौनि कर्म न संडावें ।*
*विशेषें आचरावें । लागे संतीं ॥ ज्ञा. अ. ३-२१-१५९*

संतांनीही लोकांसाठी कर्म केले पाहिजे असे निश्चितपणे ज्ञानेश्वरमहाराजांचे म्हणणे आहे; पण हे कर्म करीत असताना आत्मस्वरूपाचे चिंतन पाहिजे असे ते सांगतात. कर्माप्रमाणेच भक्तिवरही ज्ञानोबांचे विवरण अतिशय सार्थ, उद्बोधक असे आहे.

*परि तेचि भक्ति ऐसी । पर्जन्याची सुटिका जैसी ।*
*धरावांचूनि अनारिसी । गतीचि नेणें ॥ ज्ञा. अ. ११-५४-६८६*
*कां सकळ जळसंपत्ति । घेऊनि समुद्रातें गिंवसिती ।*
*गंगा जैसी अनन्यगती । मीनलीचि मिळे ॥ ज्ञा. अ. ११-५४-६८७*
*तैसें सर्वभाव संभारें । न धरत प्रेम एकसरें ।*
*मजमाजीं संचरे । मी चि होऊनि ॥ ज्ञा. अ. ११-५४-६८८*

ज्ञानोबांचे हे भक्तीचे वर्णन कसे सर्वंकष आहे, पूर्ण आहे हे लक्षात येते. कर्म आणि भक्तीने पूर्ण संप्रदायपूर्वक सद्गुरूंना शरण जाऊन आत्मज्ञानाची ओळख करून घ्यावी असे त्यांचे सांगणे आहे. हे आत्मज्ञान सुरूवातीला कोवळे असते, ते सद्गुरूंच्या मार्गदर्शनाखाली व स्वतःच्या अभ्यासाने वाढवावे व कृतकृत्य व्हावे असे ज्ञानेश्वर महाराजांनी आवर्जून सांगितलेले आहे. प्रत्येक मनुष्यमात्राला आत्मज्ञानाचा हक्क आहे आणि तो प्राप्त करून घेतल्यानंतरच जीवनात कृतार्थता लाभते हे त्यांचे सांगणे आहे. अभ्युदय आणि निःश्रेयस हे दोन्हीही याच जीवनामध्ये साध्य करून घ्यावे असे ते सांगतात.

*किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।*
*भजिजो आदिपुरखीं । अखंडित ॥*

ज्ञा. अ. १८-७८-१८००

ज्ञानेश्वर महाराजांचे हे उत्तुंग जीवनदर्शन सर्वांनाच आदर्शभूत झालेले आहे. एवढ्या लहान वयामध्ये अवघ्या १५ व्या वर्षी त्यांनी हा ग्रंथ कसा लिहिला हे फक्त त्यांच्याच शब्दात सांगता येईल.

*तैसीदशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां ।*
*बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥*

ज्ञा. अ. ६-४३-४५३

हे त्यांचे उद्गार त्यांच्याच जीवनाची साक्ष देत नाहीत काय? श्रीसद्गुरू निवृत्तिनाथांच्या मार्गदर्शनाखाली, मुळातच परिपूर्ण असलेले ज्ञानोबा कृतकृत्य झाले आणि जगालाही तोच मार्ग दाखवून या जगताच्या रंगभूमीवरून ते अंतर्धान पावले. त्यांची स्तुती करणें शब्दांपलीकडले आहे.

उगाच चरणीं ठेविजे माथां । हेंचि भलें ॥

स्वामी माधवनाथ
उपाख्य श्री. बाळासाहेब वाकडे
१५७५ ब, माया अपार्टमेंट्स्,
सदाशिव पेठ, पुणे - ४११ ०३०.

# श्रीशः शरणम् ।

**श्रीमान व्यवस्थापक ओंकार ट्रस्ट पुणे यांचे सेवेसी**

सप्रेम सादर स्मरण पूर्वक निवेदन वि. वि.

आपल्या ट्रस्ट तर्फे 'कल्याणी' मासिकांचा संत ज्ञानेश्वर महाराज विशेषांक निघणार असल्याचे समजल्यामुळे आनंद झाला. जनताजनार्दनाच्या कल्याणार्थ चालू असणारे आपले कार्य ईश्वर कृपा संपादित व राष्ट्रोन्नत्तिकारक ठरणारे आहे. याबद्दल आपणा सर्व कार्यकर्त्यांना धन्यवाद.

आमची प्रकृति वयोमानाप्रमाणे बरी राहात नसल्यामुळे यथा-मति संक्षिप्त निवेदन पाठवित आहे, याबद्दल क्षमा असावी.

स्वसुख निराभिलाषी संत महात्म्यांचे आचरण सर्वांच्या कल्याणार्थच असल्यानें खऱ्या-विवेकी श्रद्धाळू साधकांचे, त्यांच्या मार्गदर्शनाने पूर्ण कल्याणच होत असते. सकल संत शिरोमणि श्रीज्ञानराजांचे संपूर्ण जीवन लोकांपुढे आदर्शभूत आहे. अप्रतिम सहनशीलता, निरहंकार वृत्तिचा परिपूर्ण ईश गुरूभक्ति इत्यादी दैवीसंपत्तीच्या, प्रभावाने 'श्री ज्ञानेश्वरीसारखे' विश्वमान्य ग्रंथ तयार करून सर्व लोकेषणा सोडून श्री ज्ञानराज आळंदीस समाधि लावून बसले. तथापि आजही लक्षावधी लोक तेथे जात असून, त्यांच्या कृपाप्रसादाने कल्याण संपादन करीत आहेत.

ही अखंड लोकप्रियता इतर कोणालाही मिळवता येणार नाही. त्यांनी रचलेला पंढरीच्या वारीचा पाया आज सातशे वर्षे झाली तरी अत्यंत स्थिर असून तो प्रतिवर्षी मान्य केला जात आहे.

ही दीर्घकाळ टिकणारी लोकप्रियता कोणीही माणूस मिळवू शकणार नाही. संत महात्मे हे भक्तिप्रभावानें ईश्वररूप झाले असल्यानें तेंच योग्य मार्गदर्शन करीत राहून सर्वांचा उद्धार करण्यास समर्थ असतात म्हणूनच.....

चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन सोयरे होतु ॥

ही प्रार्थना शेवटी श्री ज्ञानराजानी केलेली आहे. अशा महात्म्यांच्या मार्गदर्शनावर सर्वांचा विश्वास बसून, त्यांची बुद्धि ईश्वरकृपेने श्री ज्ञानराजांच्या प्रार्थनेप्रमाणे दुरित तिमिरातून मुक्त व्हावी व सर्वांचे कल्याणच व्हावे हीच श्री परमेश्वरस्वरूप श्री ज्ञानराजांचे चरणीं प्रार्थना आहे.

दि. २६ जानेवारी १९९५
पौष व ॥ १० गुरुवार १९१६

सज्जन कृपाभिलाषी
**दत्त महाराज कवीश्वर**
श्री वासुदेवनिवास, कर्वे रोड पुणे - ४.

# अनुक्रमणिका


- ज्ञानदेवांचे धर्मकीर्तन — श्री. स. कृ. देवधर — १
- 'ज्ञानेश्वरी' मराठी साहित्याचा कंठमणी — डॉ. उषा मा. देशमुख — ९
- संत ज्ञानेश्वरांचा कर्मयोग — विद्यावाचस्पती शंकर अभ्यंकर — १३
- ज्ञानेश्वरीचे उगमस्थान आणि प्रगटन — श्री. ज्ञाननाथजी रानडे — १९
- हरिपाठ आणि प्रकृतिस्वास्थ्य — डॉ. ह. वि. सरदेसाई — २९
- ज्ञानेश्वरीतील वाङ्मयरूपक — डॉ. गु. वा. पिंपळापुरे — ३३
- ज्ञानाचा एका — प्रा. लीना केळकर — ३९
- अद्वैती ज्ञानदेवांची परतत्त्वनिष्ठा — डॉ. सुशीला पाटील — ४५
- तैं भूतसृष्टीची पडे टांकसाळ — डॉ. रवींद्रनाथ वामन रामदास — ५१
- वैराग्य : योगमार्गातील पहिले पाऊल — डॉ. कालिदास जोशी — ५५
- ज्ञानेश्वरीतील अध्यात्मशास्त्र — ह. भ. प. कृष्णकांत नाईक — ५९
- विश्वरूपाहूनि कृष्णाकृती । देखिला लाभ — डॉ. कृ. मा. घटाटे — ६५
- श्री ज्ञानेश्वर माऊलीच्या "समाधी संजीवन अवस्थेतील" सगुण साकार रंगविलेल्या चित्राबद्दल माझे मनोगत — श्री. जि. भि. दीक्षित — ७३
- जैसा अमृताचा निर्झरु ।.... — डॉ. माधव नगरकर — ७७
- ज्ञानेश्वर माऊलींची 'भारूडे' — डॉ. रामचंद्र देखणे — ८५
- संत भागवतांचा साम्ययोग — डॉ. दि. ब. येरूर — ९१
- एक मूलभूत निसर्गनियम : क्रिया आणि प्रतिक्रिया यांचे संतुलन — श्री. केशवचंद्र गंगाधर भडभडे — ९५
- श्री. उर्वकाचार्य व एकश्लोकी — डॉ. वा. रां. अंतरकर — १०१
- श्री ज्ञानेश्वरमहाराजकृत श्रीविठ्ठलनाममहिमा — प्रा. योगेश्वर अभ्यंकर — १०५
- पुढे चाले ज्ञानेश्वर — श्री. वि. रा. करंदीकर — १११
- ज्ञानेश्वरीतील सोऽहं साधना अर्थात् पूर्णत्वयोग — श्री. मकरंद माधव वझे — ११५
- आश्चर्यकारक शिवाम्बु उपचार — श्री. बाळकृष्ण लक्ष्मण नलावडे — ११९
- प्रिय बाई पुन्हा आठवतात — सौ. प्राची जावडेकर — १२३
- अमृतानुभव (एक परिचय) — श्री. माधव देव — १२७
- "श्री ज्ञानेश्वर, ज्ञानेश्वरी व माझे सद्गुरु स्वामी स्वरूपानंद" — श्री. अ. र. करंदीकर — १३१
- जरूरी नेत्र शिबिराची — डॉ. पारस शहा — १३५
- समर्थांचा विदर्भातील सहवास — श्री. श्रीपाद के. चितळे — १३९
- दिशा — श्री. श्रीकांत काशीकर — १४५
- झोपडीचे मनोगत — सौ. माधुरी पेंडसे — १५१
- संघर्ष — कु. दिपा पाठारे — १५५
- अध्यात्म व प्रहयोग — श्री. व. दा. भट — १६१
- गुण लावण्याची खाणी । संतांच्या रूपे उभे माझे चक्रपाणी — श्री. अनंतराव पाकणीकर — १६५
- ज्ञानेश्वरीतील पसायदान — श्री. सुनील चिंचोलकर — १६९


## कविता


- श्रीज्ञानदेवांची भूपाळी — श्री. मधुकर कुलकर्णी
- श्रीहरी माझ्या सदनी आले — सौ. कमला मा. दातार — २५
- आत्मतत्व — सौ. मंदाकिनी कुलकर्णी — ४२
- सागरास — कु. क्षितीजा सोमण — ५२
- किमया — सौ. स. अ. करंदीकर — ५२
- स्वप्नांच्या राज्यातून — कु. तृप्ती कपटकर — ५६
- मानव — श्री. के. एन्. रिसबुड — ६३
- संकल्प — श्री. म. भ. सोमण — ६३
- श्री संत श्रेष्ठ गुलाबराव महाराज यांचे उत्तराधिकारी श्री. बाबाजी महाराज कृत — ७९
- श्री रामदास विरचीत संत ज्ञानेश्वरांची आरती — १७५
- श्रीमद ज्ञानेश्वरीची आरती — श्री. रा. य. परांजपे — १७५

# पवित्रा भावना पूत वाक्यं कार्यं च निर्मलं....

**श्री. बाबुमहाराज मानवतकर**

रात्रीको लगभग ९ बजे शुचिर्भूत होकर किसी अेकांतस्थानमें जहाँ चित्तको शांति मिले, प्रसन्नता प्राप्त हो, अैसी जगह अेक पवित्र आसन बिछाकर उसपर सुखासनसे बैठ जावो, आसन बदलो मत। बाहर का कोई आवाज सुनाई न दे, इसलिये कर्णमुद्रासे (अथवा किसी और प्रकारसे) कान बंद करलो, और चित्तको एकाग्र कर शांतिसे उस दिव्य ध्वनिको सुनो जो सारे संसारमें गुंज रही हैं, यह ध्वनी तुम्हारे हृदय मंदिरमें हो रही हैं, हृदय मंदिर ही चित्ति शक्तिका निवासस्थान है, तुम अपनी मनःस्थितीको, उस महान शक्तिसे संयुक्त करलो जिससे संसार की समस्त शक्तियां प्रवाहित हो रही है, तुम यह कल्पना करो कि - तुम सदा उस शक्तिमेंही रहते हो, ऊपर, नीचे, दायें, बायें, सब तरफ शक्तिही शक्तिको देखते रहो, और मनःपूर्वक दयामयी जननीको, अपने सामने प्रत्यक्ष मानकर आँखे बंद करके ध्यानसे दर्शन करो और प्रार्थना करो –

**दुर्गेस्मृता हरसि भीतिमशेष जंतोः ॥**
**स्वस्थैः स्मृतामतिमतीव शुभां ददासि ॥**
**दारिद्र्यदुःखभय हारिणिका त्वदन्या ।**
**सर्वोपकार करणाय सदार्द्र चित्ता ॥१॥**

दयामयी जननी । आनंदमयी, स्नेहमयी, अमृतमयी, माँ !! तुम्हारी जय हो ! माँ ! तुम ज्ञानमयी, बुद्धिमयी और शक्तिमयी हो । माता, मुझे शक्तिका और बुद्धिका वर दो । मेरी वाणी और बुद्धि पवित्र करो, मेरे अंतरमें अखंड ज्ञानका भंडार खोल दो, मेरे जीवनको यशस्वी और सफल बना दो, माँ !

**दुर्गेस्मृता हरसि भीतिमशेष जंतोः ।**

इस उपरोक्त मंत्रका अनेकबार पाठ करके पूर्ण श्रद्धाके साथ भगवतीमाताका ध्यान करके फिरसे एकबार उसी प्रार्थनाको दोहरावो और (कान खोलकर) शुभ्र और पवित्र बिस्तरपर उसी ध्यानमें मग्न होते हुये सो जावो, किसीसे बात मत करो, प्रातःकाल जागनेपर बिस्तरसे उठनेसे पहिले मनही मन मंत्रका जप करते हुये माता भगवतीका ध्यान करो और अपनी उसी प्रार्थनाको (दुर्गेस्मृता) दोहरा दो ।

इस प्रकार विधिसहित (धूपदीप के साथ) एक मास तक साधना करके देखो, तुम्हे विलक्षण शक्ति, बल और बुद्धि मिलेगी । दिनपर दिन, जगज्जननीसे तुम्हारा संबंध निकटका हो जायेगा । जब तुम्हारे हृदयमें यह विश्वास हो जावे, तुम्हारी अंतरात्मामें यह श्रद्धा और भावना निर्माण हो जावे कि तुमपर माताकी कृपा हो गयी है । तब तुम्हें जिनजिन कामनाओंको पूर्ण करना हो माँसे कह दो, वह तुम्हारी कामना पूर्ण करेगी । विद्या, धन, ऐश्वर्य, यश, यह सब तुम्हें अनायासही मिल जायेंगें । इस उपासनासे, तुममें आश्चर्यजनक शक्तिकी जागृती होगी और तुममें असाध्यसे भी असाध्य कार्यको साध्य करने की असीम शक्ति निर्माण हो जायेगी ।

**इति शुभम्**

श्रीकृपा व आपले कल्याण कसे करून घ्यावे? या विषयी या प्रार्थना पत्रकांत संक्षिप्त रुपात सांगितले आहे.

या पत्रकाप्रमाणे साधना केल्यास साधकांस निश्चित फल प्राप्त होते. असा अनुभव आहे.

**श्री बाबुमहाराज मानवतकर**
लक्ष्मीनगर, पुणे.

# ज्ञानदेवांचे धर्मकीर्तन

स. कृ. देवधर

महाराष्ट्राला लाभलेली सन्तांची अविरत आणि उज्ज्वल परंपरा, सांस्कृतिक आचार आणि आध्यात्मिक ज्ञान यांचा ठेवा अन्यांनीं हेवा करावा इतका असीम आहे. मराठी माणसाचें गौरवस्थान म्हणजे हा असीम ठेवा. या परंपरेत ज्ञानदेवांसारखा महात्मा आणि ज्ञानेश्वरीसारखा न भूतो न भविष्यति! असा ग्रंथ निर्माण झाला. बुद्धिवंतांच्या बुद्धीला सुद्धां आव्हान लाभावें अशा या दोन्ही गोष्टी आहेत. सामान्य माणसाला ज्या वयांत विश्वाची ओळखसुद्धा नसते अशा सोळाव्या वर्षी ज्ञानदेवांनीं हा ग्रंथ लिहिला. सर्व समाजाला सुमार्गी केलें आणि ज्या वेळीं सामान्य मनुष्य आपल्या प्रापंचिक जीवनाच्या प्रारंभाबद्दल विचार करूं लागतो तेव्हां ज्ञानदेव आपल्या कर्तृत्वाचा गंध दरवळत ठेऊन अनंतामध्ये मिळून गेले. इतर कोणाहीपेक्षां ज्ञानदेवांचे जीवन चरित्र आणि कर्तृत्व अगदी निराळें आहे.

सामान्य माणसाला एवढेंच माहीत आहे कीं ज्ञानेश्वरी म्हणजे भगवान् श्रीकृष्णांनीं भारतीय युद्धप्रसंगी, अर्जुनाला जी गीता सांगितली त्या गीतेवरील पहिली मराठी ओवीबद्ध टीका. तसें पाहिलें तर श्रीमत् भगवद्गीतेवर ज्ञानेश्वर महाराजांच्या पूर्वी अनेक टीका झाल्या. या सर्व टीकांमध्ये ज्यांची टीका प्रज्ञावंताना जवळची वाटते ती टीका म्हणजे पूज्यपाद श्रीमत् आद्य शंकराचार्य यांचें गीता भाष्य. अर्थात ज्ञानदेवांच्या टीकेच्या पूर्वीं जवळ जवळ सतराशें वर्षांपूर्वीं आचार्यांनी हे भाष्य लिहिले. (आचार्यांचा जन्म इसवी सनापूर्वी ४९९ वर्षें झाला आहे.) हे भाष्य व त्यानंतर ज्ञानेश्वरांपर्यंत झालेली सर्व भाष्यें संस्कृतमध्यें आहेत. या भाष्यांचा उपयोग प्रज्ञावंत, अभ्यासू शास्त्री पंडिताना झाला. त्या पंडितांनी अभ्यास करायचा, आपल्याला जो अर्थ अभिप्रेत वाटला त्याप्रमाणे लोकांना मार्गदर्शन करावयाचे ही प्रथा होती. यांमध्यें हे एक विशेषत्वानें जाणवते. या प्रज्ञावंतांना ईश्वराचें वर्णन करता येत होते. त्याचा ठावठिकाणा आणि त्याकडे जाण्याचा मार्ग यांचें प्रतिपादन करतां येत होते. यामध्यें अनुभवाची तृप्ती आणि आनंद नव्हता कारण ईश्वराचें साक्षात् दर्शन त्यांना झालेले नव्हते. इतकेंच



नव्हे, तर पूज्यपाद आद्य शंकराचार्य सोडले तर या कोणाही पंडितांना देवाचें साक्षात् दर्शन घडलें नव्हते. ज्ञानदेवांच्याच भाषेंत सांगायचे तर-

ऐलीच थडी न पवतां । पळे जो माघौता ।

तया पैलद्वीपीची वार्ता । काय होय ।। (ज्ञाने. १३-८४३)

जो अलीकडच्या तीरावरूनच परत आला त्याला पैलतीरावर काय आहे असें विचारण्यांत तरी काय अर्थ आहे? त्याप्रमाणे देवत्वाचें वैभव या भाष्यांतून अगर टीकेतून भोगतां येत नाही किंवा अनुभविताही येत नाही. श्रीमत् आद्य शंकराचार्य हे अद्वैत वेदान्ताचे पुरस्कर्ते होते. त्याप्रमाणे त्यांचें भाष्य अनुभूतिपूर्ण असेच आहे. त्यांचें भाष्य वाचल्यावर त्यामधील अनुभूतीपर्यंत ज्यांना जातां आलें नाहीं त्यांनी आचार्यांच्या अद्वैतविचार अगर भाष्यप्रणालीला विरोध दर्शविण्यासाठी भाष्यें लिहून परमेश्वराचें निमित्त करून वादविवादाला जागा निर्माण करून दिली. त्यानें प्राप्ति काहीं नाही परंतु ईश्वर नामक परमोच्च सत्तेचा लाभ होण्याच्या मार्गामध्ये अडथळा निर्माण करणारा अहंकार मात्र जोपासला गेला आणि त्यांतून पंथोपपंथांची निर्मिती झाली. अर्थातच आध्यात्मिक क्षेत्रांत ज्ञानेश्वरीच्या तुलनेत ही भाष्ये सीमित राहिली. त्यांचे अभ्यासू देखील मर्यादित राहिले. त्यांची झेप सामान्य अशिक्षित परंतु श्रद्धावंतांपर्यंत पोहोचूच शकली नाही. अध्यात्माच्या किंवा आत्मोन्नतीच्या क्षेत्रांत सामान्य जन बुभुक्षित आणि तृषितच होते.

सहजें ब्रह्मरसांचे पारणें । केलें अर्जुनालागीं नारायणें ।

कीं तोचि अवसरीं पाहुणे । पातलों आम्ही ।। (ज्ञा. ६-२)

किंवा सर्वलोकानुग्रहार्थमर्जुनं निमित्तीकृत्याह ।। आचार्य - गीताभाष्य प्रस्तावना.

भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाच्या निमित्ताने ब्रह्मरसाचे पारणे घातले ते म्हणजे ही भगवद्गीता होय. पारण्याच्या निमित्ताने अनेक लोक त्याचा फायदा घेतात. त्याप्रमाणे तेच ब्रह्मरसाचे पारणे ज्ञानदेवांनी सर्वांसाठी घातले. फरक एवढाच होता श्रीकृष्णांच्या पारण्याच्या निमित्तानें जें भोजन होतें त्यांतील पदार्थ पचविण्याची शक्ती अर्जुनाजवळ असली तरी आजच्या सामान्यांत नाही हे ओळखून ज्ञानदेवांनी त्यामध्यें काही पचनीय पदार्थ काही देखणे पदार्थ घालून सामान्यांना भरवतां येतील असें रूप त्या पूर्वीच्या पदार्थांना दिले. नवजात बालकाला धारोष्ण दूध पचविण्याचे सामर्थ्य नसते. म्हणून त्याची माता त्या दुधांत पुष्कळ पाणी, साखर वगैरे पदार्थ घालून तें दूध त्या नवजाताला पचेल असे करते. त्याप्रमाणे ज्ञानदेवांनी पूर्वीच्या या कृष्णोक्त पदार्थांमध्यें शांतिप्रमुख अन्य सर्व रस, विविध अलंकार, शब्दसौष्ठव, नादमाधुर्य, प्रमेयस्वरूपता, भक्ती, अर्थसघनता, भावोत्कर्षता, आणि संवाद वगैरे अनेक पदार्थ मिसळले. ह्या दृश्य पदार्थांशिवाय न दिसणारा परंतु प्रत्येक पदार्थांत मिसळून त्या पदार्थाला तेज निर्माण करणारा स्नेह-तूप नांवाचा पदार्थ मिसळला. हा असा मोठा घास ज्ञानदेवांनीं तयार केला आणि आपल्या बुभुक्षित लेकरांना त्याचे बारीक बारीक घास करून भरवायला प्रारंभ केला. म्हणून तर ज्ञानदेवांना माऊली म्हणतात. त्यांनी तयार केलेले हे भोजन म्हणजेच आजची ज्ञानेश्वरी होय.

ज्ञानदेवांच्या ज्ञानेश्वरींत ज्ञानदेवांनीं आपल्या ग्रंथाला ज्ञानदेवी अगर ज्ञानेश्वरी असें नामाभिधान दिलेले आढळते, हे नांव इतर सन्तानींच दिल्याचें दिसून येते.

नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी ।। नामदेव

गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी ।। नामदेव

ज्ञानेश्वरीं पाठीं जो ओवी करील मराठी ।। एकनाथ महाराज

भाव धरूनि वाची ज्ञानेश्वरी ।। एकनाथ महाराज

ज्ञानदेवांची म्हणून ज्ञानेश्वरी किंवा ज्ञानदेवी असाच हा संदर्भ आहे. अर्थात स्वतः ज्ञानदेवांनी मात्र आपल्या या ग्रंथाला 'धर्मकीर्तन' असें नांव दिल्याचें स्पष्टपणे दिसून येते. या दोन्ही नावांमध्ये महान अर्थ साठविलेला आहे.

ज्ञानेश्वरी - ज्ञान - ईश - वर - 'इ' इत्यादी पदे या नावांत आहेत. ज्ञान याचा अर्थ सर्वांना परिचित आहे. ईश = सत्ता, वर - सर्व श्रेष्ठ, इ - ज्याला गतिमानता आहे. थोडक्यात ज्ञानेश्वरी म्हणजे ज्ञानाची सतत प्रवाहित असणारी सर्वोच्च सत्ता किंवा सर्वोच्च सत्तेचा विलास म्हणजे ज्ञानेश्वरी.

धर्मकीर्तन हें नांव देखील तसेच अर्थगर्भ आहे. धर्माच्या विविध व्याख्या प्रचलित आहेत. परंतु धर्म या शब्दाचा अर्थ कर्तव्य असा घेतला की या ग्रंथाचें वैभव उत्तम प्रकारे लक्षांत येते. गीता सांगतांना अर्जुनाला त्याच्या विहित कर्माला प्रवृत्त करणें हा भगवंतांचा प्रमुख उद्देश होता. विहित कर्म अगर कर्तव्य हे ईश्वराचें मनोगत आहे आणि त्याप्रमाणे त्या कर्तव्याचा आश्रय केला तर विश्वांतील सर्वोच्च सत्तेचें सान्निध्य लाभेल.

अगा जया जें विहित । तें ईश्वराचे मनोगत ।

म्हणोनि केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ।। (ज्ञा. १८-९११)

या विश्वाच्या पसाऱ्यांत अनेक वस्तु आणि प्राणिमात्र निर्माण झालेले आहेत. त्यांच्या उत्पत्तिबरोबरच त्यांचें कर्तव्यही परमेश्वरानें त्यांना प्रदान केले आहे. या सर्वांमध्ये मानव ही एक सर्वोत्तम वस्तु निर्माण करतांना त्या व्यक्तीचें विहित कर्तव्य देखील माणसाला प्रदान करण्यांत आले आहे. मनुष्याला बुद्धि असल्याने हें विहित कर्म रीतसर होते. या कर्तव्यामध्यें चुकारपणा केला तर विश्वांतील सर्वोत्तम सत्तेशी एकरूपता साधतां येणार नाही. ईश्वर हे या सर्वोत्तम सत्तेचे एक परिचित नांव आहे. म्हणून ज्ञानेश्वरीच्या बाबतींत तरी धर्म या शब्दाचा अर्थ कर्तव्य असा केला तरच 'धर्मकीर्तन' या पदाची संगती लागते. कीर्तन या शब्दाचे अर्थ -

सांगणे, प्रतिपादन करणे, मनावर बिंबवणे असे विविध आहेत. निदान मानवांना तरी त्यांचें विहित कर्म काय आहे हें ज्या ग्रंथामध्ये प्रतिपादन केले आहे त्या ग्रंथाला ज्ञानेश्वर महाराज 'धर्मकीर्तन' असे म्हणतात तर इतरांना ज्ञानदेवी, ज्ञानेश्वरी, भावार्थ दीपिका, ब्रह्मसाम्राज्यदीपिका वगैरे नांवानी या ग्रंथाचा परिचय आहे.

इतर भाष्ये आणि ज्ञानेश्वरी यांमध्ये एक महत्त्वाचा फरक आहे आणि तो म्हणजे भाष्ये ही एकान्तात लिहिली गेली तर ज्ञानेश्वरी ही श्रोत्यांना प्रकटपणें सांगण्यांत आली आणि त्याच वेळी सच्चिदानंदबाबांनी ती लिहून घेतली. गीतेंत संवाद आहेत. संवाद किंवा चर्चा या योगे विषयाचे आकलन होण्यास खूपच साहाय्य होतें. गीता एखाद्या स्तोत्रासारखी लिहिली गेली असती तर ती इतकी उत्तम झाली नसती. प्रश्न, उपप्रश्न, शंका यांचें उचित उत्तराच्या माध्यमातून केलेले विवेचन म्हणजे संवाद. गीतेमध्ये जे संवाद आहेत त्यापेक्षा अधिक पात्रे आणि संवाद ज्ञानेश्वरींत आहेत. भाष्यांमध्ये पूर्वपक्ष, उत्तरपक्ष, असे विभाजन करून संवाद निर्माण करण्याचा प्रयत्न आहे. हे सर्व संवाद त्या मानाने रूक्ष आणि कृत्रिम वाटतात. परंतु ज्ञानेश्वरीतील संवाद मात्र पूर्णपणे स्वाभाविक आणि सहज वाटतात. गीतेमध्ये, धृतराष्ट्र-संजय, श्रीकृष्ण-अर्जुन एवढेच संवाद आहेत. ज्ञानेश्वरीमध्ये हे संवाद तर आहेतच पण त्या बरोबर आचार्य द्रोणाचार्य आणि दुर्योधन, ज्ञानदेव आणि श्रीगुरू निवृत्तिनाथ, ज्ञानदेव आणि श्रोते, ज्ञानदेव आणि निसर्ग यामध्येही झालेले संवाद लक्षात येतात त्यामुळे ज्ञानेश्वरीतील प्रत्येक वस्तू सजीव झाल्याचे पदोपदी जाणवते. हे संवाद समोरच्या श्रोत्यांना मनोज्ञ वाटत होते.

ज्ञानदेवांनीं सद्गुरू निवृत्तिनाथांच्या आज्ञेने, नेवासे येथील मंदिरात ही ज्ञानेश्वरी सांगितली. त्यावेळी त्यांच्या समोर चतुर्विध श्रोतृसमाज होता. त्या श्रोत्यांमध्ये व्युत्पन्न पंडित, संसारी परंतु शिक्षित, स्त्रिया, अक्षरशत्रु असलेला शेतकरी आणि अन्य समाज, ज्यांना त्या काळच्या पद्धतीप्रमाणे देवळांत प्रवेश नव्हता असे लोक आणि ज्या रेड्याच्या मुखातून ज्ञानदेवांनी पैठणक्षेत्री वेद बोलविले तो रेडा होता. शिवाय ज्ञानदेवांचे गौरवस्थान असे त्यांचे गुरु निवृत्तिनाथ, सोपानकाका, मुक्ताई आणि ज्ञानदेवीचे लेखकु सच्चिदानंद बाबा बसले होते. मला वाटतं, या जगांतलं हे एकमेव उदाहरण आहे की श्रीगुरु श्रोते आणि ज्ञानदेव शिष्य म्हणून व्यासपीठावर. अशा या सोहळ्यांत ज्ञानदेव ज्ञानेश्वरी सांगतात. ज्ञानदेवांचे हे सांगणे म्हणजे एका हृदयाने दुसऱ्या हृदयाशी केलेला प्रेमळ संवाद आहे. मनामनाचा संवाद आहे. या संवादाचे स्वरूप इतर संवादापेक्षा भिन्न आहे. एखादी माता आपल्या तान्ह्या मुलाला पान्हा देत बसली आहे. समोर तिचा नवरा आहे, मांडीवरचे मूल पान्हा पितांना आईला बोचकारते, चावते, लाथा मारते आणि एकीकडे स्तनाचा घोट घेत तृप्त होत असते. यावेळी त्याची आई त्या मुलाला पदराआड घेऊन पान्हा देत असते आणि नवऱ्यापाशी बोलत असते. हे सर्व बाह्य दृश्य जरी असले तरी त्या मातेच्या मनात शिरून मागोवा घेतला तर असे कळून येईल मुलाने घेतलेल्या एकेका घोटाबरोबर ते ज्या प्रमाणांत तृप्त होते त्यापेक्षा अधिक प्रमाणांत ती आंतून तृप्त होत असते. मूल विविध खोड्या करतें म्हणून ती त्याला लोटून देत नाही, तर अधिक कवटाळते. इतकेच नव्हे, तर आपल्या अपत्याशीं शब्देविण झालेल्या संवादामुळे मुलाचा तृप्त चेहरा नवऱ्याला सुद्धां दिसू नये म्हणून ती त्याला पदराआड लपवते. त्या मातेची आणि तिच्या अपत्याची ही अनुभूति शब्दांनी सांगता येत नाही. त्याप्रमाणे ज्ञानेश्वरीचा आनंद शब्दांच्या सीमात बंदिस्त करतां येत नाही.

एखाद्या मुलाला बरे वाटावे म्हणून त्याला औषध द्यावे लागते. औषध कडू असते त्यामुळें मुलाला आवडत नाही. कारण त्याला त्यांत लपलेल्या अमृतमय परिणामांची कल्पना नसते. परंतु मातेला मात्र -

औषधाचिया कडुवटपणी । जैसी अमृताची पुरवणी ।
ते न दिसे परि गुणीं । प्रकट होय ।। ज्ञा. २-८८

ती बाह्यरूपाकडे न पाहतां अंतिम कल्याणाकडे लक्ष ठेऊन, मुलाला समजावीत, त्याच्या पाठीवरून हात फिरवीत, खाऊची लालूच दाखवीत, त्याच्या उदरी तें औषध कसें जाईल याची काळजी घेते त्याप्रमाणे भवरोगांतून निरोगी होण्यासाठीं सामान्याच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत ज्ञानदेव त्याला कसे बरे करतात ते समजत नाहीं. कारण लोक त्यांना आई, माऊली म्हणतात. तिचे ते धर्मकर्तव्यच आहे. हीच परिणत अवस्था ज्ञानेश्वरींत अनुभवायला मिळते.

धर्म म्हणजे कर्तव्य हा महत्त्वाचा सिद्धांत आहे. त्यामध्यें माणसाच्या कर्तव्यातून त्याला सर्व सुखाचा लाभ आणि दुःखाचा शेवट होऊन समाधान प्राप्त व्हावे हा अंतिम हेतू आहे. 'सर्व सुख' या ज्ञानदेवांच्या शब्दामध्ये फार मोठा अर्थ सांठविलेला आहे.

मातेचिया उदरकुहरीं । पचूनि विष्टेच्या दाथरीं ।
उकडूनि नवमासवरी । जन्मजन्मोनि मरती ।। ज्ञा. ९-३३१

हे या विश्वाचे महान दुःख आहे. या दुःखाच्या प्रवासाचा शेवट व्हावा ही अपेक्षा या मानवी कर्तव्याच्या मागे आहे. हे सुख प्राप्त होण्यासाठी माणसाला ज्या क्रिया कराव्या लागतात किंवा जी पथ्ये सांभाळावी लागतात त्याचे विवेचन ज्ञानेश्वरीमध्यें आहे. यासाठी ज्ञानेश्वरीचा अभ्यास करणें अतिशय महत्त्वाचे आहे. अभ्यास यामध्ये एकच गोष्ट तिचा उद्देश समजावून घेऊन पुन्हा पुन्हा करणें म्हणजे अभ्यास होय. या अभ्यासाच्या ज्या दिशा आहेत

त्यांचे ज्ञान करून घेणें आवश्यक आहे.

या सर्वांमध्ये ज्ञानेश्वरीचें यथार्थ वाचन ही पहिली पायरी आहे. या क्रियेमध्ये ज्ञानेश्वरीची अक्षरे चर्मचक्षूंनी पाहाणे, जिव्हेने त्यांचा उच्चार करणे, कानानी तो नाद ऐकणे आणि मनाने वाचन बरोबर असल्याची ग्वाही देणे, याला ज्ञानेश्वरीचे वाचन म्हणतात. ज्ञानेश्वरीचा पाठ करणे असे म्हणतात. अशा पाठाने काय होणार आहे? असा सामान्यांचा प्रश्न असतो. यावेळी असा आपणच आपला मागोवा घ्यावा. आपण जन्माला आलो तेव्हां आपणास कांही कळत नव्हते. काही दिवसांनी आई आणि त्यानंतर वडील वगैरे समजू लागले. आई जे शब्द बोलते ते ऐकून आपण प्रथम बोबडे आणि नंतर बरोबर उच्चार करू लागलो. आईच्या सततच्या सान्निध्यामुळे आईच्या शब्दाचे अर्थ कळू लागले. आईने सांगितले की ते पुस्तक मला दे. तर त्या शब्दाचा अर्थ कळल्यामुळे आपण लगेच क्रिया करतो. पुढें आणखी मोठे झालों. आपल्या हातून काही चूक झाली की आई म्हणते , "आतां तूं फार शहाणा झालास". आईचे हे शब्द ऐकून आपण शहाणे झालो म्हणून आनंद होण्याऐवजी आपणास ओशाळे वाटते. दुःख होते. कारण आईच्या सततच्या सान्निध्याने आईच्या शब्दांत लपलेला अर्थ आपणांस ज्ञात होतो. त्याप्रमाणे ज्ञानेश्वरीच्या सततच्या अभ्यासाने सरळ अर्थ आणि त्या नंतर भावार्थ ज्ञात होईल. आनंद हे त्यांचे दर्शन आहे. या सर्व विवेचनाचा सारांश असा की -

तैसी पाठाची ते वाटी । श्लोकपाद लावा ना जंव वोठीं ।
तंव ब्रह्मतेची पुष्टी । येईल अंगा ।। ज्ञा. १८-१६९२

केवळ या वाचनाने ब्रह्मपुष्ट होता येईल अशी ज्ञानदेवांची ग्वाही आहे. कांहीं लोक अर्थशून्य पारायणाने काय होणार आहे याचे हे मार्मिक उत्तर आहे. अर्थात हे पारायण किंवा पाठ मागे सांगितल्याप्रमाणे करावयाचा आहे. या क्रिया पुढील भल्याच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाच्या आहेत. ज्ञानेश्वरीचा शब्दार्थ कळेल पण त्या पुढचा अर्थ केवळ गुरुमुखानेंच समजावून घ्यावा लागेल. या अवस्थेपर्यंत सामान्य साधक येऊ शकतो. अवघड आहे तें पुढेंच आहे. गुरुमुखांतून जो अर्थ ऐकला त्याला भावार्थ म्हणतात. हा भावार्थ आचरणांत आणणे हा ज्ञानेश्वरीचा खरा अर्थ आहे. याला आचारार्थ म्हणतात. हा एकदा मनांत गुंजारव करू लागला म्हणजे आचार आपोआप घडूं लागतात.

माझ्या परिचयाचे एक डॉक्टर आहेत. ज्ञानेश्वरी वगैरे संत ग्रंथाचा उत्तम अभ्यास आहे. ज्यावेळी ते डॉक्टर झाले आणि त्यांनी आपला दवाखाना प्रस्थापित केला तेव्हां त्यांनी ठरविलं औषधाचे पैसे कोणाकडेही मागावयाचे नाहीत आणि कोणावरही रागवायचे नाही. इतकंच नव्हे, तर माझा रागावलेला चेहरा कोणालाही दिसतां कामा नाही. गेली पन्नास वर्षं किंवा त्यापेक्षा अधिक काळ ते वैद्यकीय सेवा करीत आहेत. आश्चर्याची गोष्ट म्हणजे एकदां त्यांना मी विचारले तेव्हां ते म्हणाले, 'एवढ्या मोठ्या प्रदीर्घ काळांत दोनचार हजार बुडाले असतील पण सेवेनें तरलेले त्यापेक्षां कितीतरी अधिक आहेत, हा ज्ञानेश्वरीचा आचारार्थ. तो अंगी बाणणं अवघड असलं तरी अशक्य नाही.

ज्ञानदेवांचे धर्मकीर्तन लोकांच्या प्रापंचिक अवयवांना परमार्थाचें वळण लावतें याचा अनुभव असंख्य लोकांच्या पदरीं आहे. मी तर म्हणेन की लोहाला परिस लागला तर त्याचं सोनं होतं. त्याप्रमाणे ज्ञानदेवीच्या स्पर्शानं प्रपंचाचं सोनं होतं. परंतु अन्य संतांच्या शब्दांत सांगायचं तर ज्ञानेश्वरीचा स्पर्श ज्यांच्या अंतःकरणाला होईल त्याचा परिस होतो. प्रपंच हें परिसस्पर्शाचं अगदी अलीकडचं रूप आहे. तर परमार्थाची सर्वोच्चता ही परिसाची सर्वोत्तमता आहे. परिसाच्या स्पर्शानं दुसरा परिस तयार करणं ही क्रिया फक्त ज्ञानदेवीच्या सान्निध्यांतच होते. परमेश्वरासाठीं निर्माण झालेल्या पंडिती शास्त्रें या बाबतींत पांगळी आहेत. ज्ञानेश्वरीच्या सान्निध्यांत तृप्त झालेला मनुष्य, मनुष्याला केवळ तृप्तीची वाट दाखवीत नाहीं तर आपल्याप्रमाणें तो त्याला तृप्त करतो. या सर्व क्रियेच्या पाठीमागें एक सुप्त अवस्था माणसाजवळ असावी लागते. परिस लोहाला लागला तर त्याचे सोने होते. तांबे, पितळ, कथील वगैरे धातूंना त्याचा स्पर्श झाला तर त्यांच्यामध्यें जराही फरक होत नाही. त्याप्रमाणे माणसाजवळ अहंकारादि दोषांची जी झळाळी आहे ती नाहीशी होऊन तो साधासुधा श्रद्धाळू झाला तर त्याच्या प्रपंचाचं सोनं होतं आणि काही काळानें त्या सोन्याचा परिस बनतो.

ज्ञानदेवांचे हे धर्मकीर्तन इतके महान आहे. ज्यांना क्षुद्र असे समजण्यांत येतें त्यांना ज्ञानदेवांचा स्पर्श होतांच ज्ञानदेवांप्रमाणे ते देखील संतपदवीला प्राप्त झाले. चोखामेळा, गोराकुंभार, सांवतामाळी, बंका, जनाबाई, कान्होपात्रा, सेना न्हावी अशी कितीतरी उदाहरणें सांगता येतील. एकनाथ महाराजांच्या शब्दांत सांगायचं तर ज्ञानदेव ज्ञानदेव, म्हणतां ज्ञानदेवची होतो, त्याप्रमाणे ज्ञानदेवीच्या सतत सान्निध्याने मनुष्य ज्ञानेश्वरीमय होतो.

असें हे धर्मकीर्तन जात-पात, धर्म-पंथ, श्रीमंत-गरीब, देश-काळ यांच्या प्राकृतिक बंधनांत बद्ध होणारे नाही. तें सर्वांसाठी आहे. ज्ञानेश्वर महाराज ज्ञानेश्वरी सांगत असताना श्रोत्यांच्या डोळ्यांत दिसणारी शंका ओळखून त्यांचे निरसन करण्याच्या निमित्ताने म्हणतात -

पांख फुटे पांखिरूं । नुडे तरी नभींच स्थिरू ।
गगन क्रमी सत्वरू । तो गरूडही तेय ।। ज्ञा. १८:१७१२
राजहंसाचे चालणें । भूतळीं नाहलीया शाहाणें ।
आणिकें काय कोणें । चालावेंचि ना? ।। ज्ञा. १८:१७१३

ज्याला नुकतेच पंख फुटू लागले आहेत असं पाखरू आणि

झेप घेणारा गरूड दोघेही एकाच आकाशांत फिरतात. ते आकाश त्या दोघांनाही सारखेच आहे. राजहंस पक्षी चालू लागला म्हणजे शहाणे लोक मान डोलावतात म्हणून अन्य कोणी चालूच नये की काय? राजहंस असो नाही तर अन्य कोणी असो. चालण्याचा आधार म्हणून दोघांनाही भूमी सारखीच. त्याप्रमाणे अडाणी असो अगर शहाणा असो सर्वांना या धर्मकीर्तनाचा लाभ घेण्यांत कोणतीच अडचण नाही. जे आहे ते सर्वांचे आहे. याच संदर्भात जाणत्या माणसांना ज्ञानेश्वर महाराज एक जाणीव करून देतात. या निमित्ताने त्यांचा धर्म कोणता ते सूचित करतात. तुम्ही जाणकार मंडळी सर्व सन्तजन आहांत. सोज्वळ आहांत, तुम्हाला ज्याप्रमाणे या धर्मकीर्तनाचा आश्रय करावासा वाटला त्याप्रमाणे अन्यांना सुद्धां त्याचा आश्रय करावा असे वाटते. त्या अज्ञ जीवानां धर्मकीर्तन ऐकून माहीत आहे. तुमच्यासारख्या श्रेष्ठांच्या मुखांतून त्यांनी त्याची कीर्ती ऐकली आहे. परंतु त्या धर्मकीर्तनाची आणि त्यांची गाठभेट मात्र अद्याप होत नाही. या दोघांची भेट घडवून आणून त्यांना सुद्धा सुमार्गी करणं हा तुमचा धर्म आहे.

गीता निष्कपट माय । चुकोनि तान्हें जें हिंडे वाट ।
तें मायपूतां भेटी होय । हा धर्म तुमचा ॥ (ज्ञा. १८-१७८२)

गीता म्हणजेच हें धर्मकीर्तन कोणत्या कलुषित वृत्तीला थारा न देणारी निष्कपटी आई आहे. अज्ञानी जीव म्हणजे चुकलेली याच आईची लेकरें आहेत. या विश्वाच्या पसाऱ्यांत आई आई असें कळवळून हाकारीत ती दिशाहीनपणे हिंडत आहेत. त्याच विश्वाच्या पसाऱ्यांत तुम्हीही आहांत. ही बापडी लेकरे तुम्हाला आढळली, भेटली तर त्यांच्याकडे दुर्लक्ष करू नका. तुम्हाला ज्या मायेनं जवळ करून आनंदानं या विश्वांत विहार करायला शिकविलं, ती माय आहे या जाणिवेनं किंचित दूर गेलांत तरी प्रेमाकर्षणानं आईजवळ येऊन तिला लडिवाळपणें बिलगता. त्या मायेची आणि त्या चुकलेल्या लेकरांची भेट घडवून आणणं हे तुमचं कर्तव्य आहे. तुमचा तो धर्म आहे. अशा या भेटीतून त्यांना सुखाचा आणि वैभवाचा आश्रय लागेल.

ज्ञानदेवांच्या या उक्तीप्रमाणेंच ज्ञानदेवांच्या आश्रयाने मोठे झालेले लोक अज्ञानी लोकांना ज्ञानदेव आणि ज्ञानदेवी यांची ओळख करून देतात. या क्रियेला एक सांप्रदायिक महत्त्व आहे. आज ज्ञानदेवांपासून हा संप्रदाय प्रवाहित होत होत आपणापर्यंत आला आहे. या प्रवाहामध्ये अवगाहन करण्याच्या निमित्तानें अनेक अज्ञ जीव याकडे धांव घेतात. या प्रवाहाला ते आपल्या विविध अवस्थेतून मान देऊन त्यामध्ये अवगाहन करतील त्याप्रमाणे त्यांचे दोष जातील. ज्ञानदेवांच्या शब्दांत सांगायचं झालं तर या प्रवाहांत जे आपलं शरीर धुतील त्यांची बाह्य मलिनता नाहीशी होईल मनाच्या शुद्ध व्यापारानें जे या प्रवाहांत स्नान करतील त्यांची अंतःकरणे दिव्य तेजाने भरून जातील. त्या तेजाला लोभावलेले लोक तीर्थ म्हणून त्यांच्याकडे धांव घेतील आणि त्यांचेही तीर्थक्षेत्र होण्यास वेळ लागणार नाहीं.

तीर्थें बाह्यमळु क्षाळे । कर्मे अभ्यंतरे उजळे ।
एवं तीर्थे जाण सकळे । सत्कर्मेचि ॥ ज्ञा. १८-१६०

या धर्मकीर्तनाच्या प्रवाहात कोणी कोणत्या भावनेने अवगाहन करावे हे ज्याचे त्याने ठरवायचे आहे.

सन्त नामदेवांच्या वचनांत अखेर एवढेंच म्हणता येईल कीं हे धर्मकीर्तन म्हणजे एक सोज्वळ आणि चिरंजीवी अलंकार आहे. गीता-अलंकार नाम ज्ञानेश्वरी-गीता हे चोख सुवर्ण आहे. त्या सुवर्णांतून ज्ञानदेवांनी हा अप्रतिम, सर्वांना सहज धारण करतां येईल, प्रकृतीला पेलवेल, आणि परमार्थालाही देखणे करील असा हा अलंकार निर्माण केला. इतरांनी दागिना केला पण ज्ञानदेवांना दागिना आवडत नाही म्हणून त्यांनी अलंकार तयार केला. दागिना आणि अलंकार यांमध्ये फरक आहे. ज्याला डाग लावून आकाराला आणले जातें तो दागिना. व्यवहारी जगांत सुद्धा दागिन्याची किंमत कमी असते, पण अलंकाराचे तसें नाही. शुद्ध सोने पवित्र असते. त्याला कोणताही डाग न लावतां मंगळसूत्रासारखा अलंकार निर्माण केला तर त्यांतून चिरंतन अहेवपणाचें दर्शन घडते. अहेवपणाला ज्याप्रमाणे उपमा नाही त्याप्रमाणे या धर्मकीर्तनाला सुद्धा उपमा नाही. ज्ञानदेव म्हणतात-

म्हणौनि तुम्हीं मज संतीं । ग्रंथरूप जो हा त्रिजगती ।
उपयोगु केला जो पुढतीं । निरुपमु जी ॥ ज्ञा. १८:१७९१
किंबहुना तुमचे केले । धर्मकीर्तन हे सिद्धी गेले ॥
तेथ माझे जी उरले । पाईकपण ॥ ज्ञा. १८-१७९२

असे हे धर्मकीर्तन सिद्ध झाल्यावर ज्ञानदेवांनी एक इच्छा प्रगट केली की या धर्मकीर्तनाच्या योगे

तैसा वाग्विलास विस्तारु । गीतार्थे विश्व भरू ।
आनंदाचे आवारू । मांडु जगा ॥ ५९
फिटो विवेकाची वाणी । हो कानामनाची जिणी ।
दिसो आवडे ते खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ६०
दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।
रिघो महाबोध सुकाळां । माजीं विश्व ॥ (ज्ञा. १३-११६१)
पुंडलीक वरदा हरि विठ्ठल ।
श्री ज्ञानदेव तुकाराम ॥

– स. कृ. देवधर
कृतार्थ सहकारी संस्था,
पुणे सातारा रस्ता,
पुणे ४११ ०३७.

# 'ज्ञानेश्वरी' मराठी साहित्याचा कंठमणी

डॉ. उषा मा. देशमुख

॥१॥ मराठी साहित्य विश्वातील हिमालय, क्षीरसागर, प्रकाशमान लखलखता माध्यान्हीचा सूर्य, पावसाची श्रावणझड, रातराणीचा, केवड्याचा, सोनसाखळीचा, गुलाबाचा, मोगऱ्याचा मत्तसुगंध, सायंकालीन क्षितिजावरची चंद्रकोर म्हणजे ज्ञानदेवांचे साहित्य होय. तत्त्वचिंतकाला, अभ्यासकाला, समाजशास्त्रज्ञाला, वारकऱ्याला, शिक्षणशास्त्रज्ञाला,भक्ताला साऱ्यांनाच गेली सात शतके ज्ञानदेवांच्या साहित्याने झपाटून टाकले आहे. नव्हे, विनोबाजी भावे म्हणतात त्याप्रमाणे 'मराठी साहित्य उणे ज्ञानेश्वरी बरोबर शून्य' ही गोष्ट खरीच आहे. गेली सातशे वर्षे त्यांच्या ग्रंथांनी मराठी संस्कृती, धर्मविचार मानवकल्याणाची साधना, बहुजनसमाजाविषयी करुणा, अहिंसा ही शिकविली आहे आणि मूल्ये जतन केली आहेत. ही मूल्ये कोणती? तर सामाजिक मूल्ये, सांस्कृतिक मूल्ये, धार्मिक मूल्ये, जीवनमूल्ये यांचा प्रचार आणि प्रसार भक्तीच्या सूत्रात गोवून समाजासमोर ठेवला. ज्या काळात ज्ञानदेवांनी 'धर्मकीर्तन' केले तो काळ कसा होता? सामाजिक वास्तवाचे स्वरूप काय होते? समाजाची आणि लोकसमूहाची स्थितिगती काय होती? हे सर्व ऐतिहासिक तपशील आपणास आज ज्ञात आहेत. व्रतवैकल्ये, अंधश्रद्धा, अनेक देवतोपासना, कर्मकाण्डाचा अतिरेक अशा अवस्थेत समाजाची अवस्था निर्नायकी झाली होती. कायदा आणि नियम धर्माधिष्ठित असे होते. प्रवाहपतित समाजाला भक्तीची साधना आणि लोककल्याणाचा मार्ग संतमहंतांना दाखवायचा होता. त्यात ज्ञानदेवपूर्व काळात नाथसंप्रदायाने आणि महानुभाव संप्रदायाने अहिंसा, करुणा आणि समतेच्या अंगाने प्रदान केला.

॥२॥ ज्ञानदेवांनी 'ज्ञानेश्वरी' हा श्रोतृसंवाद, 'चांगदेव पासष्टी' हा पत्रसंवाद, 'अनुभवामृत' हा आत्मसंवाद आणि 'अभंगगाथा' म्हणजे लोकसंवाद साधला आहे. ज्ञानदेवांना चातुर्वर्ण्याची चौकट मोडता आली नाही ही वस्तुस्थिती आहे पण त्यांनी कर्मविहित चातुर्वर्ण्य मान्य केला. जातिनिहाय नव्हे! ही आजच्या टीकाकारांनी गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे पण त्याकडे दुर्लक्ष केले जाते. अन्यथा इतर सर्व बारा बलुतेदारांसह सर्व स्तरांतील माणसं ज्ञानदेवांच्या माणुसकीच्या पंखाखाली आले नसते आणि भक्तांची मांदियाळी निर्माण झाली नसती. स्त्रिया आणि शूद्र यांना ज्ञानदेवांनी मोक्षाचे वाटेकरी करून घेतले. सावतामाळी, चोखामेळा, चोख्याची महारी, निर्मला, बंका, विठा, गोंदा, नामदेव, नामदेवाचे वीस माणसांचे कुटूंब, जनाबाई, गोराकुंभार, कान्होपात्रा अशी कितीतरी संतमंडळी ज्ञानदेवांच्या शिकवणुकीने तयार झालेल्या मार्गाने आत्माविष्काराच्या साहाय्याने भक्तीची वाट आक्रमू लागले. आणि तत्कालीन प्रस्थापित समाजवास्तवात भक्तीच्या माध्यमातून सुरूंग लावले आणि आध्यात्मिक लोकशाहीची मुहूर्तमेढ रोवली.

॥३॥ ज्ञानदेवांनी संवाद माध्यम जे स्वीकारले ते प्रामुख्याने आर्ष महाकाव्ये, पुराणग्रंथ, उपनिषदादी ग्रंथ यातून स्वीकारले आणि परंपरेशी एकीएके नाते जोडले ते गीतेच्या भावार्थ निरूपणाने! ज्ञानदेवांचा त्यांच्या सर्व साहित्यातील अत्यंत लोकप्रिय आणि जनमानसात घर करून बसलेला ग्रंथ म्हणजे 'ज्ञानेश्वरी'. 'नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एकतरी ओवी अनुभवावी'॥ त्याप्रमाणे आज साडेसातशे वर्षे मराठी माणूस 'ज्ञानेश्वरी' अनुभवत आहे. वारकरी परंपरेत धर्मग्रंथाचे आद्यत्व 'ज्ञानेश्वरीला लाभले आणि 'ज्ञानेश्वरी', 'एकनाथी भागवत' व 'तुकारामगाथा' ही वारकऱ्यांची प्रस्थानत्रयी ठरली. ज्ञानेश्वरीतील उपासनेचा, तत्त्वज्ञानाचा, साधनेचा प्रभाव आणि संस्कार नंतरच्या काळात सर्व संतकवितेवर झाला. आणि पंढरीचा विठोबा सर्व संतांनी लेकुरवाळा करून टाकला. 'विठू माझा लेकुरवाळा । संगे गोपाळांचा मेळा' अशी भक्तिमार्गाची वाटचाल तेराव्या शतकात सुरू झाली आणि पुढे पाचशे वर्षे ती जोपासली गेली. 'जो जो दिवस उगवला । तो तो सफल केला ज्ञानदेवे ।' अशी अवस्था निर्माण झाली. उपनिषदांतील अध्यात्मविचार, सांख्यांनी स्वीकारलेला सृष्टोत्पत्तीचा प्रकृतिपुरुष विचार, निर्गुण निराकार अशा ईश्वरी स्वरूपाचा मायावाद सांगणारा वेदांत, नाथसंप्रदायातून आलेली गुरुभक्ती आणि खडतर हठयोग या सर्व परंपरांचा समन्वय ज्ञानेश्वरीत झाला आहे. सर्व नद्या जशा सागराला मिळतात आणि तो क्षीरसागर अथांग जाणवू लागतो, त्याप्रमाणे भारतीय अद्वैतविचारपरंपरा ज्ञानेश्वरीत झिरपल्या आहेत. गीतेला 'अलंकारिले कवण कवणे' असा संभ्रम निर्माण व्हावा असे नवे रूप ज्ञानदेवांनी दिले आणि यथार्थदीपिकेचे भावलेणे साक्षात केले. ज्ञानदेवांनी सुटी गीता स्वीकारलेली नाही तर महाभारताच्या पार्श्वभूमीवर त्यांनी गीतेला अनुभवाचा विषय बनविले. महाभारतातील अभिजातता, सौंदर्यस्थळे आणि जीवननाट्यातील संघर्षस्थळे ज्ञानेदवांनी भक्तीच्या सागरात एकजीव करून टाकून 'विश्व विचरे विश्व होऊनी । विश्वामाजी ' अशी वैश्विक विराटता आपल्या अनुभवातून प्रगट केली. ज्ञानेश्वरीच्या अखेरचे पसायदान म्हणजे ज्ञानेश्वरीचा निष्कर्ष तर आहेच पण मानवकल्याणाचा

जाहीरनामा आहे असे म्हटले पाहिजे.

॥४॥ ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीचा रचनाबंधही हेतुपूर्वक असा केलेला आहे. गीतेला कोणतेही मंगलाचरण नाही पण ज्ञानेश्वरीत दोन, तीन, पाच, सात, आठ हे पाच अध्याय वगळता सर्व अध्यायांना मंगलाचरणे, प्रास्ताविके, माहात्म्यवर्णने, गणेशपूजा केलेली आहे. लोकनायक अणे यांनी म्हटले होते की, 'ही अध्यात्म प्रास्ताविक म्हणजे ज्ञानेश्वरी या धर्ममंदिराची गोपुरे होत.' खरोखरच ज्ञानेश्वरीची रचना धर्ममंदिरासारखी आहे म्हणून पहिल्या अध्यायात गणेशपूजा नव्हे वाङ्मयीन गणेशाची स्थापना ज्ञानदेवांनी केली आहे. आणि अखेरच्या अध्यायाला कळसाध्याय म्हटले आहे सतरावा अध्याय म्हणजे गीतारत्नप्रासादाचा आतला भाग आहे. नवव्या अध्यायात विश्वात्मक ईश्वराची प्रतिष्ठा ज्ञानदेवांनी केली आहे. हा अध्याय त्यांनी संजीवन समाधी घेतली त्या वेळी जवळ ठेवला होता असे म्हटले जाते हे लक्षात ठेवले पाहिजे. 'या कारणे मियां । गीतार्थु मऱ्हाठिया । केला लोकालागी या । दीठीचा विखो' असे ज्ञानदेवांनी म्हटले आहे.

॥५॥ बहुजन समाजाच्या उद्धरासाठी, स्त्री शूद्रांच्या प्रबोधनासाठी ज्ञानेश्वरी हा 'वाग्यज्ञ', 'धर्मकीर्तन' आरंभिलें व तो मराठी संस्कृतीचा आणि मराठी अस्मितेचा कंठमणी ठरला. बहुजन समाजाच्या बोली भाषेला प्रमाणभाषेचे, देववाणीचे लेणे चढविले. 'माझा मराठाची बोलु कौतुके । अमृतातेंही पैजा जिंके' असा आत्मविश्वास सिद्ध केला. त्यातून पुढे हा गंगौघ विकसित आणि विस्तारित होत गेला व बहुजनसमाजातील कवींनी आपली काक ओंजळ तीत घातली. 'बोल जैसे कल्लोळ अमृताचे' अशी प्रत ज्ञानेश्वरीला आहे आणि 'प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मची केले' अशी करुणेची मातृत्वाची पाखर ज्ञानदेवांचा अक्षरदेह 'ज्ञानेश्वरी' यानें मराठी माणसावर घातली ती आजपर्यंत !

अधिक तपशील : 'मराठी साहित्याचे आदिबंध', 'संत साहित्यदर्शन', 'साहित्यमुद्रा', 'ज्ञानेश्वरी दर्शन', ज्ञानेश्वरी एक शोध, ज्ञानेश्वरी चिंतन हे माझे ग्रंथ जिज्ञासूंनी बघावे.

डॉ. उषा मा. देशमुख
३, फुलराणी साहित्य सहवास,
बांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१.




વાપી-સેલવાસ રોડ રેલ્વે સ્ટેશન નજીક
ઓવરબ્રીજનો સીધા એપ્રોચ નો લાભ.
કનસ્ટ્રકશનના વર્ષો જુના અનુભવી આયોજકોનુ શાનદાર આયોજન.

ટુંક સમયમાં કબજો.

નાની અને મોટી એવી તમામ સાઈઝની દુકાનો તેમજ
પહેલા માળે સુંદર મજાની ઓફીસો તેમજ
ફલેટ બુકીંગ તથા વધુ માહીતી માટે મળો :




શીતલ એન્ટરપ્રાઈઝ
મહીલા અધ્યાપન મંદિરની સામે,
વાપી-સેલવાસ રોડ.
ફોન : ૨૨૯૪૯, ૨૫૧૦૪ (ઘર) ૨૨૮૧૫

# संत ज्ञानेश्वरांचा कर्मयोग

विद्यावाचस्पति शंकर अभ्यंकर

भारतीय संस्कृतीची धारणा आणि विस्तार भारतीय संतांनी समर्थपणे केला आहे. याला इतिहासाची साक्ष आहे. इ. स. ८ व्या शतकापासून भारतावर अनेक परकीय आक्रमणे झाली. आक्रमणांच्या या प्रतिकूल कालखंडात संस्कृती जगविण्याचे व परंपरेचे दीप विझू न देण्याचे श्रेय भारतीय संतांकडे जाते. महाराष्ट्रात या प्रवर्तनाचा प्रारंभ संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांपासून झाला आहे. आपली भाषा, आपल्या परंपरा, आपल्या संस्कृतीचे अनुबंध टिकून राहावेत म्हणून ज्ञानेश्वरांनी, "ज्ञानेश्वरीची' रचना केली. संस्कृत भाषेचे तत्त्वज्ञान गीतेमध्ये साररूपाने आले आहे. तोच ग्रंथ ज्ञानेश्वरांनी भाष्यासाठी निवडला. अवघे तत्त्वज्ञान सहज सुलभ करून या जगांत त्यांनी ब्रह्मविद्येचा कल्लोळ केला. एवढेच नव्हे, तर परा ज्ञान आणि परा भक्ती यांचा उत्तम समन्वय साधून त्यांनी भक्तीची वाट ही ज्ञानभक्ती या समन्वय मार्गात बदलली. "प्रबंध त्याजे जगाते । रक्षिले जाणा ॥" (१८.१७६५) अशी ज्ञानेश्वरीची थोरवी स्वतः ज्ञानेश्वरांनी सांगितली आहे.

**आत्मसाक्षात्काराचे तीन प्रधान मार्ग**

मानवाला ईश्वरी साक्षात्कार करून देणारे तीन प्रधान मार्ग म्हणजे कर्मयोग, भक्तियोग आणि ज्ञानयोग हे आहेत. मात्र हे तीनही मार्ग भिन्न नसून एकाच मार्गात साधकास अनुभवाला येणारे तीन टप्पे आहेत. कर्मातून भक्तीकडे आणि भक्तीकडून ज्ञानाकडे झेपावयाचे असते. संतांनी स्वकर्माचा आग्रह धरून जनसामान्यांना सन्मार्गाकडे वळविले. स्वतः संत ज्ञानेश्वर हे कर्मयोगाचे आग्रही पुरस्कर्ते आहेत.

**संतांवरील आक्षेप**

भगवद्‌गीतेतील "कर्म" शब्दावर ज्ञानेशांनी आपल्या "भावार्थदीपिके"त सविस्तर टीका केली आहे. अनेक दृष्टांताद्वारे प्रदीर्घ निरूपण करून कर्मयोगाची संकल्पना केवळ स्पष्ट केलेली आहे असे नव्हे, तर आपल्या चातुर्यपूर्ण निवेदनाने आणि तर्कशुद्ध विवेचनाने सामान्य माणसाच्या मनावर ही संकल्पना ठसवली आहे.

इतके असूनही ज्ञानेश्वरादी संतांनी समाजाला निवृत्तिवाद शिकवून सामान्य जनांना जीवनापासून, कर्मापासून वा प्रवृत्तिवादापासून दूर नेले आहे, असा एक मतप्रवाह आढळतो, हे एक मोठे आश्चर्यच म्हटले पाहिजे.

ज्ञानेशांचा कर्मयोग योग्य रीतीने न समजल्यामुळे आणि प्रवृत्ति- निवृत्ति संज्ञांची संकल्पना आपल्याच मनाशी स्पष्ट न झाल्यामुळे अज्ञानी जनांनी असा आक्षेप घ्यावा यात नवल मुळीच नाही. कारण स्वतः ज्ञानेश्वर म्हणतात त्याचप्रमाणे यथार्थ ज्ञानाची प्राप्ती जोपर्यंत होत नाही तोपर्यंत अज्ञानाचा अंधःकार नाहीसा होत नाही आणि या अज्ञानरूपी अंधःकारामुळे अनेक संभ्रमही मनात राहतातच.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**

वस्तुतः कोणत्याही महापुरुषाच्या कार्याचं वस्तुनिष्ठ मूल्यमापन करताना ज्या ऐतिहासिक वा सामाजिक पार्श्वभूमीवर हे कार्य प्रवर्तित झालं, ती पार्श्वभूमी लक्षात घेतली नाही तर त्या महापुरुषाच्या कार्याची महता ध्यानी येत नाही.

ज्ञानेश्वरांचं कार्य ज्या काळात (इ. स. तेरावं शतक-अखेर) प्रवर्तित झालं, त्यावेळी उत्तर भारत परकीय आक्रमणाखाली तुडवला गेला होता. तीर्थक्षेत्रे भ्रष्ट झाली होती. मंदिरे उद्‌ध्वस्त झाली होती. राहती गावे स्मशाने बनली होती. अन्यायाची, अत्याचाराची परिसीमा झाली होती. अस्मितेची नामोनिशाणी उरली नव्हती. व्यक्तिगत स्वार्थात लडबडलेला समाज अधःपतनाच्या खोल गर्तेत फेकला जात होता. क्षात्रधर्म संपला होता. स्वत्व हरपलं होतं. देवांना देवत्व राहिलं नव्हतं.

भारताचं, महाराष्ट्राचं भावनिक, सांस्कृतिक जीवन समूळ उद्‌ध्वस्त झालं.

अशा अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत स्वकर्माचं भान नसलेल्या निःसत्व समाजाला कर्मयोग शिकविण्यासाठी ज्ञानेश्वर सिद्ध झाले होते.

व्यक्तिगत स्वार्थातून अशा समाजाला बाहेर काढायचं असेल, तर विश्वात्मक पातळीवरून कर्माचा विचार झाला पाहिजे, हे त्या द्रष्ट्या महापुरुषानं ओळखलं होते.

संतांची निरीक्षणशक्तीच केवळ सूक्ष्म असते, असं नव्हे तर त्यांची निदानशक्तीही सूक्ष्मतम असते. ज्ञानेश्वरांची निदानशक्ती त्यांच्या विश्वात्मक पातळीचा विचार केलेल्या कर्मयोगाच्या सिद्धान्तावरून सुस्पष्ट होते.

ज्ञानेश्वरांना हे विश्व म्हणजेच कर्मयोगाचा प्रचंड यज्ञ वाटतो. त्यामुळं विश्वाचा घटक असलेला प्रत्येक मानव हा कर्मरहित असूच शकत नाही, हा त्यांचा सिद्धान्त आपोआपच सिद्ध होतो.

**"कर्मयोगाची संकल्पना"**

या कर्मयोगाची शिकवण देताना ज्ञानेश्वर वा अन्य कोणीही संत प्रवृत्तिनिवृत्तिचं विवेचन करतात त्यावेळी प्रवृत्ति म्हणजे

स्वार्थमय कर्मे आणि निवृत्ति म्हणजे निःस्वार्थ कर्मे असा सरळ अर्थ त्यांना अभिप्रेत असतो.

त्यामुळे ज्ञानेश्वर महाराज ज्यावेळी "निवृत्ति" विषयी बोलतात, त्यावेळी मानवानं निःस्वार्थ कर्मे आचरावीत, असं त्यांना सांगायचं असतं.

विश्वरूपी विराट आणि अखंड कर्माचा मानव स्वतः अंश असल्यामुळे तो स्वतः कर्मशून्य होऊच शकत नाही. त्याच्या इंद्रियाचा स्वभाव कायम असतो. श्रवण, पहाणे, श्वास, निद्रा-जागृती इत्यादि इंद्रियकर्मे कधीच बंद पडत नाहीत.

देखै विहित कर्म जेतुले । ते सकळ जरी ओसंडिले ।
तरि स्वभाव काइ निमाले । इंद्रियांचे ॥३.५४॥

"कर्म सोडले, कर्म सोडले" असं म्हणणाऱ्याची अवस्था रथात बसून स्थिर दिसणाऱ्या पण रथाच्या गतीने हिंडणाऱ्या माणसाप्रमाणं असते. म्हणूनच ज्ञानेश्वर स्पष्टच सांगतात.

म्हणौनि संगु जंव प्रकृतिचा । तंव त्यागु न घडे कर्माचा ।
एव करूं म्हणति तेयांचा । आग्रहो चि उरे ॥६३॥
जे उचित कर्म सांडिति । मग नैष्कर्म्य हों पाहांति ।
परि कर्मेंद्रिय प्रवृत्ति निरोधुनि ॥६४॥
तेया कर्मलागु न घडे । जे कर्तव्य मनी सांपडे ।
वरि नटति ते फुडे । दरिद्र जाण ॥६५॥

अर्जुनाच्या मिषाने ज्ञानेश्वर या ठिकाणी जनसामान्यानाच कर्मयोगाचा आदेश देतात. म्हणौनि जें जें उचित । आणि अवसरें करूनि प्राप्त ।

तें कर्म हेतुरहित । आचर तूं ॥३-७८॥

"स्वधर्म जो बापा । तो नित्ययज्ञु जाण पां ।" इतकी उदात्त भूमिका ज्ञानेश्वर कर्मयोगाच्या मागे गृहीत धरतात.

**"ज्ञानेशांचा स्वधर्म"**

ब्रह्मदेवांनी ज्यावेळी सृष्टी निर्माण केली त्यावेळी समस्त भूतमात्रांना त्यांनी "आम्ही तुम्हाला जो स्वधर्म नेमून दिला आहे, त्या स्वधर्माची उपासना करा" असं सांगितलं. (भगवद् गीता ३-१०) त्यावर भाष्य करताना ज्ञानेश्वर "स्वधर्मयज्ञ यजावे" असे आग्रहानं प्रतिपादन करतात.

एया स्वधर्मु पूज्य पूजितां । देवगणां समस्ता ।
योगक्षेमु निश्चिता । करिति तुमचा ॥

हा स्वधर्म आपल्या सहज प्रवृत्तिसारखा असला पाहिजे. ज्ञानेश्वर यास "निजवृत्ति" म्हणतात. हा स्वधर्म सांडला, वा ही निजवृत्ति टाकली, तर त्याचे किती गंभीर दुष्परिणाम होतील, याचा इशारा ज्ञानेश देतात.

तैसा स्वधर्मु जरि लोपला । तरि सर्व सुखाचा वारा मोडला ।
जैसा दीपासवे हारतला । प्रकाशु जाए ॥

तैसि निजवृत्ति जेथ सांडे । तेथ स्वतंत्रते वस्ति न घडे ।
आइकां प्रजा हो हे फुडे । विरिंची म्हणे ॥
म्हणौनि स्वधर्मु जो सांडील । तेयाते कालु दंडील ।
चोरू म्हणौनि हरिल । सर्वस्व तेयाचे ॥

स्वधर्म त्यागल्यास आणि निजवृत्ति विसरल्यास काय घडते हे सांगताना ज्ञानेश्वर जणू देशस्थितीचं भयंकर चित्रच रेखाटतात. माणसं स्वधर्मभ्रष्ट झाली की स्वातंत्र्य जाते आणि पारतंत्र्य येते. पारतंत्र्याबरोबरच दैन्य, दुःख आणि पातकंही येतात.

याचाच स्पष्ट अर्थ असा की विपन्न आणि लाचार समाज ज्ञानेश्वरांनी पाहिला होता. स्वकर्माची, स्वकर्तव्याची, निजवृत्तिची आठवण विसरलेला समाज ज्ञानेश्वरांना दिसत होता. म्हणूनच जनसामान्यांना ते सांगतात,

"बापहो! तुम्ही व्रतवैकल्ये करू नका. उपासतापास करून शरीरास कष्ट देऊ नका. तीर्थयात्रेचे श्रम घेऊ नका. कामनिक आराधना आणि मंत्रतंत्रादि अनुष्ठाने करू नका. फक्त एकच करा,

देवतांतरा न भजावे । हे सर्वथा काही न करावे ।
तुम्ही स्वधर्मयज्ञी यजावे । अनायसे ॥"

आणि इतकं सांगूनही ज्याची "निजवृत्ती" जागत नाही, त्याबद्दल ज्ञानेश्वर बोलतात.

अहेतुके चित्ते । अनुष्ठा पां ययाते ।
पतिव्रता पतीते । जियापरी ॥

परकीय आक्रमणाचे भयंकर परिणाम ज्ञानेश्वरांनी निरिक्षले होते आणि याचसाठी त्यांना आग्रहानं सांगावं लागलं.

अगा स्वधर्म हा आपुला । जरी कां कठीण जाहाला ।
तरी हाचि अनुष्ठिला । भला देखे ॥
या स्वधर्मति अनुष्ठित । वेचू होईल जीविता ।
तोहि निकापर उभयता । दिसत असे ॥

परकीय आक्रमणाची भीषण लाट आलेली असताना स्वधर्म आचरणं दिव्य होते. कारण कोणत्याही परिणामांची त्यासाठी तयारी ठेवणं आवश्यक होतं. तथापि स्वधर्म आचरण्यास कठीण असला, तरी तोच निष्ठेने आचरावा, असं ज्ञानेश्वर सांगतात ते "निजवृत्तिधर्म" जागवण्यासाठीच, यात संशय नाही.

आणि इतकं सांगूनही ज्याची "निजवृत्ती" जागत नाही, त्या बद्दल ज्ञानेश्वर बोलतात,

परिस पां सव्यसाची । मूर्ति लाहोनी देहाची ।
खंती करिती कर्माची । ते गावंढे गा ॥

स्वधर्माबद्दल ज्यांना अभिमान नाही, स्वकर्तव्याचा ज्यांना विसर पडला आहे, आणि देशस्थिती अवलोकन केल्यावरही ज्यांची निजवृत्ती जागृत होऊन बळावत नाही, त्यांना ज्ञानेश्वर "मूर्ख" म्हणतात.

**"कर्मयोग कसा आचरावा"**

पण हा कर्मयोग आचरण्यास अत्यंत कठीण आहे, हे ज्ञानेश्वरांना ज्ञात असल्यामुळे त्यावरचा रामबाण उपायही ते सांगतात आणि तो रामबाण उपाय म्हणजे भक्ती.

भक्तीमुळे अहंकाराचा लोप होतो, वासना दडी मारते, श्रेष्ठ, कनिष्ठ भावनेची कोळीष्टकं मनावरून दूर होतात. आणि मग "म्हणोनि थोरपण पुऱ्हा सांडिजे । एथ व्युत्पत्ती आपवली विसरिजे । जै जगा धाकुटे होईजे । तै जवळीक माझी ।।"

पण यासाठी आपल्याला प्रथम अहंकार त्यागला पाहिजे. का? त्याचे कारण असे आहे की अपरिहार्य कर्मे मनुष्य सहजपणे करतच असतो. पण अहंकारापोटी तो त्याचे कर्तृत्व स्वतःकडे घेतो आणि परिणामी सुखदुःखाच्या भोवऱ्यात सापडतो.

अहंकाराचा भ्रम प्रथम त्यागला पाहिजे. कारण प्रकृतीच्या गुणामुळे जी बरीवाईट कर्मे उत्पन्न होतात, त्याचा कर्ता मीच आहे, असा सामान्य माणसाचा एक भ्रम असतो. त्यामुळे प्रकृतीच्या आधीन होऊन जो वागतो व गुणांच्या सपाट्यात सांपडतो तोच कर्माने लिप्त होतो व त्याची वाईट फळे उपभोगतो.

यावरचा उपाय म्हणजे देहाभिमान अर्थात अहंकार सोडणे. आपण इंद्रियांच्या स्वाधीन न होता, इंद्रियांवर आपण विजय मिळवणे. त्यामुळे फलाशा सोडणे हा उपाय सहज साधतो.

कर्मे अपरिहार्य असल्यामुळे नैष्कर्म्याच्या गप्पा मारणारेही ढोंगी ठरतात.

की प्राप्त कर्म सांडिजे । येतुलेनि नैष्कर्म्य होइजे ।
हे अर्जुना वायां बोलिजे । मूर्खपणे ।।

मानवाची कर्मे त्रिगुणांच्या प्रभावाने निर्माण होत असतात. ज्ञान, ज्ञाता, ज्ञेय ही त्रिपुटी जगास कारणीभूत असून तिच्यापासून कर्माची निःसंशय प्रवृत्ती होते.

जनसामान्य इंद्रियांच्या सहाय्याने सभोवतालच्या विषयांचा भोग घेऊ इच्छितो. त्यावेळी त्याच्या सुखदुःखात्मक संकल्पनेला "ज्ञान" ही संज्ञा प्राप्त होते. ते ज्ञान नंतर कर्माचे रूप धारण करते.

सात्त्विक ज्ञान हे असते की ज्यांचा उदय झाल्याबरोबर ज्ञेय हे ज्ञात्यासह लीन होते. म्हणजेच भूतमात्रे अनंत असली तरी त्यांच्यामध्ये एकच अविनाशी चित्तत्व आहे हे समजणे हे सात्त्विक ज्ञान.

जे भूतमात्राचा भेदभाव मानते ते राजस ज्ञान. म्हणजेच अविनाशी एक तत्वाऐवजी अनेकत्वावर वा पृथकत्वावर अवलंबून राहणारे ते राजस ज्ञान होय.

आणि जे ज्ञान विधिरूपी वस्त्र पांघरल्या शिवाय संचार करते, जे श्रुतीला मानत नाही, ज्यात तत्वार्थाला स्थान नाही, ते तामस ज्ञान असते.

मानव जी जी कर्मे करतो, ती ती विश्वात्मक पातळीवरून विचार करता कल्याणकारी असली पाहिजेत, हे उघड आहे. यासाठी कर्माचे ज्ञान सात्त्विक असले पाहिजे. त्यासाठी मनोनिग्रह पाहिजे आणि उदंड अभ्यासाचीही तयारी पाहिजे. कारण

म्हणोनि अभ्यासासि काही । सर्वथा दुष्कर नाही ।।

तुकाराम महाराजही

"असाध्य ते साध्य करिता सायास ।
कारण अभ्यास तुका म्हणे ।।"

असा निर्वाळा देतात.

यासाठीच मानवाने सात्त्विक कर्मे केली पाहिजेत, असे मत ज्ञानेश्वर महाराज आग्रहाने प्रतिपादन करतात आणि त्याचे विवेचन करताना म्हणतात –

"कर्माचा मुळीच त्याग न करता जनकादिक मोक्षपदास गेले. म्हणून पार्था, कर्माचे ठिकाणी तू आस्था ठेव. कारण त्यापासून आणखीही एक उपयोग होणार आहे. त्या कर्माचे आपल्याकडून तसे आचरण झाले असता ह्या लोकांना वळण लागेल आणि त्यामुळे त्यांची दुःखे अनायसे नाहीशी होतील. ह्या लोकी श्रेष्ठ लोक जे आचरण करतात त्यालाच धर्म असे नाव ठेवून इतर लोक त्यांचेच आचरण करतात."

"अर्जुना, आता फार लांब दुसऱ्याच्या गोष्टी कशाला सांगत बसू? मीच या धर्माचरणात वागत आहे. मी निरिच्छ असूनही कर्ममार्गाचे आचरण करतो आहे."

वर्णाश्रमधर्मरक्षणासाठी कर्ममार्गाचे आचरण अत्यावश्यक असते. पण त्यातून ज्ञानेश्वरांवर काही अज्ञानी "ज्ञानेश्वर चातुर्वर्ण्याचा पुरस्कार करतात" असा आरोप करतात.

या ठिकाणी ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की स्वतः भगवंतांनी गीतेत वर्णन केलेली "गुणकर्मविभागशः चातुर्वर्ण्य" ज्ञानेश्वरांना मान्य असावा, यात तर्कशुद्धता आहे,

दुसरे असे की त्या काळी अस्तित्वात असलेली समाजाची चौकट उद्ध्वस्त करून नवीन चौकटीची निर्मिती ज्ञानेश्वरांना करायची नव्हती, तर समाजातील सर्व घटकांना त्यांना समपातळीवर आणून ठेवायचं होतं, यासाठीच

जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ।
हा भक्तियोग निश्चित । जाण माझा ।।

अशी उदात्त शिकवण ते समाजाला देतात आणि त्याचबरोबर

म्हणोनि कुळजाति वर्ण । हे आघवेचिना अकारण ।
एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ।।

अशी आपली असंदिग्ध भूमिकाही मांडतात.

कर्मयोगाचे आचरण करण्यात आणखी एक प्रश्न निर्माण होतो. कारण कोणतेही कर्म करताना मानव अपरिहार्यपणे इतर अनेक घटकांपाशी सुसंवाद साधण्याचा प्रयत्न करत असतो. मानव समाजात राहतो. संघटना करतो. त्याचे नीतिनियम तयार करतो. अशावेळी कर्म करत असताना अनेक विसंवाद निर्माण होण्याची शक्यता असते. त्यासाठीच कर्म कोणत्या युक्तीने करावे किंवा त्यासाठी कोणते पथ्य पाळावे, हा प्रश्न आपोआपच निर्माण होतो.

याचे उत्तर देताना ज्ञानेश्वर भगवंतांच्या मुखातून अर्जुनाला उपदेश करताना म्हणतात -

"देहाचे पाशात गुंतून आणि इंद्रियांचे लाड पुरवून जे माझ्या मताचा तिरस्कार करून टाकून देतात, ते मूर्ख असल्यामुळे त्यांना माझा विचार रुचत नाही. म्हणून कोणी विचारवान मनुष्याने ह्या इंद्रियांचे कौतुकाने सुद्धा लाड पुरवू नयेत. इंद्रियांपासून कर्माची प्रवृत्ती होते. म्हणून या इंद्रियांना अगोदर सर्वथैव जिंकून टाक.

आणि इंद्रियांना जिंकायचे असेल, तर यथार्थ ज्ञानाची आवश्यकता असते. व्यवहारातील कर्मे आणि परमार्थाची कर्मे यांना ज्ञानावाचून यथासांग पार नाही.

"म्हणोनि कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवे ॥"

हे मतही ज्ञानेश्वर आग्रहाने प्रतिपादन करतात.

स्वकर्म आचरलेच पाहिजे आणि तेही निष्काम बुद्धीने ही ज्ञानेश्वरांची भूमिका. कारण त्यामुळेच धर्माची धारणा होते, स्वातंत्र्याचा सूर्य तळपत राहतो, दुःख-दैन्याला थारा उरत नाही. स्वकर्म टाकून नैष्यकर्म्याच्या गप्पा मारणाऱ्या मानवाला

"जया ऐहिक धड नाही । तयाचें परत्र पुससी काई ॥"

अशी शाब्दिक चपराकही ज्ञानेश्वर देतात.

मात्र या कर्मयोगाचा विचार वैश्विक पातळीवरून केला पाहिजे. म्हणजे त्रिपुटी सांडून ज्ञानरूप दिवा अंतरी उजळतो. "जे जे भेटे भूत । तें तें मानिजें भगवंत । अशी व्यापक भूमिका बनते. "विश्व होऊनि विचरे विश्वामाजि !" या ज्ञानोक्तीचा मूर्त प्रत्यय येऊ लागतो. स्वधर्म श्रेय का? आणि परधर्म भयावह का? याचा उलगडा होतो.

"परमात्म्याशी सुसंवाद साधून तद्रूप होणारा, मानवी जीवनाला अर्थ प्राप्त करून देणारा, धर्माचे अभ्युत्थान घडवणारा, त्यागाचा यज्ञ चालू ठेवणारा, देवाची शुद्ध पुण्यात्मक गती प्राप्ती करून देणारा, लोकोद्धाराचा केवळ मार्गच" - तो हा संतश्रेष्ठ ज्ञानेश्वर प्रणित कर्मयोग होय.

डॉ. शंकर अभ्यंकर
'तृप्ती दिप' ४१,
एल्.आय.सी. कॉलनी,
४७/२, पर्वती, पुणे - ४११ ००९.

अभयराज इलेक्ट्रीकल्स
हाऊस ऑफ इलेक्ट्रीकल गुडस् अँड होम अप्लायन्सेस
अभयराज एन्टरप्रायझेस
इलेक्ट्रीकल कॉंट्रॅक्टर अँड होलसेल मटेरिअल सप्लायर्स
६८६/२ए/१ सिद्धीविनायक टॉवर,
पार्श्वनाथ नगर, कोठारी कॉलनीसमोर,
मेनरोड, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७.
फोन : ४४६६६५, ४३९८१४

# ज्ञानेश्वरीचे उगमस्थान आणि प्रगटन

श्री. ज्ञाननाथजी रानडे

*प्रवरेच्या पवित्र काठी, जाहली ज्ञान जागृती ।*
*समईच्या सुवर्ण ज्योती, मंदमंद तेवितसे ॥*
*घालोनिया पद्मासन, अर्धोन्मिलित दृष्टी जाण ।*
*मुखे बोलता मंगलाचरण, सत्‌चिदानंद लिहितसे ॥*
*जे अर्जुनासी बोलिला हरि, गुह्य जे कां गीते उदरी ।*
*तया उकलोनी "ज्ञानेश्वरी", ग्रंथा माजी लिहितसे ॥*

ही आणि अशी लौकिक अर्थाने रूढ असलेली ज्ञानेश्वरीची जन्मकथा जरी सर्वांना ज्ञात असली, तरी....

नेवासे येथील शिवमंदिरातील ज्ञानदेवाचे ते ज्ञानेश्वरी कथन म्हणजे सद्‌गुरू निवृत्तीनाथ ह्यांच्या आज्ञेने मांडलेला, तो एक ज्ञान यज्ञ होता, गीतार्थ निरूपण होते.

मागे पाठीराखा निवृत्तीराव, संगे सोपान मुक्ताई, पुढे सिद्ध प्रज्ञावंत अन् मुमुक्षु भाविक जनसमुदाय आणि तो भानुविलासिनीचा अमृत संचय करून घेण्यास सिद्ध असणारे सत्‌चिदानंद बाबा.....

अशा परिपूर्ण परिस्थितीत माऊलीच्या मुखातून ज्ञानेश्वरीसारखी रसाळ, मवाळ परिपक्व अन् प्रासादिक निर्मिती न झाली असती तरच नवल.

ज्ञानेश्वरी म्हणजे भावार्थ दीपिका, तिला भावार्थ दीपिका म्हणण्याचे कारण असे की जे भाव गीतेतही सांगायाचे राहून गेले, ते इथे माऊलीने अगदी हळूवारपणे प्रगट केले आहेत. तेथे भाव तर आहेच पण ज्ञानाची दीपिकाही आहेच, मार्ग दाखविणारी.

सर्व रसांनी परिपूर्ण, सर्व गुणकसास पूर्णत्वाने उतरणारा, ज्ञानेश्वरी वाचनाने, मननाने, अनुकरणाने असंख्य जीवांना वाचवणारा हा स्वयंप्रकाशी ग्रंथराज, ही ज्ञानदेवांनी उभ्या जगताला दिलेली एक अमर अक्षय अमौलिक अशी देणगी आहे.

आज सुमारे सातशे वर्षांचा काळ लोटला असला तरी मराठी मनातले ज्ञानेश्वरीचे स्थान हे अजूनही कायम आहे.

**अर्थगंधाची अनुभूती**

ज्ञानेश्वरीतील प्रत्येक ओवी, अन् त्या ओवीतला प्रत्येक शब्द, त्या शब्दामागचा शब्दार्थ, भावार्थ अन् गूढार्थ हा नित्य नूतन आहे. साधक, वाचक, अभ्यासक हा जसजसा त्याच्या अधिकाधिक जवळ जाईल, तसतशी अर्थगंधाची एक एक पाकळी उमलून एका आगळ्या वेगळ्या अनुभूतीचा आनंद मिळाल्याशिवाय राहणार नाही.

तर अशी ही नित्य नूतनाभवाचे दर्शन घडवणारी ज्ञानेश्वरी हिचे जे नेवासे येथे प्रगटन झाले; तिचे मूळचे उगमस्थान कोणते? ती कोठे अन् कशी उगम पावली हा विचार जिज्ञासूंच्या मनात येणे अगदी स्वाभाविक आहे.

ज्ञानेश्वरीचे बोट धरून ह्या प्रश्नाच्या उत्तरार्थ जर मागोवा घेत गेले तर माउली आपल्याला थेट घेऊन जाते ती त्र्यंबक येथील ब्रह्मगिरीवर.

*मज चैतन्य शंभूच्या माथां । जो निक्षेपू होता पार्था ।*
*तया गीतम जालासि आस्था । निधि तूं गा ॥ (अ. १५, ओ. ५७९)*

*बहुत काय बोलो पै गा । एका गीतमासीचि गंगा ।*
*येरां समस्तां काय जगा । वोहोळ जाली? ॥ (अ. १७ ओ. १२)*
*कां गीतमाचेनि मिषे । कलीकाळ ज्वरितोद्देशे ।*
*पाणि ढालु गिरीशें । गंगेचा केला ॥ (अ. १८ ओ. १६८९)*

ह्या ओव्यांमागचा गूढार्थ कळावा असे वाटत असेल तर त्यासाठी पुढील पौराणिक कथा ही नीटपणानं विचारात घ्यायला हवी.

शिवाच्या मस्तकी सदैव वास करणाऱ्या गंगेशी भांडण असल्याने पार्वतीने आपला पुत्र गणेश ह्यांच्या मदतीने एक योजना आखली. आपल्याच एका विश्वासू दासीला गाईचे रूप घेऊन तिने गौतम ऋषीचे आश्रमात घुसून साळी खाव्यात ही कामगिरी देण्यात आली. तसेच त्या गाईला गौतमांनी हाकलताच किंवा मारताच तिने तेथेच प्राण सोडावा म्हणजे.....

योजनेबरहुकुम गणेशाने ही गणेशभट्टाच्या रुपानं आधीच गौतम ऋषींचे आश्रमी प्रवेश मिळविला. ठरल्याप्रमाणे एक दिवस एक गाय ऋषिंचे आश्रमाच्या परिसरात घुसली व साळी खाऊ लागली. त्या गाईला पाहताच गौतमांनी तिला हुसकावण्याचा प्रयत्नही केला. पण ती काही जाईना.....

मग गौतमऋषीने एक दर्भ अभिमंत्रून तो त्या गाईवर फेकला मात्र..... अन् काय! ती गाय गतप्राण होऊन खाली पडली. बिचारे ऋषी विचारच करत राहिले....

अरे हे काय! आता हे गोहत्येचे पातक माझ्या माथी लागणार....छे....छे काय करावे, त्यांना तर काहीच सुचेना.

तेव्हा गणेशभट्टाने एक मार्ग सुचविला की, आपण तपाचरण

करून शिवास प्रसन्न करून घ्यावे. त्यांच्याकडून मस्तकावरची गंगा मागून घ्यावी. तरच तिच्या पावन स्नानाने तुमचे पाप मोचन होईल.

हा उपाय गौतमऋषींनाही पटला. त्यांनी खरोखरच घोर तपाचरण केले. शिव प्रसन्न झाले. पापक्षालनास्तव गौतमांनी मस्तकीची गंगाच मागितली. आणि शिवांनी त्यांना आपली एक जटा काढून दिलीही. ती जटा गौतमऋषींनी ब्रह्मगिरीवर औदुंबराच्या एका ढोलीत ठेवली. तेथूनच गंगेचा प्रवाह चालू झाला. तिच्या मंगल स्नानाने गौतमऋषी पापमुक्त झाले. गौतमांनी ती गंगा आपल्या ब्रह्मगिरी येथील प्रदेशात आणली. म्हणून तिचे नाव गौतमी असे पडले. पुढे तीच गौतमी गोदावरीच्या रूपानं ह्या प्रांतातून वाहू लागली.

हा पौराणिक कथेचा भाग येथे मुद्दाम नमूद करण्याचे कारण असे की.... ज्या ब्रह्मगिरीवर गौतमांचे पापक्षालन करणारी ही जलगंगा प्रगट झाली, उगम पावली तेथेच....

*ना आदिगुरू शंकरा । लागो नि शिष्य परंपरा ।*
*बोधाचा हा संसरा । जाला जो आमूते ॥*

*(अ. १८ ओ. १७५१)*

किंवा

*एवं गुरूक्रमे लाघले । समाधिधन जे आपुले ।*
*ते ग्रंथें बोधीनी दिधलें । गोसावी मज ....॥*

*(अ. १८ ओ. १७६४)*

आपले सद्गुरू निवृत्तीनाथ ह्यांना ह्याच ब्रह्मगिरी पर्वतावर श्री गहिनी नाथांचा अनुग्रह लाभला आणि....

तो सारा कथाभाग नीट समजून घेण्यासाठी आपल्याला ह्या चारही भावंडांच्या जीवनांत डोकावून पहावे लागेल.

निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान अन् छोटी मुक्ता ही आपेगावचे विठ्ठलपंत कुलकर्णी ह्यांची अपत्यं. प्रपंच्याचा डाव अर्धा टाकून विठ्ठलपंतांनी संन्यासाश्रम घेतला, ते संन्यस्त झाले. पण....पुन्हा गुरू आज्ञेप्रमाणेच त्यांनी गृहस्थाश्रमात प्रवेश केला.

गुरू आज्ञेचे पालन करीत केलेल्या त्या आचरणाला मात्र धर्ममान्यता नव्हती. धर्माच्या चौकटीत ते कृत्य बसत नव्हते, त्यामुळे त्यांना अवहेलना, टीका, इतकंच नव्हे तर जातीबाहेर काढून बहिष्कारले गेले. त्यांच्या मुलांना संन्याशाची पोरे म्हणून मानहानी स्वीकारावी लागली. कुणीही त्यांना जवळ उभे करीना. त्यांच्या सावलीनेही वीटाळ होऊ लागला. लोकांच्या दयेच्या माधुकरीलाही ते महाग झाले.

सारे आशेचे दरवाजे बंद होत असताना अखेर पैठणच्या ब्रह्मवृंदांकडे शुद्धीचा काही आधार मिळतो का पहावा... ह्या विचारांनी विठ्ठलपंतांनी पैठणला जाण्याचा निर्णय घेतला.

वाटेत त्र्यंबकेश्वरी कुशावर्तात स्नान करावे, ब्रह्मगिरीस प्रदक्षिणा घालाव्यात असे विठ्ठलपंत आणि रूक्मिणीबाई ह्यांच्या मनात आले, आणि....

प्रदक्षिणेची साधना चालू असतानाच एक दिवस अस्तमानास निघालेल्या भास्कराबरोबर त्याचा प्रकाशही मागोमाग जाऊ लागला. आकाशातला एक एक तारा चमकू लागला. रातकिड्यांचा आवाज त्या अंधाराची भयानकता अधिकच वाढवू लागला.... आणि त्याचवेळी एक प्रचंड मोठी वाघाची डरकाळी त्या कुटुंबियांच्या कानी आली. अंगाचा एकच थरकाप झाला, भयानं पाय नेतील तिकडे जो तो धावत सुटला.....आणि....

चुकलेल्या निवृत्तीची पावलं त्यांना घेऊन गेली ती एका गुंफेच्या दारात. सभोवतालच्या अंधारात गुंफेतला अंधुक प्रकाश त्यांना खुणावू लागला. कानी पडणारा 'सोहं' नाद त्यांना आकर्षित करू लागला. त्या आवाजाच्या अन् प्रकाशाच्या ओढीनं ते एका अज्ञात शक्तीकडे ओढले जाऊ लागले.

॥ जय अलख निरंजन ॥

थोडे पुढे जाताच न जाताच तोच त्यांच्या कानी धीर गंभीर वाणी पडली. "ये.... बाळा... ये,,, मी तुझीच वाट पहात होतो." त्या शब्दांनी निवृत्तींना एक दिलासा मिळाला. कुणाचा तरी आपल्याला आधार आहे, कुणीतरी आस्थेनं आपल्याला जवळ घेतेयू ह्या जाणीवेनंच ते सुखावले.

नाहीतर संन्याशाची मुलं, अब्रह्मण्यम्.... दूर व्हा दूर व्हा... असे म्हणत साऱ्यांनीच त्यांना दूर लोटल्याचा अनुभव त्यांना होताच की,

पुढे होऊन गुंफेतल्या ध्यानस्थ योगीराजाच्या पायी ते नतमस्तक झाले. जय अलख निरंजन! असा ध्वनी घुमला अन्... निवृत्तींच्या मस्तकावर तो सद्गुरू कृपेचा कर स्पर्श झाला. परिसाच्या स्पर्शाने लोखंडाचे जसे सोने होते, तसेच झाले जणू. देहाचे जडत्त्व, मीत्वाचे भाव गळून पडले, साऱ्या वृत्तीच्या पलिकडच्या निवृतीचा अनुभव त्यांना आला. आपण ईश्वर एकच आहोत, ह्या अहं ब्रह्मास्मी ह्या अवस्थेची त्यांना अनुभूती आली.

मस्तकीच्या सिद्ध कर स्पर्शाने, नयनाच्या ज्योतीने "ह्या हृदयींचे त्या हृदयी घातले" ह्या ज्ञानेश्वरीतील ओवीप्रमाणेच, ते आत्मज्ञान, ते सहज समाधी सुख, ते ज्ञानाचे गाठोडे, तो अक्षय आत्मज्योतीचा प्रकाश त्यांना ज्या योगीराजांकडून झाले,, ते होते, श्रीगहिनीनाथ.

ज्या ठिकाणी श्रीगहिनीनाथांनी निवृत्तींना नाथपंथाची दिक्षा दिली, अनुग्रह केला, ती जागा म्हणजेच "अनुपानसिल गुंफा" ही गुंफा आजही ब्रह्मगिरीवर दाखवतात.

तर अशा प्रकारे आदि देव महादेव ह्यांच्याकडून आलेला अन् मच्छिंद्र, गोरक्ष, चौरंगी, गहिनी, असे करीत करीत तो गुप्त

ज्ञानाचा ठेवा, ते समाधी धन, ती भक्तीची वाट, ती ज्ञानगंगा क्रमाक्रमाने व परंपरेने निवृत्तीनाथांच्या हाती आली.

असंख्य पापतापाने होरपळणाऱ्या जीवांच्या मुक्तीसाठी, सर्वसामान्य जनतेला योग्य मार्गाला लावण्यासाठी, त्याचा उद्धार, त्यांच्यात जागृती घडवियासाठी, सर्व प्राणीमात्रांच्या ठाई आस्था, प्रेम, जिव्हाळा निर्माण करण्यासाठी, धर्माचे रक्षण करण्यासाठी, साधी सोपी भक्तीची वाट सर्वसामान्य लोकांना दाखवण्यासाठी....

बाळा निवृत्तीराया.... तुझ्यासारखा तापलेला, पोळलेला, परिस्थितीचे चटके अनुभवलेला, सोशिक, सात्त्विक अन् भाविक अशाच जीवाच्या मी शोधात होतो.

॥ 'अहं' चा वाघ ॥

तुझ्या मागं जसा लागला तसा अहंचा, विकृतीचा, स्वार्थीवृत्तीचा वाघ ह्या समाजपुरूषाच्या मागेही लागलेला आहे. तो असंख्य जीवांना त्यांच्या खऱ्याखुऱ्या मोक्षवाटेपासून, सुखापासून दूर नेतो आहे.

समाजातल्या वाढत्या अज्ञानाने ते ज्याचं त्याचं सुख जे ज्याच्या त्याच्या जवळच आहे तेच तो बाहेर शोधतो आहे. माणसा माणसाला ओळख राहिलेली नाही. साधा भुतदयेचा धर्मही ते विसरलेत.... आणि म्हणूनच बा... निवृत्तीनाथा मी हे तुला दिलेले गुह्य ज्ञान. हा समाधी सुखाचा ठेवा तू पुढे ने अन् योग्यवेळी जनकल्याण लोकजागृतीसाठी त्याचे प्रगटन कर.

अशी गुरू आज्ञा घेऊन निवृत्तीनाथ एका भल्या मंगल पहाटेला घरी परत आले. परतलेल्या निवृत्तीला पाहताच विठ्ठलपंत अन् रुक्मिणीबाई ह्यांना अपार आनंद झाला.

विठ्ठलपंत तर त्या नाथदिक्षांकिताकडे पहातच राहिले. मागील चार पिढ्यांपासून लाभत आलेला नाथांचा आशीर्वाद अन् नित्य सांभाळून पुढे चालवत आणलेल्या पंढरीच्या वारीचाच हा कृपाप्रसाद आहे हे ते मनोमन जाणून होते. निवृत्ती परतताच त्यांची आणखी एक काळजी दूर झाली ती म्हणजे आपल्या मागे ह्या चिमण्या जीवांचे काय? त्यांना कोणाच्या आधारावर सोडायचे?

पैठणच्या धर्ममार्तंडांनी दिलेली देहांत प्रायश्चिताची शिक्षा भोगून मुलांचा तरी मार्ग मोकळा करायचा... पण कसा हाही प्रश्न निवृत्तीनाथांच्या आल्याने सुटला.

जीवनातल्या पुढे येणाऱ्या प्रत्येक सुखदुःखाच्या क्षणांना तोंड देत, साक्षीत्वाने त्यांना सामोरे जात, ती ईश्वरी सत्ता आपला अंतर्बाह्य कसा सांभाळ करते हे दाखवीत ज्या पावलांनी त्या मुलांना जीवनाच्या वाटेवर चालायला शिकवले त्या मायपित्यांच्या पावन पावलांच्या स्पर्शालाही पुढे थोड्याच दिवसांत ती मुलं पारखी झाली.

दादा! पैठणच्या ब्रह्मवृंदानी दिलेली शिक्षा भोगल्यानंतर आता तरी आमचा समाज आम्हाला आपले म्हणेल ना? शुद्धीपत्र देऊन आमच्या मौंजीस परवानगी देईल ना? सोपानाच्या ह्या प्रश्नानं निवृत्ती अन् ज्ञानदेव दोघेही उधुक्त झाले.

धाकुटी चितकला मुक्ताई हिनेही लडिवाळ हट्ट धरला. अन्...

शुद्धीपत्रासाठी पुन्हा एकवार ही भावंड पैठण येथे येऊन ब्रह्मवृंदापुढे उभी राहिली.

अमृतेश्वराच्या मंदिरात सर्व ब्रह्मवृंदांची सभा भरली. मुलांची मागणी शुद्धीपत्राची होती. शास्त्राधाराची बाडेच्या बाडे तपासली गेली. पण हवा असणारा आधार कोठेच मिळेना. "शुद्धीसाठी शास्त्राधार नाही!" हा एकमुखी निर्णय दिला गेला.... आणि....

कधी नव्हे तो राग ह्यावेळी निवृत्तीनाथांना आला. त्यांनी तो मोठ्या कष्टाने लपवला. पण सद्गुरूंच्या अंतरीची ती तगमग ज्ञानोबाला मात्र सहन झाली नाही. तो पुढे सरसावला. त्याच्या वाणीला एक विलक्षण धार आली.

सर्वां घरी परमेश्वर भरलेला आहे, तो तुमच्यातही आहे अन् आमच्यातही. मग तुम्ही तेवढे श्रेष्ठ अन् आम्ही मात्र शुद्राहूनही शूद्र का?

**सारी सभा थरारली**

ज्ञानोबाच्या ह्या प्रश्नांन सारी सभा थरारली. प्रश्न साधा होता पण उत्तर अवघड होतं. प्रश्न लहान होता पण उत्तर मोठं होतं अन् त्याहीपेक्षा ब्रह्मवृंदांचा अहंपणा त्याहूनही मोठा होता. शास्त्राच्या चौकटीत अडकलेल्या त्या भूदेवांना साधा भूतदया किंवा माणुसकीचाही विसर पडला होता. धर्म हा जीवांचा रक्षणकर्ता आहे तो भक्षणकर्ता नाही हेही ते विसरले होते. आपल्या श्रेष्ठत्वात आणि शूद्र पशू प्राण्यात ह्या पोराने काही फरक ठेवला नाही ह्याची खंत त्यांना बोचू लागली.

समोरून जाणाऱ्या रेड्याला बोलवून घेऊन ईश्वर सर्वत्र आहे ह्या तुझ्या बोलाची प्रचिती दाखव असे आव्हान ज्ञानोबाला करण्यात आले.

निवृत्तीनाथांच्या आशेनं त्यांनी ते स्वीकारले आणि आपल्या अलौकिक शक्तीने स्वतः पाठोपाठ त्या रेड्याच्या तोंडून वेदऋचा वदवल्या.

ह्या प्रकाराने ब्रह्मवृंदाने नुसत्या माना खाली घातल्या तर इतरेजनांनी मात्र ज्ञानेश्वर महाराज की जय असा जयघोष करीत त्यांच्या पायावर लोटांगण घातले. भर सभेत योग्यतेची साक्ष पटली अन् लोकसन्मानही मिळाला.

ज्ञानोबाचा ज्ञानेश्वर अन् ज्ञानेश्वरांचा ज्ञानेश्वर महाराज झालेला पाहताच, मुंगीच्या अंगच्या गरूड झेपेची साक्ष निवृत्तीनाथांना पटली. एक नवं स्वप्न त्यांच्या मनात आकारू लागलं.

त्या पैठण गावात माय-पित्याला देहदंडाची शिक्षा मिळाली

तेथेच पुत्राचा गौरव होऊ लागला. ही चारही भावंड परमेश्वरांचे अंशच आहेत ही गोष्ट बहुतेक लोकांना कळून आली आणि त्यांनी ज्ञानेश्वरांच्या भजन-किर्तन प्रवचनादिक कार्यास गर्दी करायला सुरवात केली. भागवत धर्माच्या कार्याला असा इथे श्रीगणेशा झाला. ते साक्षीत्वाने पाहणाऱ्या निवृत्तीनाथांच्या मनातला आनंद वारंवार प्रगटू लागला.

असा हा गौरवाचा क्षण पहायला आज खरं तर माय-पिता हवे होते... पण.. ते सन्मान, ते कौतुक सांगायचं कुणाला, कारण व्यक्तीगत तसं जवळचं कुणीच नव्हतं. भरल्या जीवनांत ती चारही भावंड एकटी होती. मात्र त्यात एकटेपणाची खंत नव्हती. इतरांशी तुटकपणा नव्हता. कारण दुःखाला कारणीभूत ठरणारी जी छिप्तता, त्यापासून हे चारही जीव दूर होते.

एका भल्या पहाटे अंतरीच हितगुज सांगण्यासाठी निवृत्तीनाथ गोदातटी गेले.

घाटाच्या एक एक पायऱ्या उतरून पुढे येणाऱ्या त्या सुपुत्राच्या भेटीसाठी ती पापक्षालिनी लोकमाता गोदावरी पुढे सरसावली. तिच्या लहरींनी त्यांच्या पायाला शीतल स्पर्श केला. पुत्र मातेच्या भेटीची साक्ष गालावरून ओघळणाऱ्या अन् पात्रांत पडणाऱ्या त्या आनंदाश्रूंच्या थेंबांनी दिली.

**अंतरीचं हितगुज**

गोदावरीचे पवित्र जल ओंजळीत घेत निवृत्तीनाथांनी आपल्या अंतरीचं हितगुज त्या लोकमातेला कथन केलं.

तेव्हा खळखळणाऱ्या लाटेतून ती पापक्षालिनी गौतमी, जी गौतम ऋषीच्या गोहत्या पाप मुक्तीसाठी ब्रह्मगिरीवर प्रगट झाली... मध्यंतरी गुप्त झाली अन् पुढे श्रीरामाने बाण मारून तिला प्रगट केले ती गंगामाई निवृत्तीनाथांना म्हणाली, "बा निवृत्तीराया, अरे गौतमांच्या निमित्ताने मी पापक्षालिनी म्हणून या भूतला आले. माझा उगम ब्रह्मगिरी पर्वतावर झाला. पण बाळा, केवळ देह शुद्धीनं काय होणार? देहाचा मळ स्नानाने दूर होईल पण मनाचा मळ, त्याची मलिनता, अज्ञान हे कशाने जाणार? त्यासाठी आता तू पुढे ये. माझ्याप्रमाणेच तुझ्या सद्‌गुरूकडून तुझ्यासाठी प्रगट झालेली ती ज्ञानगंगा, तो शाश्वत सुखाचा ठेवा, ती भक्तीची वाट, तू लवकर प्रगट कर. ह्या माझ्या जल लहरींबरोबरच तुझ्या ज्ञानगंगेचा ओघही उभ्या मानव जातीचे कल्याण करू दे."

"ज्ञानगंगेच्या प्रगटनाची आता फार गरज आहे. माणसा माणसातले उच्च-नीचतेचे अंतर, विषमता, अज्ञान, संकुचित, कोत्या विचारांची मनमानी ह्यामुळे समाजाची सुसंगत घडी विस्कटत आहे. तेव्हा आता ह्या क्षणी ज्ञानगंगेची गरज फार मोठी अन् आवश्यक झाली आहे. तेव्हा आता लवकरच तू ती ज्ञानगंगा सुपात्राकडे सुपूर्त कर अन् लोककल्याणार्थ ती प्रगट कर."

लोकमातेची आज्ञा शिरोधार्य मानून निवृत्तीनाथ परतले ते कसल्याशा पक्क्या विचाराने. आपल्या कनिष्ठ भावाकडून नव्हे सत्‌शिष्याकडून अमर अक्षय चंद्र सूर्याहूनही तेजस्वी असे वाङ्‌मय तयार करून घेण्याचे त्यांनी ठरविले. ज्ञानदेवांच्या अंगी विश्वाला गवसणी घालण्याची ताकद आहे हे ते जाणून होते. लोकमाता गोदावरीच्या आज्ञेप्रमाणे ते गुह्य ज्ञान, ते समाधी धन, ती ज्ञानसरीता त्याला सुपूर्त करायची तो सुपात्र नको का? कारण कोणतीही शक्ती तर योग्य त्याच्याच हाती गेली नाही तर ती फलदायी न होता विफल होते.

त्यावेळी तरी निवृत्तिनाथांना ज्ञानेदेवांशिवाय अन्य कोणतेच सुपात्र वाटत नव्हते. कारण ज्ञानदेव (महा विष्णू) हेच हे ज्ञान पेलण्यास समर्थ आहेत. मच्छो उदरी (मच्छिंद्रनाथ) ह्यांनीच तो बोध आधीच श्रवण केलेला आहेच की....

आणि म्हणूनच निवृत्तीनाथांनी ज्ञानदेवास अनुग्रहीत केले. त्यास ते गोसाव्याने बांधून दिलेले अक्षय समाधी धन सुपूर्त केले आणि तो ज्ञानदीप मनामनात लावत जाण्याची, त्या ज्ञानगंगेने लोकोद्धाराची आज्ञा केली.

पैठणचा निरोप घेऊन ती भावंड नेवाश्याच्या दिशेने वाटचाल करू लागली. नेवासे येथे जाण्यामागचे प्रयोजन असे की, तेथील नाथ सिद्धांच्या भेटी गाठी होतील. अन् कदाचित तेथेच त्या पुण्यपावन प्रवरेच्या काठावर..... नियोजित कार्याचा श्रीगणेशाही होईल.

धाकटी मुक्ता, होणारी सारी स्थित्यंतर जागृतीनं पहात होती. निवृत्तीदादांचा मनोदय तिनं जाणला होता, त्यासाठी केलेली ज्ञानदेवाची निवड ही तिला मान्य होती... पण.... ज्ञानदेवांकडून निर्माण होणारे ते अमर अक्षय वाङ्‌मय भविष्य काळासाठी जतन करून ठेवण्याचे कार्य कोण करणार? अशी शंका तिला मनोमन वाटत होती. तरीही ती मात्र सारे ओळखून शांत होती.

प्रवासाची मजल दरमजल करत ती चौघेही नेवाश्याला पोहचली. अन् तेथे एक अद्‌भूत घटना घडली.

**सच्चिदानंद कोण? कसे?**

आपल्या पती समवेत सती जाण्यासाठी निघालेली एक महिला ज्ञानदेवांच्या दर्शनासाठी आली. त्यावेळी ज्ञानदेव निजानंदात मग्न होते, त्यांनी केवळ काकणांचा आवाज ऐकला मात्र....अन् "सुभाग्यवती भव" असा आशीर्वाद दिला.

त्यावर बरोबरीचे लोक स्तिमित झाले कारण हीचा पती तर मेलेला... मग ह्या आशीर्वादाला अर्थ काय... लोकांत एकच चर्चा सुरू झाली.

निवृत्तीनाथांनी झाला प्रकार ओळखला. त्यांनी मुक्ताईला त्या महिलेस तिच्या पतीचे नाव विचारण्यास सांगितले.

तिने उत्तर दिले, "सच्चिदानंद"!

ते ऐकताच ज्ञानदेव हसत म्हणाले, माई अग हा तर "सत् चिद आनंद" ना, मग तो मरेल कसा पाहू बरं...

असं म्हणत त्या बालयोगी राजानं एकवार त्या महिलेकडे अन् समारेच्या प्रेताकडे पहात माऊलीच्या प्रियत्त्वाने हाक मारीत म्हटले, " उठ बरं सच्चिदानंद...." आणि खरोखरच तिचा पती उठून बसला.

माऊलीच्या त्या प्रियत्त्वदर्शनानेच लोकांनी त्यांना ज्ञानेश्वर माऊली ही पदवी बहाल केली. पुनर्जन्म झालेल्या सच्चिदानंदाने आपले जीवन ज्ञानेश्वर माऊलीच्या सेवेत घालवण्याची इच्छा प्रगट केली अन्....

भविष्यकाळातल्या निर्मितीचे लेखक म्हणून त्यांचीच निवड झाली.... अन् ज्ञानेश्वरीसारख्या अलौकीक ग्रंथराजाचे लेखनकार्य करण्याचे भाग्य त्यांना मिळाले.

नेवाश्यात शिवालयातल्या त्या शिवोधार स्तंभाजवळ बसूनच निवृत्तीनाथांच्या आज्ञेनं ज्ञानेश्वर माऊलीने गीतेवरील धर्मकिर्तनास प्रारंभ केला.

धर्मकिर्तनास गीता हा विषयच का?

ह्या धर्मकिर्तनास केवळ गीता हाच विषय का बरं ध्यावा अन् त्यावरील निरूपण, भाष्य हे प्राकृत मराठी भाषेतच का केले हाही प्रश्न मनात आल्यावाचून राहात नाही.

त्या शंकेचे उत्तरही शोधू जाता असे कळते की, प्रतिभासंपन्न ज्ञानदेवांना उपनिषद किंवा ब्रह्मसूत्र ह्या विषयावरही ग्रंथ निर्माण करता आला असता. पण तसे करून त्यांना कोणे पंडितांच्या सभेत मान मिळवायचा नव्हता. तर गुरू आज्ञेनं चालत त्यांच्याकडे आलेलं असं लोकजागृती, लोक कल्याण अन् समाज परिवर्तनाचे कार्य त्यांना करायचे होते. अध्यात्मासारखा गहन विषय हा संस्कृत भाषा न जाणणाऱ्या सामान्यजनांना कळावा म्हणून त्यांनी मऱ्हाठी भाषेची निवड केली. मऱ्हाठी भाषेच्या समृद्धतेची साक्ष त्यांनी प्रत्यक्ष" पटवून दिली. त्यांचे कार्य नियोजित होते. त्यांचे साध्य अन् साधन हे ठरले होते.

*तीरे संस्कृताची गहने । तोडोनीया मऱ्हाटीयां शब्द सोपाने ॥*
*रचिली धर्म निधाने । श्री निवृत्तीनाथे ॥*

ह्या शब्दांत ज्ञानेश्वर माऊली सांगते की, सर्व सामान्यांना कळावे, समजावे, त्यांनी तो बोध आचरणात आणावा, त्यांना तो कळावा म्हणून तो गीतार्थ बोध मी मऱ्हाठी भाषेत केला आहे. आता ज्ञानेश्वरीच्या निर्मितीसाठी आपण गीता हाच विषय का निवडला ह्याचे समर्थन करताना ज्ञानदेव म्हणतात की, –

*या गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी ॥*
*जेथ भवानी प्रश्न करी । चमत्कारोनी ॥*

गीता ही सर्वमान्य. महाभारतातला तो बोध केवळ एका अर्जुनापुरताच किंवा त्या एका विशिष्ट कालमर्यादेपुरताच संकुचित नव्हता तर... मनुष्य, त्याचे मन... त्या मनाची अतृप्ती, त्याची हाव, राग, लोभ, मद, मोह हे जोवर आहेत अन् ज्याला ज्याला त्या सर्वांतून मुक्त होऊन खऱ्या आत्मसुखाचे अधिकारी व्हावे असे वाटेल त्या त्या प्रत्येक जिज्ञासू, मुमुक्षु, अभ्यासकास तो गीताबोध हा नक्कीच मार्गदर्शक आहे.

ज्याला तो गीताबोध आपल्याला मिळावा असे वाटत असेल त्याने खऱ्या अर्थाने मात्र अर्जुन व्हायला हवे. सर्व वृत्तीरहित होऊन त्या माधवास शरण जायला हवे.

गीता नित्य नूतन अर्थाना व्यक्त करणारी आपल्या मनातील उद्दिष्टांना पोषक, ती त्या प्रभूची गोंडस वाङ्मयीन मूर्ती आहे ही श्रद्धा मनात धरूनच माऊलींनी ती गाय अमृतपान करवण्यासाठी दुभवली. व्यासांचा मागोवा घेत त्यांनी गीतेच्या अंतरंगाचे आगळे वेगळे दर्शन ज्ञानेश्वरीत घडवले.

ज्ञानदेवांच्या प्रतिभासंपन्न प्रज्ञेचा, त्यांच्या सूक्ष्म निरीक्षण शक्तीचा, त्यांच्या हळूवार मनोभावनेच्या अभ्यासाचा, त्यांच्या द्रष्टेपणाचा अविष्कार ज्ञानेश्वरीत पदोपदी जाणवतो. जन्माला आलेल्या प्रत्येक जीवाला कर्मबंधने तोडता येणार नाहीत. हे ते जाणून होते. म्हणूनच कर्म त्याग न करता कर्मयोगाचे सार सोपे करून दाखवताना ते म्हणतात, आपण करत असलेल्या कर्माचे कर्तेपण आपल्याकडे न घेता वाट्याला आलेले कर्म ईश्वरसाक्षीने अन् निर्हेतुक भावाने केले की, तेच निष्काम कर्म बनते. हे त्यांचे साधे सोपेपणाने सांगणेच अधिक चटकन सर्वसामान्यांना पटणारे नाही का?

**ज्ञानेश्वरी म्हणजे जीवनभाष्य**

ज्ञानेश्वरी म्हणजे काही ज्ञानदेवांनी केलेला गीतेचा शाब्दिक विस्तार नाही. तर तो प्रत्येक शब्द हा अनुभूतीचा आहे. तो एवढा मोठा ग्रंथ विस्तार अन् त्यांचे लेखन हे कोण्या एका विशिष्ट जागी झाले किंवा कोण्या विशिष्ट काळात झाले असे नाही तर जागृतीने, साक्षीत्वाने जीवनाचा, समाजाचा, माणसाच्या मनामनाचा, त्याच्या भावावस्थेचा अभ्यास करता करता ज्ञानदेवांना जे जे जिथे जिथे आणि जसे जसे दर्शन झाले तेच लोकांना पुढे मार्गदर्शक व्हावे म्हणून त्यांनी ह्या ग्रथांत शब्दांकित केले आहे.

६ व्या अध्यायाचे लेखन हे वृद्धेश्वरांच्या परिसरांत नाथपंथीय सिद्ध सत्पुरूषांच्या भेटीनंतर झाले आहे असे म्हणता येईल. कारण ह्या अध्यायात अनेक सुप्त नाथपंथीय संकेतांच्या अन् वैशिष्ट्यांच्या खुणा सुज्ञ जाणकाराला पहायला मिळाल्यावाचून राहात नाही. तेथील दर्शने इतकी भावूक की त्यांचा प्रत्यक्ष" अनुभव हेच खरे.

१२ व्या अध्यायात भक्तीमार्गाचे दर्शन घडवताना केलेल्या २२१ ते २२४ ह्या ओव्या म्हणजे माऊलीने घडवलेले वाङ्मीयन पंढरीनाथाचे दर्शन आहे. हे विठ्ठलाचे आगळे वेगळे भक्त चिन्हांकित घडवलेले दर्शन म्हणजे परंपरागत चालवलेल्या पंढरीच्या वारीचा प्रसादच म्हणावे लागेल.

ज्ञानेश्वरीच्या वाचनाने, पठणाने, मननाने, आचरणाने, अनुभूतीने जरी तो अपूर्व आनंद मिळणारा असला तरी पण त्याची परिपूर्ती ही पंढरीच्या पांडुरंगाच्या मीत्व हरण करणाऱ्या रूपाच्या दर्शनाशिवाय नाही हे माऊलीला माहीत होते.

**"श्री ज्ञानदेव म्हणजे ज्ञानभास्करच"**

ज्ञानमार्गाचा प्रचार करत, सामान्य लोकांना भक्तीचा सोपा मार्ग दाखवत ज्ञानदेव जेव्हा चंद्रभागेच्या काठी आले तेव्हा त्यांची अन् नामदेवांची भेट झाली.

चोखा मेळा, सावता माळी, गोरा कुंभार, नामदेव अशा समाजातल्या विविध थरातल्या संतमहात्म्यांच्या साक्षीने जेव्हा पंढरीच्या वाळवंटात श्री ज्ञानेश्वरी ग्रंथाचे वाचन झाले तेव्हा नाम मार्गाचे उपासक नामदेवराय इतके प्रभावित झाले की, त्यांनी ह्या ज्ञानभास्कराच्या पायी मिठीच घातली.

भक्तीच्या बळावर प्रत्यक्ष पांडुरंगाला जेऊ घालणाऱ्या नामदेवाचे नाम सामर्थ्यही माऊलीला उमजले.

भविष्य काळात माणसाला कर्मकांड करायला वेळ मिळणार नाही. त्यावेळी त्याला साधे सोपे असले साधन नको का? अन् ते म्हणजे एकच नाम.... नामाचा महिमा जाणून माऊलीने त्याचीही खबरदारी घेतली. भागवत धर्माच्या भरभक्कम पायावरच नामदेवरायांनी विस्ताराचे कार्य पुढे चालवले.

आपल्या अनुभव संपदेस शब्दांकित करताना ज्ञानदेवांनी मूळच्या गीतेच्या ७०० श्लोकांवर जवळ जवळ ९,००० ओव्या तयार केल्या. नानाविध भावतरंग हळूवारपणे उकलून दाखवले. गीतेतले गूढ ज्ञान साध्या सोप्या मऱ्हाठी भाषेत सामान्य लोकांना कळेल असे सांगितले आणि एवढे मोठे कार्य करूनही त्याचे कर्तेपण त्यांनी आपल्याकडे न घेता असे म्हटले की,

*सायिखडे याचे बाहुले । चालविल्या सूत्राचेनि चाले ॥*
*तैसा माते दावीसत बोले । स्वामी तो माझा ॥*

*(अ. १८ ओ. १७६८)*

**पसायदान : समाजपरिवर्तनाची तळमळ**

माऊलींची ही विनम्रता, ही लिनता,ह्या गुरू ठाईचा दृढ प्रेम भावो, खरोखरच वाखाणण्यासारखाच आहे. आपण आपले गुरू निवृत्तीनाथ ह्यांच्या आज्ञेने, प्रेरणेने अन् मार्गदर्शनानेच हे धर्मकिर्तन पूर्ण केले आहे असे माऊली मोठ्या विनम्रतेने सांगते.

दुर्जनंचा दुष्टभाव जावो, स्वधर्मसूर्य प्रकाशमान होवो, सर्व प्राणिमात्रांची मैत्री घडो, जो जे वांच्छील ते त्याला प्राप्त होवो, केवळ माझा समाजच नव्हे तर सर्व प्राणिमात्र सुखी होवोत असे व्यापक पसायदान ज्ञानदेवांनी ग्रंथ पूर्तीच्या वेळी मागितले आहे.

ती व्यापक मागणी, तो अभिप्रेत असणारा समाजातला बदल हे ज्ञानदेवांच्या अंतरी असणाऱ्या समाज परिवर्तनामागची तळमळ व्यक्त करते.

ज्ञानदेवांची भावार्थ दिपिका ज्ञानेश्वरी हा सर्वमान्य लोकोद्धारच आत्मरूप दर्शन घडवणारा आरसा आहे. तेथे ज्ञानाची मिठी अन् भक्तीची गाठ बांधलेली आहे. नामाचे अमृत अन् अमृतमय अनुभूतीचे नामातून दाखवलेले अलौकिक दर्शन आहे.

अशी ही अमृतरसाळवाणी, सर्वमान्य जनतेच्या अंतरी आपले अढळ स्थान मिळवत असताना.... प्रवाहा प्रवाहात बदल झाले. पाठभेद तयार झाले. नको असणारे शब्दार्थ जोडून त्यावर बुद्धीवाद्यांच्या कसरती चालू झाल्या. ज्ञानेश्वर माऊलीच्या समाधीनंतर सुमारे ३००-४०० वर्षांनंतर ह्या ज्ञानगंगेला नकळत आलेली मलिनता दूर करण्याची गरज निर्माण झाली.... आणि म्हणूनच....

*श्री ज्ञानदेव येवोनी स्वप्नांत । सांगितली मात मज लागी ॥*
*अजानवृक्षाची मुळी लागली कंठासी । येवोनी झडकरी काढी वेगी॥*
*(संदर्भ : एकनाथ गाथा-अभंग)*

गोदावरीच्या आणखी एका सुपुत्राकरवी हे कार्य करण्याचे ठरले.

ज्यांनी अवघ्या वयाच्या ७ व्या वर्षी गुरू भेटीस्तव घरदार सांडले, तन मन अर्पूण आपले गुरू जनार्दन स्वामी ह्यांची सेवा केली. व्यवहार आणि अध्यात्म ह्यांचा मेळ बसवला. भावार्थ रामायण, भागवत, ह्यासारख्या ग्रंथांची निर्मिती केली.... त्या पैठणच्या नाथबाबांनाच स्वप्नांत जाऊन माऊलीने दृष्टांत दिला. गोदवरीची आज्ञा घेऊन नाथ महाराज आळंदीकडे निघाले.

सोबतच्या टाळकऱ्यांसह अन् मोकळी पालखी बरोबर घेऊन एकनाथ महाराज आळंदीला आले. अनेक सिद्धांच्या समाधीतले ढवळ्या नंदीपुढचे ते माऊलीचे समाधीस्थान पाहाताच नाथांच्या डोळ्याला प्रेमाश्रूंची धार लागली.

सोबतची पालखी पारावर ठेवून (आजही आळंदी येथील मंदिर आवारात डाव्या हाताकडचा म्हणजे भुजलिंग काकांच्या समाधीसमोर पार जो नाथांचा पार म्हणून दाखवतात तो) नाथांनी ज्ञानोबा माऊलीच्या नामाचा गजर केला. बा.... ज्ञानदेवा तुझ्या स्वप्न दृष्टांताप्रमाणे मी इथवर तर आलो ... पण पुढचा मार्ग आता तूच दाखव....

**"नाथांना झाले ज्ञानोबांचे दर्शन"**

भजनानंदात सारे दंग असतानाच नाथांनी ढवळ्या

नंदीखालच्या मार्गांनी समाधीत प्रवेश करावा असा आदेश मिळाला.... नाथबाबा उठले, त्यांनी खुणेनेच सोबतच्या लोकांना तेथेच थांबण्याची सूचना दिली. विनम्र भावाने हात जोडून ज्ञानोबा माऊली... ज्ञानेश्वर ऽऽ माऊली असे भजन करीत त्यांनी नंदीद्वाराशी प्रवेश केला मात्र.... अन्....

सात रंगाच्या उद्भूत, अपूर्व अशा प्रकाशवलयांनी त्यांचे डोळे दिपून गेले. माऊलीच्या नामगजरात ते एक एक पायरी उतरत असताना तो प्रकाश.... अलगद मागे मागे सरकत गेला अन.... नाथ माऊलीकडे पुढे पुढे जाऊ लागले, अखेर तो सारा प्रकाश जेथे जाऊन एकरूप झाला तेथेच नाथबाबांना संजीवन समाधीत्व ज्ञानदेवांचे दर्शन झाले.

काही काळ तेथेच त्या अपूर्व सुखाचा अनुभव घेत नाथ राहिले आणि पुन्हा ते जेव्हा समाधीस्थानातून बाहेर आले तेव्हा त्यांच्या हाती होती ती श्रेष्ठ ज्ञानेश्वरी... अन...

कानी घुमत होते ज्ञानराजाचे शब्द "नाथबाबा... समाजाच्या गळ्याला अज्ञानाची मुळी विळखा घालतीय, ती काढा, ही ज्ञानगंगा जी गोदावरीच्या इच्छेप्रमाणे, सद्गुरूंच्या कृपेमुळे, अन् संत सज्जनांच्या आशीर्वादाने प्रगट झाली. तिला येऊ पाहणारी मलिनता दूरकरा..... अन् तिचे पुनश्च शुद्धीकरणासह प्रगटन करा...."

माऊलीची आज्ञा शिरसावंद्य मानून टाळमृदुंगाच्या गजरात सोबत आणलेली पालखी नाथांनी ज्ञानेश्वरीच्या अमृत कलशाने भरून घेतली अन् वाजत गाजत ती पालखी पैठणला आणली.

मोठ्या थाटामाटानं, सडा सन्मार्जन, गुढ्या तोरणं लावून, नामाच्या जयघोषात अन् श्रद्धा फुले उधळीत ह्या ग्रंथ राजाचे स्वागत झाले.

ज्ञानदेवांच्या आज्ञेप्रमाणे आवश्यक ते शुद्धीकरण केले गेले. अन् आपल्या किर्तन, प्रवचन, भजन, भारूड ह्या प्रचार माध्यमांतून ह्या ज्ञानेश्वरीचे गुणगान करीत नाथबाबांनी तो ग्रंथ जनमानसाच्या हृदय सिंहासनावर अधिष्ठित केला.

**"एक तरी ओवी अनुभवावी"**

आज ज्ञानेश्वरी लेखनाची सप्तशताब्दी सर्वत्र साजरी होत आहे. त्यानिमित्त गावोगावी सामुदायिक ज्ञानेश्वरी वाचन, त्यावर भाषणे, प्रवचने, किर्तनेही चालू आहे... पण केवळ ह्या गोष्टी केल्याने खरीखुरी ज्ञानेश्वरी कळेल असे नाही तर...

ज्ञानेश्वरी जर जीवनात खरंच वाचायची असेल तर ती तितक्या भावुकतेने विनम्र भावानेच वाचायला हवी. वाचून त्याप्रमाणे वागायला हवे.ज्ञानेश्वरीचे ज्ञान आचरणात उतरावयाला हवे. नाहीतर अनुभवशून्य वाक्चातुर्याने केवळ श्रवणसुखाचा आनंद मिळेल. पण अनुभूतीचा नाही. तेव्हा त्या ज्ञानेश्वरीची ओळख खऱ्या अर्थाने आम्हाला व्हावी असे वाटते. म्हणूनच माऊलीकडे असे मागणे मागावेसे वाटते की,....

"हे ज्ञानराजा... सर्वांच्याच बुद्धीच्या ठाई तुम्ही प्रगटावे अन् त्या शब्दामागची अनुभूती घेण्याची ताकद आम्हाला द्यावी कारण.... सर्व ग्रंथ जरी आचरता आला नाही तरी निदान... नामदेवाच्या अंतरिक तळमळीप्रमाणे

*नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानेश्वरी ।*
*एक तरी ओवी अनुभवावी ॥*

आणि तो अनुभूतीचा, प्रत्ययाचा, प्रचितीचा, महाप्रसाद तुझ्याच कृपेनं लाभावा....."

शब्दांकन : अरुण गोखले
(लोकराज्याच्या सौजन्याने)

---

# श्रीहरि माझ्या सदनी आले

*श्रीहरि माझ्या सदनी आले*
*श्रीहरि चरणी विनीत मी झाले ॥धृ.॥*

*आस अेक ही सर्वस्वाची ॥*
*इच्छा माझी किती दिवसांची ॥*
*यावे हरिनी मम सदनासी ॥*
*जाणुनी श्रीहरि अवचिंत आले ॥१॥*

*मीरेसम मी नाहीं कृतार्थ ॥*
*आजवरी ही होते तृषार्त ॥*
*नामाविण ना कशात अर्थ ॥*
*संसारी मी भक्तित रमले ॥२॥*

*आधी संसार करावा नेटका ॥*
*सर्वस्व मानू नका पैका ॥*
*तारिल मनुजा रामनामनौका ॥*
*समर्थ गुरुनी हे सांगितले ॥३॥*

*दिव्यत्वाची आली प्रचीती ॥*
*नयनी दिसली शामल मूर्ती ॥*
*आर्त मनाची झाली तृप्ती ॥*
*प्रभुने मजला दर्शन दिधले ॥४॥*

**सौ. कमला ना. दातार**

# श्री ज्ञानेश्वर महाराजांची वंशावळ

हरिहरपंत (आपेगावचे कुलकर्णी)

रामचंद्रपंत

गोपाळपंत

त्र्यंबकपंत

गोविंद पंत — हरिपंत

विठ्ठलपंत-रूक्मिणीबाई (आळंदी येथील कुलकर्णी सिधोपंत यांची कन्या)

निवृत्तीनाथ (जन्म शके ११९५)
ज्ञानेश्वर (जन्म शके ११९७)
सोपानदेव (जन्म शके ११९९)
मुक्ताबाई (जन्म शके १२०१)

# श्री ज्ञानदेवांची गुरूपरंपरा

आदिनाथ

उमा — मत्स्येंद्रनाथ — जालंदरनाथ

मत्स्येंद्रनाथ: गोरक्षनाथ — चौरंगीनाथ

जालंदरनाथ: कानीफनाथ — मैनावती (गोपीचंद माता)

गोरक्षनाथ: गहिनीनाथ — चर्पटीनाथ

गहिनीनाथ: निवृत्तिनाथ

निवृत्तिनाथ: ज्ञानदेव — सोपानदेव — मुक्ताबाई

# हरिपाठ आणि प्रकृतिस्वास्थ

डॉ. ह. वि. सरदेसाई

प्रकृतिस्वास्थ या संज्ञेत शारीरिक, मानसिक आणि सामाजिक सुस्थितीचा अंतर्भाव होतो, हे सर्व परिचित आहे. केवळ आजारांचा अभाव म्हणजे चांगली प्रकृती असे नसून या समाज-मन-शरीर अशा त्रिस्तरीय पातळीवर प्रकृतीचा साकारात्मक (Positive) विचार व्हावा लागतो. तिन्ही बाजू महत्वाच्या खऱ्या, पण त्या तीन बाजूंत मानसिक स्वास्थ्य हा प्रकृतीचा केंद्रबिंदू आहे. मन अस्वस्थ असले तर शरीर स्वस्थ राहू शकत नाही आणि विकारी मन समाजविरोधी आचार करण्यास प्रवृत्त होते. मन स्वस्थ झाले तर शारीरिक आणि सामाजिक प्रकृती निरामय होण्यास मोठीच मदत होईल. मन स्वस्थ होणे म्हणजे तरी काय? ते कशाने अस्वस्थ होते? ते स्वस्थ कसे करावयाचे? हरिपाठाचा यात काही संबंध आहे का?

विचार करणे हा मनाचा गुणधर्म आहे. किंबहुना सतत विचारांची एक शृंखला म्हणजेच मन, अशी एक मनाची व्याख्या करता येते. विचार कालाशी संबंधित असतो. म्हणजे, भूत, वर्तमान, भविष्य अशा कालात तो आपल्याला प्रतीत होत असतो. मानवी मनाचे एक वैशिष्ट्य असे आहे की, ते फारच थोडा वेळ वर्तमान काळात स्थिर होऊ शकते. घडून गेलेल्या घटनांची खंत करीत बसणे किंवा संभाव्य अथवा काल्पनिक संकटांची चिंता करीत राहणे या दोन स्थितीत आपले मन बहुदा असते. याचा परिणाम अस्वास्थ्य, चिंतातुरता, पराभव, किर्ती, न्यूनगंड आणि मानसिक नकारात्मक विचार यांतून बाहेर पडणे म्हणजे स्थितप्रज्ञ होणे.

ही स्थितप्रज्ञता कशी आणावयाची? त्याचे चार मार्ग सर्वांना विदीत आहेतच. या विश्वात किंवा चराचरांत असणारे ब्रह्मचैतन्य आणि आपल्यात असणारे आत्मतत्त्व हे एकच आहे ही अनुभूती येणे हा ज्ञानमार्ग. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधी हा अष्टांग योग मार्ग. इतरही योगाचे प्रकार आहेत. पण सर्वांचे इष्टसाध्य एकच आहे ते म्हणजे कुंडलिनी शक्ती जागृत करून सहस्रार चक्र चेतावणे. अशा उत्तेजित मेंदूला समाधी सिद्ध करता येणे शक्य होते. असंप्रज्ञात समाधी स्थिती प्राप्त होणाऱ्या मानवास स्थितप्रज्ञता येते. तिसरा कर्ममार्ग. कर्म अटळ आहे. ते करीत असताना दोन प्रश्न पडतात. काय करावे व कसे करावे. पहिल्या प्रश्नाचे उत्तर, प्रियकर आणि श्रेयस्कर अशा दोन प्रकारच्या कर्मातील माणसाने श्रेयस्कर काय हे ठरवावे, ते करावे. ते ठरविता न आल्यास ज्ञानी माणसावर श्रद्धा ठेवून त्याच्या निर्णयाप्रमाणे करावे. कसे करावे म्हणजे कर्मफलाची आशा न ठेवता कर्तव्य करावे. चौथा मार्ग म्हणजे भक्तिमार्ग.

श्रवणम् कीर्तनम् विष्णोः स्मरणम् पादसेवनम् ।
अर्चनम् वन्दनम् दास्यम् सख्यम् आत्मनिवेदनम् ।।

या नऊ प्रकारे केलेल्या भक्तीचे फल अखेर इष्ट देवतेत भक्ताचे भावनात्मक मीलन होण्यात होते. परब्रह्माचे आणि आत्मतत्त्वाचे, शिवाचे आणि जीवाचे, शीवाचे आणि शक्तीचे किंवा पुरूष आणि प्रकृतीचे ऐक्य हा भक्तीचा साध्य बिंदू होय.

परमेश्वराचे नाम घेणे यात पहिल्या तिन्ही प्रकारच्या भक्तींचा समावेश आहे. नामस्मरण करताना आपोआपच त्याचे श्रवण आणि कीर्तन होत राहते. अहो, जाता येता उठुनी बसता कार्य करता, असे सतत परमेश्वराचे नाव घेत राहणे हा भक्तीचा राजमार्ग आहे.

नामस्मरण म्हणजे नेमके काय? मानवी मनाचा एक गुणधर्म असा की, कोणत्याही वस्तूचे ज्ञान व्हावयाचे असेल तर त्या वस्तूचे सारे गुणधर्म त्या वस्तूच्या नावाशी संलग्न होणे. 'आंबा' असा शब्द उच्चारताच ऐकणाऱ्याच्या मनात विशिष्ट आकार रंग, रुप, वास, स्पर्श, चव असणारे फळ असा बोध झाला तर त्या शब्दाचा अर्थ कळला असे घडते. हे गुणधर्म आपणास त्या त्या वस्तूंची ओळख पटवतात. "श्री. पटवर्धन" असे ऐकताच त्या व्यक्तीचे गुणधर्म, उंची, वर्ण, ठेवण, चेहरा, आवाज, पोशाखाची पद्धत, आवडीनिवडी, वास्तव्य, धर्म, राष्ट्रीयता इत्यादी सारे गुणधर्म ध्यानात आले तर त्या व्यक्तीच्या नावाच्या श्रवणाने अथवा स्मरणाने त्या व्यक्तीचे ज्ञान होईल. निर्गुण निराकार तत्वाला नाव देता येणार नाही कारण नावामुळे आठवावे असे गुणच नाहीत. अशा तत्वाचे स्मरण तरी कसे करणार? वास्तव सगुणाची जोपासना, नामाचे स्मरण या श्रवण, किर्तन स्मरणातून निर्गुणाकडे जाण्याकरिता सगुणाची भक्ती.

मग सगुण आणि निर्गुण हे द्वैत आहे का? या दोन वेगळ्या, परस्पराभिन्न गोष्टी आहेत का? नाही. सगुणाच्या दारातून निर्गुणाच्या घरात प्रवेश करावयाचा आहे. घर आणि घराचे दार एकमेकातून वेगळे असू शकत नाही. नुसते दार असणे संभवनीय नाही. आणि दारावाचून घर असंभवनीय आहे. या दारात हे नाम येते. हरिपाठ हे ते द्वार आहे. या दारात उभे राहून आतले दर्शन घडू शकते, आत प्रवेश होणे संभवते. इतर मार्गांनी घरात प्रवेश

करणे कष्टाचे आहे. ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे : "रोग जाय दुधे साखरे । तरी निंब का पियावा ॥ (ज्ञानेश्वरी ४:३३). सर्वसामान्य संसारी व्यक्तीला ज्ञान, योग, भक्ती, कर्म हे मार्ग कठीण वाटले तरी नामस्मरणाचा सुलभ मार्ग उपलब्ध आहेच. केवळ नामस्मरण केले तरी चालेल, इतर मार्गांचा अवलंब करण्याची आवश्यकता राहणार नाही. नामस्मरण हा देखील एक योग मार्गच आहे. नामस्मरणाने सिद्ध होणाऱ्या योग-मार्गाला 'लय योग' असे संबोधले जाते. ज्या विचारांच्या तरंगांमुळे मनाची निर्मिती होते, ते तरंगच नामस्मरणाने संथावतात. स्थित झालेल्या मना पलीकडील बुद्धी प्रज्ञावंत होऊ लागते. शारीरिक स्वास्थ्य प्राप्त होते. मेंदूला विश्रांती मिळून ताजेतवाने वाटू लागते. चयापयाची गती कमी होते. प्राणवायूची गरज कमी होते. कर्बद्विलप्राणवायूचे उत्पादन कमी होते. श्वसन संथ होते. नाडीची गती मंद होऊ लागते. शरीरात लॅक्टिक आम्लाचे उत्पादन कमी होते. रक्ताची आम्लता सुधारते. रक्तातील वाढलेल्या साखरेचे प्रमाण कमी होते. कोलेस्टेरॉल व इतर मेद पूर्ववत होतात. रक्तवाहिन्या रूंदावतात. रक्तदाब उतरुन जेवढा आवश्यक आहे तेथे स्थिरावतो.

हातापायांचे, पाठी पोटाचे, कण्याच्या बाजूचे स्नायू शिथिल होतात. त्वचेमध्ये चांगले बदल घडू लागतात. एकूणच सारे हे बदल आपल्या प्रकृतीला फायदेशीर होतात.

नामस्मरण हे एक प्रकारचे ध्यानच आहे. श्रेयोहि ज्ञानम् अभ्यासात् । ज्ञानात ध्यानम् विशिष्यते ॥ (भगवत् गीता १२:१२) मनःशांती मिळविण्याकरीता ध्यानाचा उपयोग सर्वांना विदीत आहेच. मन शांत तर होतेच, शिवाय शरीरही निरामय होते. शांत मन आत्मोपम्य बुद्धीने इतरांचा विचार करू शकते. त्यातूनच करुणा औदार्य सहिष्णुता, प्रेम, बंधुभाव, शुश्रुषा आदि भावना निर्माण होतात. सामाजिक धारणेला याच भावना लागतात. धारणात् धर्मपिमित्याहुः धर्मो धारयते प्रजा ॥ (महाभारत). खऱ्या धर्माचा उगम इथेच होतो. शारीरिक मानसिक आणि सामाजिक स्वास्थ्य मिळण्याचा हा राजमार्ग होय.

डॉ. ह. वि. सरदेसाई
१८१६, शिवाजीनगर,
पुणे - ४११ ००४.

With Best Compliments From

GANESH ENTERPRISES

**Building Material Suppliers, Free Sale Cement, Steel Yard**

GANESH CONSTRUCTIONS
BHINTADE BROTHERS

**PROMOTERS & BUILDERS**

Dhankawadi, Hingne, Wadgaon (Site) 438092

UTTAMRAO S. BINTADE

S. NO. 31, Raut Baug, Dhankawadi, Pune 411 043.
Phone : 421123, 433036

# ज्ञानेश्वरीतील वाङ्मयरूपक

डॉ. गु. वा. पिंपळापुरे

श्री ज्ञानेश्वर महाराजांनी आपल्या भावार्थ-दीपिकेत एक वाङ्मयरूपक सादर केले आहे. ग्रंथारंभीच श्रीगणेशमूर्तीला वन्दन होत असता हे रूपक येते. वाङ्मय-रूपक सादर करण्यासाठी श्री ज्ञानेश्वर महाराजांनी निवडले ते षड्भुज गणेशाचे दुर्लभ ध्यान. त्या मूर्तीच्या सहा हातातील आयुधे म्हणजे षड्दर्शनांची प्रमेये होत. ही श्री ज्ञानेश्वर महाराजांची थोडक्यात भूमिका म्हणता येईल. त्या वाङ्मयरूपकातील ओव्या पुढीलप्रमाणे आहेत.

देखा षड्दर्शने म्हणिपती । तेचि भुजांची आकृति ।
म्हणवूनि विसंवाद धरिती । आयुधे हाती ।
तरी तर्क तोच परशु । नीतिभेद अंकुशु ।
वेदान्त तो महारसु । मोदक मिरवे ।
एके हाती दन्त । जो स्वभावता खंडित ।
तो बौद्ध-मत संकेत । वार्तिकाचा ।
मग सहजे सत्कारवाद । तो पद्मकर वरद ।
धर्मप्रतिष्ठा तो सिद्ध । अभय हस्त ।
भावार्थ - १.१० ते १.१४

ही षड्दर्शने कोणती याविषयी विद्वानांमध्ये फार वाद आहेत. वाद असण्याचे मुख्य कारण षड्दर्शनांचा प्रायः नामोल्लेख श्री ज्ञानेश्वर महाराजांनी गाळला हे आहे. अपवाद वेदान्ताचा व काहींच्या मते बौद्धदर्शनाचा. उरलेल्या दर्शनांची ओळख त्यातील प्रमेयावरून व्हावी असे त्यांना वाटले असावे. या त्यांच्या गूढार्थ-प्रियतेमुळे किंवा व्यंजन-प्रियतेमुळे आज फारच वादग्रस्त ओवी कोणती असेल तर ती "बौद्ध-मत-संकेतु । वार्तिकाचा" ही होय.

यात मुख्य दोन पक्ष आहेत.

बौद्धमत म्हणजे बौद्धदर्शन असे मानणारा पक्ष. यात आजवरचे जवळपास सारेच श्री ज्ञानेश्वरीचे अनुवादकर्ते व विवेचक आहेत.

बौद्ध-मत म्हणजे बुद्धी-मान्य सिद्धान्त. हा सिद्धान्त श्लोक-तंत्र- वार्तिक-कार कुमारिलभट्टांचा.

(कुमारिल-भट्ट हे मीमांसा दर्शनाचे मोठेच प्रवक्ते मानले जातात.) प्रस्तुत पक्ष ज्ञानेश्वरी - गूढार्थ - दीपिका लिहिणारे वेदान्त केसरी श्री बाबाजी महाराज पंडित यांचा.

बौद्धमत शब्द इतका स्पष्टार्थक असता तो मुद्दाम आडवळण पत्करून कुमारिल भट्टाच्या मताचा निदर्शक का मानायचा? दुसरे असे की वार्तिक-कार कुमारिल भट्टच का घ्यायचे? बौद्ध सिद्धान्ताचे विवेचक वार्तिककार का घ्यायचे नाहीत? भाष्यकार या बिरूदावर जसा श्री शंकराचार्यांचाच अधिकार असू शकत नाही तसाच वार्तिक-कार या विशेषणाचा देखील विचार का होऊ नये? असे अनेक प्रश्न अभ्यासकांच्या मनात येतात व त्यामुळे पहिल्या मताकडेच अभ्यासकांचा विशेष कल आढळत गेला तर त्यात आश्चर्य वाटण्याचे कारण नाही.

परंतु महत्त्वाचा प्रश्न हा की शब्दांची स्पष्टार्थता कशी निश्चित करायची? त्यातील गौण-मुख्य भाव कसा ठरवावयाचा? शास्त्रीय निकष लावून पाहता बौद्ध शब्दाचे दोन्ही अर्थ सारखेच मुख्य आहेत; एक मुख्य व दुसरा लाक्षणिक असा प्रकार नाही. कारण दोन्ही तद्धितवृत्ती आहेत. एका ठिकाणी मूळ शब्द बुद्ध तर दुसऱ्या ठिकाणी बुद्धी मानावा लागतो एवढेच काय ते. दुसऱ्या तऱ्हेने बोलायचे झाल्यास बौद्ध शब्द अनेकार्थक आहे व त्याचे दोन्ही अर्थ स्पष्टच आहेत. अशा ठिकाणी कोणता अर्थ घ्यायचा याविषयी आपल्याकडे काही शास्त्रीय निकष आहेत. त्यातील एक व महत्त्वाचा निकष म्हणजे प्रकरण अर्थात संदर्भ होय.

त्यात मुख्य संदर्भ षड्दर्शनाचा आहे. षड्-दर्शनात कोणत्या दर्शनांचा आज तरी समावेश दिसतो? न्याय-वैशेषिक-सांख्य योग व पूर्वमीमांसा- उत्तरमीमांसा ही ती दर्शने होत. या जोड्यादेखील उगाच यदृच्छेने पडल्या नाहीत. त्यापाठीमागील दृष्टी स्पष्ट करण्याचे हे स्थळ नव्हे. पण मुख्य मुद्दा हा की ही षड्दर्शनांची आज सर्वमान्य असलेली व्यवस्था श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या काळी नव्हती असे समजण्याला काही वेगळे प्रमाण उपलब्ध आहे काय? तसे नसेल तर बौद्धदर्शनाला षड्दर्शनाच्या रांगेत आजच आणून कसे बसविता येईल? श्री ज्ञानेश्वर महाराजांची ही उदार भूमिका म्हणावी तर अवैदिक जैनदर्शनाला षड्-दर्शनांच्या रांगेत आणून ठेवण्याला श्री ज्ञानेश्वर महाराजांना कोणती आडकाठी होती? श्री ज्ञानेश्वर महाराजांनी तेराव्या अध्यायात विशेष गौरविलेल्या अहिंसा तत्त्वाचा आदर जैन धर्मातच विशेष असल्याने तेच दर्शन त्यांच्या दृष्टीने षड्दर्शनात बसण्यास अधिक योग्य होते. बौद्धांच्या शून्य-सिद्धांताचा श्री ज्ञानेश्वर महाराजांनी प्रतिवाद तरी केला आहे. (अमृ. प्र. ४ ओ. २७) जैनदर्शन त्या दृष्टीने अधिक ग्राह्य मानता येईल. त्या दृष्टीने षड्दर्शनाची आजची जी व्यवस्था आहे ती मोडण्याचे काही कारण दिसत नाही.

ही गोष्ट खरी की बौद्धशब्द उच्चारल्याबरोबर आम्हांला बौद्धदर्शन आठवते. पण शास्त्रीय अर्थव्यवस्थेत त्याचा कितपत मान राखावा? शाकुंतलातील एक प्रसंग इथे आठवतो. सातव्या अंकात लहानग्या भरतापुढे मातीने बनविलेल्या मोराचे चित्र पुढे करून तापसी म्हणते -

शकुन्त लावण्यं प्रेक्षस्व ।

(पक्षाचे सौंदर्य बघ)

भरताला मात्र शकुंत व लावण्य या दोन पदांचा जोड कळला नाही. त्याच्या परिचयाचा शकुंतला शब्द त्याला जाणवला. तो म्हणाला -

कुत्र मे माता शकुंतला?

(माझी आई शकुंतला कुठे आहे?)

या लेखाच्या संदर्भात महत्त्वाचे आहेत तापसीचे शब्द -

ती म्हणते - नामसादृश्येन वञ्चितो मातृवत्सलः ।

(या मुलाला (भरताला) आईचा लळा असल्याने त्याला भलत्याच ठिकाणी शकुंतला आठवली) व याची फसगत झाली. (भावार्थ)

मातृवत्सल भरताप्रमाणे आम्ही अलीकडे फारच शब्दवत्सल होत चाललो आहोत. साहित्यातील आजचे अनेक वाद या शब्दवत्सलतेपोटी आहेत असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही. आम्ही संदर्भवत्सलता स्वीकारली पाहिजे. आचार्य शंकरांनी शारीरभाष्यात आकाश, प्राण, ज्योती इत्यादी कैक शब्दांचा अर्थ परब्रह्म असा करायला हवा असे संदर्भाच्या आधारावर समर्थपणे दर्शविले आहे.

(शारी-१-१-२२/२३/२४)

इथे शब्द फिरवावयाचा नाही. कोणती तद्धित-व्युत्पत्ती घ्यायची एवढा मर्यादित प्रश्न आहे व तो संदर्भाला धरून सोडवावयाचा आहे.

संदर्भाची आणखी तपासणी केली तर आपल्याला काय आढळते? अगदी पहिल्याच ओवीत ईश्वराला वंदन करीत असता श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

- ॐ नमोजी आद्या । वेद-प्रतिपाद्या । (ज्ञाने. १-१)

हा वेदप्रतिपाद्य परमेश्वर श्रीगणेशरूपाने प्रगटला आहे असे वर्णन करून पुढे ते वाङ्मय-रूपकात शिरतात.

'स्मृती तेचि अवयव', 'अष्टादश पुराणे तेचि मणिभूषणे' हे षड्दर्शन वर्णनाच्या अगोदरचे शब्द किंवा 'देखा विवेक तव सुविमल', 'जेथ परमानंद केवळ महासुखाचा', इत्यादींनंतर येणारे शब्द अवैदिक बौद्धदर्शनाचा दुरून तरी संकेत करतात काय?

आणखीही आपण पुढे गेलो तर महत्त्वाची ओवी येते.

मज अवगमलिया दोनी । मीमांसा श्रवण स्थानी ।

बोधमदामृत मुनी । अलि सेविती ॥१.१६ ॥

श्री गणेशाच्या दोन कानांच्या ठायी असणाऱ्या या मीमांसा कोणत्या? बोध व मद हे दोन शब्द कोणाला लागू होतात?

कर्मबोध व ब्रह्मानंद (मद) या दोहोंचे ते निदर्शक दिसतात, हे दोन विषय पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा या दोन मीमांसांचेच आहेत. वरील ओवीतील मद शब्द ब्रह्मानंदाचा निदर्शक मानणे (अर्थात् उत्तर मीमांसेचा द्योतक मानणे) संयुक्तिक मानता येईल पण बोध शब्द पूर्व मीमांसेचा सूचक का मानावा अशी शंका येऊ शकते. परंतु तिचे निराकरण शारीरभाष्यावरून सहज होऊ शकेल.

अथातो ब्रह्म जिज्ञासा (ब्रह्मसूत्र । १-१-१)

या सूत्रातील अथ = नंतर या शब्दाचे विवरण करीत असता आचार्य म्हणतात -

नन्विह कर्मावबोधानन्तर्यंविशेषः । न।

धर्मजिज्ञासायाः प्रागप्यधीत-वेदान्तस्य ब्रह्म जिज्ञासोपपत्तेः । शारीर १-१-१

(कर्मबोध झाल्यानंतर ब्रह्मजिज्ञासेला प्रवृत्त व्हावे असा नंतर शब्दाचा अर्थ घेता येईल. मुळीच नाही. वेदान्ताचे ज्याने अध्ययन केले आहे त्याला धर्मजिज्ञासा होण्यापूर्वी देखील ब्रह्मजिज्ञासा होऊ शकते! भावार्थ)

या अवतरणावरून कर्मबोध हा पूर्वमीमांसेचा विषय, हे उघड आहे.

या नंतर ज्ञानेश्वरीत शब्द येतात द्वैताद्वैत निकुंभ । उपरि वेदोपनिषदे । उदारज्ञान मकरन्दे । (ज्ञाने. १.१७-१८)

हा सारा पूर्वापर-संदर्भ वैदिक-पार्श्वभूमीचा निदर्शक असता मध्येच बौद्धदर्शनाची श्रीज्ञानेश्वर महाराजांना कशाला आठवण झाली असेल? मीमांसेच्या जोडीत पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा व दर्शनाच्या जोडीत मात्र वेदान्तदर्शन व बौद्धदर्शन हा प्रकार कितपत योग्य आहे?

वाङ्मय रूपकातील बौद्धमत शब्दाने बौद्धदर्शन घ्यावे असे म्हणताना आणखी एका प्रमुख मुद्याकडे दुर्लक्ष तर होत नाही ना इकडे अभ्यासकांनी लक्ष देण्याची गरज आहे, असे मला वाटते. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी षड्दर्शनातील स्वतःला अभिप्रेत असलेला विशेष कोणता हे स्पष्ट केले आहे. जसे-तर्क-न्यायदर्शन, नीतिभेद-वैशेषिक, महारस-वेदान्त, बौद्धमत-मीमांसा, सत्कार्यवाद-सांख्य, धर्म-योग.

आता बौद्धमत शब्दाने बौद्धदर्शन अभिप्रेत असेल तर सारी मांडणीच विसकटून जाते. जसा न्यायातील तर्क-विचार, वैशेषिकांचा नीतिविचार, वेदान्ताचा महारसविचार, सांख्यांचा सत्कार्यवाद व योगाचा धर्म (मेघ) विचार तसा बौद्धदर्शनाचा कोणता विचार इथे प्रस्तुत आहे या प्रश्नाचे चपखल उत्तर मिळत नाही. याउलट,

मीमांसादर्शन इथे प्रस्तुत मानले तर त्यातील बौद्धमत प्रस्तुत आहे, असा पूर्वापार संदर्भाला धरून अर्थ घेता येतो. याचा अर्थ बौद्धदर्शनवादी लोकांना आपल्या पक्षाचे समर्थन करण्यासाठी संदर्भाची दोन तऱ्हेने तोडमोड करावी लागते. वैदिक षड्दर्शनांचा संदर्भ अव्हेरावा तर लागतोच; वरून भर म्हणून दर्शनाचे ते ते वैशिष्ट्य दाखविण्याची येथील परिपाटी श्रीज्ञानेश्वर महाराजांनी बौद्धदर्शनाच्या विषयातच तेवढी सोडून दिली असे मानावे लागते. बाह्यार्थ-निराकारण, क्षणिकवाद, दुःखवाद, विज्ञानवाद किंवा अन्य कोणते तरी वैशिष्ट्य बौद्धदर्शनाच्या विषयात त्यांनी दाखवावयास हवे होते. माण्डूक्य भाष्यात ज्याप्रमाणे आचार्य, "यद्यपि बाह्यार्थ-निराकरणं ज्ञानमात्र कल्पना च अद्वयवस्तुसामीप्य मुक्तम् ।" असे म्हणतात. (माण्डूक्य-अलातशान्ती-९९) तसे श्रीज्ञानेश्वर महाराजांना सुद्धा म्हणता आले असते. ते म्हणत नाहीत याचा अर्थच बौद्धदर्शन इथे प्रस्तुत नाही असा निघतो.

षड्दर्शनांचा प्रमेय-वेच करताना श्रीज्ञानेश्वर महाराजांची एक स्वतंत्र दृष्टी आहे. त्यांच्या असामान्य प्रतिभेची कुसर त्यात प्रगट झाली आहे. सामान्य अभ्यासक तर्क हे न्यायाचेच वैशिष्ट्य मानणार नाही. कारण वैशेषिकांचेही ते वैशिष्ट्य असू शकते. सत्कार्यवाद हे केवळ सांख्यांचेच वैशिष्ट्य नव्हे; ते वेदान्ताचेही असू शकते असे तो मानील. याप्रमाणे अनेक तर्क-वितर्क साधारण अभ्यासकांच्या दृष्टीतून इथे संभवू शकणार नाहीत असे नाही. श्रीज्ञानेश्वर महाराजांना त्यादृष्टीने षड्दर्शनाकडे बघायचे नव्हते. भक्तीची वाढ होण्याच्या दृष्टीने एक आगळा वेच षड्दर्शनातील प्रमेयांचा करता येतो का, हे त्यांना पाहावयाचे होते. वाङ्मय रूपकातील त्यांनी दर्शविलेला प्रमेय-गुंफ हा त्या दृष्टीने एक नवा वाङ्मयीन-विभूति-योग आहे. पुढे गीतेत दहाव्या अध्यायात आलेल्या विभूति-योगाची ही श्रीज्ञानेश्वर प्रणीत आवृत्ती होय. इथे बारकाईने विचार करता तर्क वेदान्त महारस सत्कारवाद हा एक ज्ञान-मार्गी संच तर नीतीभेद-बौद्धमत-धर्म असा दुसरा क्रियामार्गी संच तयार झाला आहे. त्यामुळेच त्या दोहोंत एक विशेष संवाद-विसंवाद आढळून येतो. "म्हणोनी विसंवाद धरिती । आयुधे हाती" असे श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात. विसंवाद शब्दाचा असा द्व्यर्थी उपयोग इथे विवक्षित आहे असे मानावे लागते. आयुधे वेगळी आहेत. (विसंवाद- धरिती) हे बरोबर परंतु ती विशेष संवाद दर्शविणारी आहेत हेही विसरता येत नाही. रूढार्थाने जर त्यात विसंवाद असेल तर ती परस्परपूरक राहणार नाहीत व ती आयुधे म्हणून शोभणारही नाहीत.

या आयुधांचे क्रियात्मक व ज्ञानात्मक असे द्विविध स्वरूप व त्यांची परस्परपूरकता विशेष अभ्यासण्याजोगी आहे. ज्ञानात्मक साखळीतील पहिला घटक तर्क होय. श्रवण-मनन-निदिध्यासन प्रक्रियेत तर्काचा फार उपयोग आहे असे वेदान्तदर्शन मानते.

केवळ तर्कासाठी तर्क ही भूमिका इथे मान्य नाही हे ओघानेच आले. वेदान्तातील महारस एका बाजूने न्यायप्रणीत तर्कावर तर दुसऱ्या बाजूने सांख्यप्रणीत सत्कार्यवादावर मध्य-मणिदीपिका न्यायाने आपले प्रभाव क्षेत्र वाढवीत आहे. त्यामुळे तर्क किंवा सत्कार्यवाद यांचे त्या त्या दर्शनात जसे स्वरूप अभिप्रेत असेल तसेच इथे अभिप्रेत असणार नाही. हे दर्शविण्यासाठीच श्रीज्ञानेश्वर महाराजांनी सत्कार्यवादाला एका परीने अत्युच्च स्थान बहाल केले आहे. तो वाद म्हणजे श्री गणेशाचा वरदकमलहस्त होय. सत्कार्यवादाची श्रीज्ञानेश्वर महाराजांनी केलेली ही भलावण भलतीच झाली!! असे सुद्धा खंदा सांख्यवादी म्हणेल? कारण सत्कार्यवादापेक्षा प्रकृति-पुरूष-विवेकाचेच त्याला अधिक महत्त्व वाटणार! वेदान्ताचा महारस चाखल्यानंतर सत्कार्यवादाला जो नवा आयाम लाभतो व एका व्यापक प्रसन्न अनुभूतीचा त्यामुळे जसा संकेत मिळतो तसा तो पूर्वी कसा मिळेल? त्यापूर्वी तो वाद म्हणजे न्यायाच्या असत्कार्यवादाचा अथवा बौद्धाच्या असत्कारणवादाचा प्रतिस्पर्धी सिद्धान्त एवढाच मर्यादित अर्थ राहणार. त्याच दृष्टीने वेदान्ताच्या महारसाचे मध्यवर्ती स्थान या वाङ्मयरूपकात अधिक अर्थपूर्ण झाले आहे. सांग-रूपकाच्या चारूतेत वेदान्तमहारसाच्या मोदकाने निःसंशय भर घातली. पण तो वेगळा विचार झाला. प्रस्तुत वाङ्मयरूपकात वेदान्त महारसाच्या मध्यवर्ती स्थानामुळे तर्क व सत्कार्यवाद या दोहोंना एक वेगळा उजाळा लाभतो. एवढेच इथे दाखवावयाचे आहे.

प्राथमिक अवस्थेत तर्काचा मर्यादित आधार घेऊन वेदान्ताचा आनंद पर्यवसायी आस्वाद घेत सरतेशेवटी एका व्यापक अनुभूतीवर आरूढ व्हावयाचे हा जसा एक ज्ञानमार्गी प्रवास तसाच दुसऱ्या वाटेचाही एक प्रवास आहे. तो म्हणजे नीतिभेद बौद्धमत व धर्म या अनुरोधाने होणारा.

तर्क, महारस व सत्कारवाद या जोडीच्या मानाने नीतिभेदबौद्धमत व धर्म ही जोडी अर्थाच्या दृष्टीने जरा अवघडच आहे. बौद्धमत शब्दाविषयी वाद होण्याचे तेही एक कारण आहे. नीतिभेद अवघड होऊन बसला तो दोन कारणांसाठी. एकतर वैशेषिक दर्शनाचा नीती हा विचारच नव्हे असे सर्वसाधारण अभ्यासकाला वाटत असते. दुसरे असे की, नीती शब्द धर्मशब्दाचा पर्याय रूप असू शकतो हे प्रथम लक्षात येत नाही. परंतु वैशेषिकांच्या सूत्र-ग्रंथात "यतोऽभ्युदय निःश्रेयससिद्धिः" ही धर्माची व्याख्या केली आहे असे आढळत असल्याने नीती हा वैशिषिकांचा विचारच असू शकत नाही. या भूमिकेला अर्थ उरत नाही. नीती शब्द तात्पर्यार्थाने धर्म-वाचक आहे ही श्रीज्ञानेश्वर महाराजांचीच भूमिका असल्याने दुसऱ्या शंकेलाही अर्थ राहत नाही. श्रीमद्

भगवद्गीतेत

पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः

(धर्म काय आहे हे माझ्या मनाला सुचेनासे झाले असल्याने मी आपणाला विचारत आहे) या अर्जुनाच्या प्रश्नाचे विवरण करीत असता श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात-

तरी उचित काय आम्हा । जे व्यभिचरेना धर्मा ।
ते झडकरी पुरुषोत्तमा । सांग आता ।। ज्ञाने. २.६३

प्रस्तुत ओवीत धर्म शब्द वापरून श्रीकृष्णाच्या त्यावरील उत्तरात मात्र

तू जाणता तरी म्हणविसी । परी नेणिवेते न सांडिसी ।
आणि शिकवू म्हणो तरी बोलसी । बहूसाल नीति ।
ज्ञाने. २.९२

श्रीज्ञानेश्वर महाराज धर्म शब्दाऐवजी नीती शब्द वापरत आहेत. पुढेही "धर्म नीतीशी । शेस भरी ।" (ज्ञाने. ४.५३) असे ते म्हणतात. यावरून धर्म व नीती स्वरूपतः एकच होत असा अर्थ निघतो. अवान्तर अर्थ वैशिष्ट्य असू शकते हे मात्र अमान्य करण्याचे अर्थातच कारण नाही. नीतीचे अवान्तर वैशिष्ट्य म्हणजे धर्माला अविरूद्ध असणाऱ्या देश-कालोचित विचाराला तिथे (नीतीमध्ये) दिलेले स्थान होय. अभ्युदय व निःश्रेयस या दोहोंचा धर्माच्या उद्दिष्टात समावेश करून वैशेषिकांनी धर्मामध्ये नीतीचा अन्तर्भाव सुचविला आहे. अभ्युदयामध्ये इह-पर कल्याणाचा तर निःश्रेयसामध्ये केवळ मोक्षावस्थेचा अर्थ अभिप्रेत असतो. त्या दृष्टीने वैशेषिकांची धर्म संकल्पना श्रीज्ञानेश्वर महाराजांना संग्राह्य वाटली. नीतीला अंकुशाची उपमा देण्याचे औचित्य असे दिसते की स्वैर भटकणाऱ्या मनाला अभ्युदय निःश्रेयसाचा धाक किंवा प्रलोभन दाखवून सहज वळविता येते. अंकुश किंवा नीतीभेद यात नियमनांचे समान सामर्थ्य आहे. हा एकूण अर्थ. अंकुशाला दोन अग्र असतात. धर्माचीही अभ्युदय व निःश्रेयस ही दोन उद्दिष्टे असतात. त्यामुळे धर्माला-नीतीला अंकुशाची उपमा शोभून दिसते. वैशेषिकांनी धर्म शब्दाची निवड केली असता श्रीज्ञानेश्वर महाराजांनी मात्र नीतिशब्दाचा वापर का करावा अशी एक शंका मनात येत राहते. त्याचे उत्तर असे देता येईल की तो शब्द पातञ्जलयोगासाठी राखून ठेवण्यात श्रीज्ञानेश्वर महाराजांना अधिक समर्पकता जाणवली. दुसरे असे की नीतिशब्दाने व्यावहारिक किंवा इहलोकातील व्यवस्थेची जशी सुस्पष्ट जाणीव होते तशी धर्म-शब्दावरून झालीही नसती. या दोन कारणांसाठी नीतिशब्दाचा श्रीज्ञानेश्वर महाराजांनी केलेला वापरच योग्य ठरतो.

कर्माचरण या अर्थाने धर्म-विचार मीमांसकांनीच अधिक केला आहे. परंतु त्यांची त्या पाठीमागची भूमिकाच वेगळी आहे. मीमांसक वेदांना स्वतःप्रमाण मानतात. त्यामुळे धर्माच्या व्याख्येत तोच आशय अधिक प्रतिबिम्बित व्हावा ही त्यांची भूमिका. "चोदना-लक्षणोऽर्थो धर्मः" या मीमांसकांच्या धर्म-लक्षणात, चोदनेला वेदाज्ञेला-अग्रमान दिला आहे. वैशेषिकांची ती भूमिका नसल्याने त्यांनी स्वाभाविकच धर्माच्या प्रयोजनांना अभ्युदय-निःश्रेयस-प्रथमस्थान दिले हे लक्षात ठेवण्याजोगे आहे. प्राथमिक भूमिकेत अभ्युदय निःश्रेयसाची त्यातही अभ्युदयाची गोडी दाखवून मनाला वळविणे अधिक सोयीचे आहे हे लक्षात ठेवूनच श्री ज्ञानेश्वर महाराजांनी नीति-भेद तो अंकुशु या प्रमेयाची (वैशेषिक-प्रणीत) प्रथम आठवण करून दिली.

मीमांसकांच्या धर्माच्या व्याख्येकडे आपले लक्ष न वेधता श्रीज्ञानेश्वर महाराज त्यांनी केलेल्या कर्तृत्वस्वरूप विचाराकडे अभ्यासकांचे लक्ष वेधू इच्छितात. त्यासंबंधी मीमांसकांची भूमिका अशी आहे. आत्मा कर्ता व भोक्ता आहे असे मीमांसक मानतात. प्रस्तुतमत बौद्धमत आहे म्हणजे सर्वसामान्य माणसाला आपल्या बुद्धीने विचार करून आत्मस्वरूपाविषयी जशी कल्पना करता येईल तसा हा विचार आहे असे श्रीज्ञानेश्वर महाराजांना म्हणायचे आहे.

दुसऱ्या भाषेत बोलायचे झाल्यास मीमांसकांचा विचार शास्त्रपूत नाही; केवळ स्वबुद्धी सिद्ध किंवा लोक-बुद्धि-सिद्ध आहे असे म्हणता येईल हाच आशय श्री शंकराचार्यांनी ईशोपनिषद् भाष्यात पुढीलप्रमाणे मांडला आहे.

तस्माद् आत्मनः अनेकत्व-कर्तृत्व-भोक्तृत्वादि च अशुद्धत्व पापविद्धत्वादि चोपादाय लोक-सिद्ध कर्माणि विहितानि । ईश शां. भा. १

(आत्म्याच्या ठिकाणी अनेकत्व; कर्तृत्व, भोक्तृत्व, अशुद्धत्व, पापमयत्व हे धर्म नांदतात हा लोकांच्या बुद्धीने दिलेला कौल लक्षात घेऊन कर्म मार्ग सांगितला आहे. भावार्थ)

वरील अवतरणातील लोक-बुद्धि-सिद्ध हे शब्द महत्त्वाचे आहेत. श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या बौद्धमत शब्दाचा अर्थ लोक-बुद्धि-सिद्ध-मत असा एकूण अर्थ झाला. खण्डित दाताची उपमा त्याला शोभते कारण ते मत परिपूर्ण नाही. वेदाज्ञेविषयी आदर ठेवून किंवा अभ्युदय निःश्रेयसाची आकांक्षा धरून काही काळ या लोक-बुद्धि-सिद्ध मताचा अवलंब करून माणसाला प्रवास करताही येईल व नीतिभेदाच्या अंकुशाचा धाक असल्याने स्वैराचारही घडणार नाही. परंतु स्वरूप स्थितीकडे त्याला वळता येणार नाही. स्वरूप म्हणजे जे वस्तुला सोडून कदापि राहत नाही. कर्तृत्व व भोक्तृत्व या शब्दाने सुचविली जाणारी क्रिया जर आत्म्याचे स्वरूप असेल तर त्याला सोडून कदापि रहाता कामा नये. क्रियेला तर आदि अंत असतात. ज्यावेळी क्रिया राहणार नाही त्यावेळी स्वरूपही राहणार नाही असे मानण्याचा प्रसंग येऊ शकतो. म्हणून चिरंतन वस्तूचे स्वरूप क्रियानिर्भर किंवा क्रियात्मक मानता येत नाही हा

वेदान्तशास्त्राचा स्वरूप विचार आहे. त्या दृष्टीने मीमांसकांचे बौद्धमत खण्डित अर्थात अपूर्ण अर्थात शास्त्रीय निकषावर न टिकणारे आहे असे श्रीज्ञानेश्वर महाराजांना सुचवावयाचे आहे. बौद्धमत शब्दाने बौद्धदर्शन अभिप्रेत आहे असे मानणाऱ्या अभ्यासकांना खंडितदाताची दिलेली उपमा कशी चालते कोण जाणे? षड्दर्शनात बौद्धदर्शनाचा समावेश हे श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या उदारदृष्टीचे निदर्शक की उपहास बुद्धीचेनिदर्शक मानायचे हे बौद्धवादी अभ्यासकांना ठरवावयाचे आहे.

मीमांसकांच्या बौद्धमतातील अपूर्णता योगदर्शनाने बऱ्याच प्रमाणात दूर केली. त्यांनी कर्तृत्व भोक्तृत्वाची जोडी तोडली आणि कर्तृत्व प्रकृतीचे व भोक्तृत्व पुरुषाचे अर्थात आत्म्याचे असा सिद्धान्त स्वीकारला. हे भोक्तृत्व सुद्धा दृष्टस्वरूप त्यांनी मानले. त्यामुळे व्यावहारिक स्वरूपातील भोक्तृत्वाला तिथे मुळीच वाव नाही. त्यामुळे दृष्ट अवस्था म्हणजे क्रियारूप अवस्था नव्हे. ती साक्षिभूत स्थिती आहे. तिलाच त्यांनी "स्वरूप प्रतिष्ठा वा चिति शक्तिः" (४.२९) या सूत्रात अंतिम मोक्षावस्था म्हणून स्वीकारले आहे. ही अवस्था येण्यासाठी काही पूर्वक्रम आवश्यक असतो. त्याचेच जरा सविस्तर वर्णन पातंजल योगसूत्रात आगोदरपासून

"तदा विवेक निम्नं कैवल्यप्राग्भारं चित्तम्" (४.२६)

या सूत्रापासून दिले आहे. पूर्वीचे अज्ञानाने प्रभावित झालेले व विषय-वासनेने भारावलेले चित्त आता प्रकृती-पुरूष विवेकाने प्रभावित झालेले व आपल्या केवलभावाने-प्रकृती-संपर्क-शून्यतेच्या विचाराने-भारावलेले असते असे पतंजली म्हणतात. प्रकृती पुरूषविवेकाचीही तशी पुढे निकड राहत नाही याच अवस्थेचे वर्णन करताना धर्म शब्द येतो. ते सूत्र असे.

प्रसंख्यानेऽ प्यकुसीदस्य सर्वथा विवेकख्याते धर्म-मेघः समाधिः ।

पातं. ४.२९

प्रकृती-पुरूष-विवेकाची निकड केव्हा? प्रकृती-पुरूष-अ-विवेक असेल तेव्हा ना? तो अविवेक आता संपला आहे. कोणतेही प्राकृतविचार मनात येण्याचे आता थांबले आहे. अशा स्थितीत प्रकृती-पुरूष-विवेकाला पूर्वीसारखा 'प्रहर' देण्याची गरज उरत नाही. विवेकख्यातीचे असे सहज अस्तित्व म्हणजे धर्ममेघ समाधी होय. आता भय, दुःख इत्यादी प्राकृतविकारांपासून भय बाळगण्याचे कारण राहत नाही. म्हणूनच हा अभयहस्त होय. एका बाजूने सत्कारवादाची वरदमुद्रा व दुसऱ्या बाजूने धर्ममेघ समाधीने साधलेली अभयमुद्रा यांचा हा सुरेख मेळ पाहण्याजोगा आहे.

षड्दर्शनाचा क्रम सांगताना प्रायः सांख्ययोग मध्ये येतात. श्री ज्ञानेश्वर महाराजांनी तो क्रम इथे बदलून टाकला. हाही त्यांच्या प्रतिभेचा स्वतंत्र उन्मेष आहे. षड्दर्शनाच्या प्रमेयव्यवस्थेत एका वेगळ्या तऱ्हेने आंतरिक संगती कशी दाखविता येते याचा श्रीज्ञानेश्वर महाराजांनी इथे नवा वस्तुपाठ दिला आहे. त्यासाठी त्या त्या दर्शनाचे लोक-प्रसिद्ध-प्रमेय वैशिष्ट्य टाकून अप्रसिद्ध पण महत्त्वाचे वैशिष्ट्य तर त्यांनी पुढे ठेवलेच पण त्या सोबत त्यांचा क्रमदेखील नव्या पद्धतीने मांडून दाखविला. त्या दृष्टीने वाङ्मयरूपकातील शेवटच्या ओळीतील धर्म-प्रतिष्ठा, सिद्ध, अभयहस्त हे सारेच शब्द मोलाचे दिसतात. धर्ममेघ शब्दातील धर्मशब्द व "स्वरूप-प्रतिष्ठा वा चितिशक्तिः" या सूत्रातील प्रतिष्ठा शब्द घेऊन एक नवा शब्द त्यांनी इथे तयार केला व ही अवस्था सहज किंवा स्वरूप प्रतिष्ठा आहे हे सुचविण्यासाठी सिद्ध शब्द घातलेला दिसतो. वेदांताचा महारस जर आगोदर चाखला तरच सांख्यांचा सत्कारवाद हा व्यापक सहजप्रतीतीचा गमक होऊ शकतो व धर्ममेघ समाधीदेखील सिद्ध स्वरूपाची होऊ शकते. हे श्रीज्ञानेश्वर महाराजांना म्हणायचे दिसते. म्हणून वाङ्मय रूपकातील षड्दर्शनांचा अनुक्रम देखील तेवढाच महत्त्वाचा आहे. नाही तर पातञ्जल योगातील धर्ममेघ समाधीच सर्वश्रेष्ठ अवस्था ठरेल. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात योगमार्गाचे भरभरून वर्णन करणारे श्री ज्ञानेश्वर महाराज ग्रंथतात्पर्य सांगताना मात्र -

एथ अविद्यानाश हे स्थळ । तेणे मोक्षोपादान फळ ।
या दोहो केवळ । साधन ज्ञान ॥ ज्ञाने. १८.१२४३

असे म्हणतात हे लक्षात घेण्याजोगे आहे.

योगशास्त्र ही वेदान्तज्ञानाची प्रयोगशाळा आहे. असे Science of Yoga सायन्स् ऑफ योगा या पुस्तकात श्री अप्रबुद्ध यांनी दाखविले आहे. त्यादृष्टीने धर्ममेघ समाधीकडे पाहिले तर मात्र ती सिद्ध अवस्था ठरते; साध्य नव्हे. सिद्ध म्हणजे नित्य सिद्ध स्वरूपभूत तर साध्य म्हणजे काही काळापुरती प्रयत्नांनी संपादन केलेली आगन्तुक अवस्था.

या प्रमाणे, बौद्धमत शब्दाने बौद्ध दर्शन हा अर्थ न घेता मीमांसकांची लोकबुद्धीवर आधारलेली आत्मविषयक धारणा हा अर्थ स्वीकारल्याबरोबर वैदिक षड्दर्शनांची एक आगळीवेगळी आंतरिक संगतीसुद्धा उकलू लागते. त्या दृष्टीने गूढार्थ-दीपिकाकार श्री बाबाजी महाराज पंडित यांच्या प्रतिपादनाकडे ज्ञानेश्वरीचे अभ्यासक नव्या आस्थेने बघतील असा विश्वास वाटतो. आजवर या वाङ्मयरूपकाने व त्यातही बौद्धमतशब्दाने बऱ्याच अभ्यासकांना अस्वस्थ करून ठेवले होते.

या सर्व कोंडीतून गूढार्थ दीपिकाकारांनी मार्ग दाखविला. सर्व अभ्यासक त्यांचे या बाबतीत ऋणी राहतील यात शंका नाही.

डॉ. गु. वा. पिंपळापुरे,
४१ मॉर्डन हाऊसिंग सोसायटी,
प्रतापनगर, नागपूर.

# ज्ञानाचा एका

प्रा. लीना केळकर

जेव्हा जेव्हा समाजाची अवनती होत असते तेव्हा तेव्हा ईश्वर अवतरतो व समाज सावरतो. या दृष्टीने पाहिले म्हणजे सर्व महात्मे परमेश्वरी अवतारच. प्रत्येक संताचे व्यक्तिमत्त्व आणि कार्य त्यांच्या वेळी असलेल्या सामाजिक, धार्मिक व राजकीय परिस्थितीला योग्य असेच असते. तरीही श्रीज्ञानेश्वर व श्रीएकनाथ यांच्या व्यक्तिमत्त्वांचा, चरित्रांचा व वाङ्मयाचा तौलनिक अभ्यास केल्यावर वारकरी पंथात प्रचलित असलेल्या 'ज्ञानाचा एका' या म्हणीची सत्यता विशेष प्रकर्षाने जाणवते. कारण त्यांच्या जीवनांतील कित्येक घटनांत विलक्षण साम्य आढळते.

ज्ञानेश्वरांचा जन्म वैराग्यसंपन्न विठ्ठलपंत व पतिव्रता रूक्मिणीबाई यांच्या पोटी झाला. त्यांचे पणजोबा त्र्यंबकपंत यांना प्रत्यक्ष गोरक्षनाथांचा उपदेश होता. तसेच आजोबा गोविंदपंत व आजी नीराबाई यांना गहिनीनाथांचा उपदेश होता. ज्ञानेश्वरांच्या आजोळी विठ्ठलभक्तीची परंपरा होती. अशी पारमार्थिक दृष्ट्या अत्यंत तेजस्वी व ऐश्वर्ययुक्त, पार्श्वभूमी ज्ञानेश्वरांना लाभली.

जन्मस्थळ आळंदी (अलंकापूर) ही महापुण्यभूमी व अती प्राचीन शिवपीठ. अशा पवित्र तपोभूमीच्या परिसरात त्यांचे बालपण गेले. त्यांच्या वडिलांनी संन्यास घेतल्यावर परत गृहस्थाश्रम स्वीकारला म्हणून त्यांच्या आई-वडिलांना व त्यांच्यासकट त्यांच्या सर्व भावंडांना लोकांचा छळ सोसावा लागला. केलेल्या कर्माचे प्रायश्चित्त म्हणून विठ्ठलपंतांनी व त्यांच्याबरोबर रूक्मिणीबाईनीही देहत्याग केला. अशा तऱ्हेने श्रीज्ञानेश्वरांना बालपणीच मातापित्यांचा वियोग घडला.

श्रीएकनाथांचा जन्म सूर्यनारायण व रूक्मिणी या दंपतीपोटी झाला. सूर्यनारायण हे सूर्यासारखे तेजस्वी व बुद्धिवान होते. रूक्मिणीबाई मोठ्या पतिव्रता व सुशील होत्या. श्री एकनाथांचे जन्मस्थळ प्रतिष्ठान (पैठण क्षेत्र) असून त्याला दक्षिणेची काशी म्हणत असत. जन्मकाळी मूळनक्षत्र असल्याने ते जन्मतांच त्यांचे पिता व थोड्याच दिवसांनी त्यांची माता यांचे मृत्यू ओढवले. अखिल समाजाचे मायबाप बनून राहिलेले हे दोन्ही संत स्वतःच्या आईवडिलांच्या प्रेमाला लहानपणीच पारखे झाले हा एक चमत्कारिक विरोधाभास लक्षांत येतो. असो.

एकनाथांचे पणजे संत श्रीभानुदास हे महाभागवत होते. याच भानुदासांनी अनागोंदीला नेलेली पंढरीच्या विठ्ठलाची मूर्ती आपल्या भक्तिबळाने परत पंढरपूरला आणून प्रस्थापित केली व त्यामुळे त्यांची कीर्ति सर्वतोमुखी झाली. अशी एकनाथांनाही ज्ञानेश्वरांप्रमाणे पारमार्थिक दृष्ट्या तेजस्वी व ऐश्वर्ययुक्त पार्श्वभूमी लाभली.

श्री ज्ञानेश्वरांना विद्वत्ताप्रचुर व वेदविद्यापारंगत विठ्ठलपंतांचे म्हणजे प्रत्यक्ष वडिलांचे मार्गदर्शन लाभले व बालवयातच त्यांनी संस्कृतभाषा, तत्त्वज्ञान व अध्यात्मशास्त्र यांवर प्रभुत्त्व मिळविले. एकनाथांनीही अगदी बालवयांत आपल्या बुद्धीची चमक दाखविली. सहाव्या वर्षी मुंज झाल्यावर ते ब्रह्मकर्म शिकले. संस्कृत भाषा व शास्त्रांचे अध्ययन केले. नाथांची बुद्धी तीव्र असल्यामुळे गुरूंनी विषय समजावून सांगताच, तो ते लगेच आत्मसात करीत, इतका की जणू त्यांना तो पूर्वीच माहीत असावा असे वाटे. या दोन्ही संतांच्या ज्ञानग्रहणाची पद्धत पाहून ज्ञानेश्वरी - अध्याय १४ मधील

"धाराधरकाळें । महानदी उचंबळे ।
तैसी बुद्धि पघळे । शास्त्रजातीं ॥२११॥
अगा पुनवेच्या दिवशी । चंद्रप्रभा धांवे आकाशी ।
ज्ञानीं वृत्ति तैसी । फाके सैंध ॥२१२॥ या ओव्यांची आठवण होते.

श्री ज्ञानेश्वरांचे पारमार्थिक गुरू त्यांचेच ज्येष्ठ बंधू श्री निवृत्तिनाथ, तर श्री एकनाथांचे गुरू श्री जनार्दनस्वामी. दोघांनाही अगदी कोवळ्या वयात गुरुप्राप्ती झाली. निवृत्तिनाथांसारखे केवळ काही दिवस गुरूसान्निध्यात राहून ब्रह्मपद पावलेले अलौकिक गुरु व ज्ञानाचे जणू सगुण रूपच असे ज्ञानेश्वरांसारखे त्यांचे अलौकिक शिष्य! जनार्दनस्वामींचाही अधिकार फार मोठा. त्यांना प्रत्यक्ष दत्तगुरूंचा अनुग्रह होता. श्रीसद्‌गुरू दत्तात्रयांचे त्यांना सगुणरूपात दर्शन होत असे. अशा ब्रह्मनिष्ठ गुरूंचे एकनाथ शिष्य. श्री एकनाथांनी भागवतांत प्रतिपादन केलेले "जो स्वरूपीं करी समाधान । तोचि सद्‌गुरू सत्य जाण ॥" हे सद्‌गुरूलक्षण केवळ शाब्दिक नसून सत्यकथनच आहे. ते अनुभवाचे बोल आहेत.

गुरूभक्ती हा आणखी एक समान गुण. दोघांचीही गुरूभक्ती आत्यंतिक व अजोड आहे. ज्ञानेश्वरी व नाथभागवतांतून ती ठिकठिकाणी प्रकट झालेली आहे. ज्ञानेश्वरीमध्ये अनेक ठिकाणी स्वतःच्या नावाचा उल्लेख 'म्हणे निवृत्तिदासु ।' असा केला आहे. तेराव्या अध्यायातील 'आचार्योपासनम्' ह्या पदावर त्यांनी जे व्याख्यान केले आहे ते अजोड आहे. गुरूंना वंदन करताना

ज्ञानेश्वरांनी रचलेल्या ओव्या वाचून गुरुभक्ति, आदर, जिव्हाळा यांचा महासागर उचंबळला आहे असे वाटते.

तीच स्थिती एकनाथांची झालेली दिसून येते. त्यांनी सर्व ग्रंथात व अभंगांतही स्वतःचा उल्लेख 'जनार्दनाचा एका' (उदा. एका जनार्दनी इ.) असा केला आहे. जणू काही ती त्यांची सहीच आहे. त्यामुळेच सद्गुरुंबद्दल सांगताना त्यांच्या कवित्वाला बहर आलेला आहे. सद्गुरु म्हणजे प्रत्यक्ष परब्रह्म अशी दोघांचीही निष्ठा आहे. केवळ सद्गुरुकृपेमुळेच आपण ग्रंथरचना करू शकतो अशी दोघांचीही दृढ श्रद्धा आहे हे खालील काही ओव्यांवरून सिद्ध होते.

पहिल्या अध्यायात ज्ञानेश्वर म्हणतात – प्रत्यक्ष शंकरालाही गीतेचा थांग लागत नाही, वेदांचीही मति कुंठित होते तेथे माझा पाड कसा लागणार? असे आहे तरी

"परी एथ असे एकु आधारू । तेणेची बोले मी सधरू ।
जे सानुकूळ श्रीगुरू । ज्ञानदेवो म्हणे ।।७५।।

तसेच ११ व्या अध्यायांत म्हणतात –

"तीरें संस्कृताची गहनें । तोडोनी मऱ्हाठिया शब्दसोपाने ।
रचिली धर्मनिधानें । निवृत्तिदेवे ।।९।।

नाथभागवताच्या सोळाव्या अध्यायात (मंगलाचरण सद्गुरुस्तवनांत) श्रीएकनाथ म्हणतात –

"हेतु मातृ दृष्टांतू । न रिघे ज्याचे शिवेआंतू ।"
तो भागवतीचा भागवतार्थू । कैंवियां तू बोलविसी ।।६।।

हंसगीताच्या प्रारंभी नाथ म्हणतात -

"त्या जनार्दनाचे कृपादृष्टी । भागवत सांगो मऱ्हाठिये गोष्टीं।
जें कां आलोडिता ग्रंथकोटी । अर्थी दृष्टी पडेना ।।२४।।

श्रीज्ञानेश्वर व श्रीएकनाथ, तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने 'सर्वं खल्विदं ब्रह्म' या उपनिषदांतून मांडलेल्या अद्वैतसिद्धांताचे पुरस्कर्ते होते. मानवामानवांतील भेद, मानव व विश्व यांतील भेद, विश्व व परब्रह्म यांतील भेद हे सर्व अज्ञानामुळे मानले जातात; पण हे कल्पित भेद ज्ञानोदयाबरोबर नाहीसे होतात. ज्ञानी व्यक्तीला सर्वत्र चिन्मय परब्रह्मच नाना रूपांनी नटलेले आहे असा अनुभव येतो. हे तत्त्वज्ञान केवळ बुद्धीला पटले म्हणून स्वीकारले नव्हते तर या दोन्ही संतांनी त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतला होता व आचरणांत उतरवले होते. नाहीतर रेड्याच्या पाठीवर आसूड ओढताच ज्ञानेश्वरांच्या पाठीवर वळ उठावेत किंवा गाढव तहानेनें तडफडत असलेले पाहून श्रीएकनाथांनी काशीहून रामेश्वरला नेण्यासाठी आणलेले गंगाजल गाढवाला पाजावे याचे दुसरे काय स्पष्टीकरण देणार?

हे अद्वैत तत्त्वज्ञान सामान्य माणसांपर्यंत पोचावे, त्यांचे अज्ञान दूर करावे, त्यांना परमानंदाची प्राप्ती व्हावी अशी दोघांनाही तळमळ वाटत होती. भक्तिमार्गानें मानवाचे आंतरिक परिवर्तन घडून नराचा नारायण बनू शकतो हा संदेश जनसामान्यांपर्यंत पोचविणे हा दोघांच्याही प्रधान ग्रंथाचा (ज्ञानेश्वरी व नाथभागवत) हेतू स्पष्टपणे दिसून येतो.

ही तळमळ वाटण्याचे कारण म्हणजे या दोन्ही संतांच्या वेळची सामाजिक, धार्मिक व राजकीय परिस्थिती होय. श्रीज्ञानेश्वरांच्या काळात भारतात मुसलमानांचा प्रवेश झाला होता पण महाराष्ट्रात मुसलमानी राज्य नव्हते. त्यांच्या धर्माचा जाच जाणवत नव्हता. त्या वेळी वैदिक धर्माच्या ऱ्हासाचे कारण म्हणजे भारतीय संस्कृतीचे पंखाखाली पोसलेल्या पण वैदिक धर्माला कसून विरोध करणाऱ्या जैन, लिंगायत धर्म व महानुभाव पंथांचा प्रसार. ज्ञान व भक्ती, धर्म व कर्म या तत्त्वांचे मूळचे स्वरूप जाऊन विकृत स्वरूप आले होते. महानुभावांच्या कर्महीन व विकृत स्वरूपाच्या उदासवाण्या संन्यासधर्मास लोकाश्रय लाभू लागला होता. कर्मठ आचरणामुळे व असहिष्णु वर्तणुकीमुळे ब्राह्मण समाजाबद्दलचा आदर व प्रेम नाहीसे होऊन चातुर्वर्ण्य समाजव्यवस्थाच नाहीशी करावी या विचाराकडे जनमानस झुकत होते. धर्माचे खरे स्वरूप लोप पावत होते. नीतिमत्तेचा ऱ्हास होत होता.

अशा परिस्थितीत वैदिक धर्माच्या रक्षणासाठी श्रीज्ञानेश्वरांनी गीता या ग्रंथावर नऊ हजार ओव्यांचे भाष्य करून समाजाला योग्य मार्गावर आणण्याचे काम केले. सर्व जीवांना परमार्थप्राप्ती करून देणारे व परमानंदाच्या आगराचे धनी करणारे असे तत्त्वज्ञान व जाती, वर्ण, लिंग भेद न करता सर्वांच्या कक्षेत येईल असा वैदिक धर्माचा संदेश महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यांत पोचविला. ज्यांना आत्मकल्याण हवे असेल त्यांनी वेदबाह्य वर्तन करू नये असें त्यांचे म्हणणे आहे. ज्ञानेश्वरीच्या सोळाव्या अध्यायांत ते म्हणतात –

"या कारणे बापा । जया आथी आपली कृपा ।
तेणे वेदांचिया निरोपा । आन न कीजे ।।४५५।।

इतकेच काय परंतु ते पुढे जाऊन असेही म्हणतात :

शास्त्र म्हणेल जें सांडावें । ते राज्यही तृण मानावें ।
जें घेववी तें न म्हणावें । विषही विरू ।। १६:४६०

तसेच वैदिक धर्मच जगाला तारणारा आहे हे सांगताना

"अहितापासोनि काढिती । हित देऊनी वाढविती ।
नाहीं श्रुतीपरौती । माऊली जगा ।।४६२।।

समाजाला मार्गदर्शनाची किती निकड होती हे त्यांच्या १८ व्या अध्यायांतील खालील ओव्यांवरून कळते.

तेणे कळि कळितु भूतां । आला देखोनि निरुता ।
ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ।।१७५७।।
ना आदिगुरू शंकरा- । लागोनि शिष्यपरंपरा ।
बोधाचा हा संसारा । जाला जो आमुतें ।।१७५८।।
तो हा तूं घेऊन आघवा । कळीं गिळितयां जीवां ।

सर्व प्रकारी धांवा । करी पां वेगीं ॥१७५९॥
मग आर्तचिनि वोरसे । गीतार्थग्रथनमिसे ।
वर्षला शांतरसे । तो हा ग्रंथु ॥१७६१॥

श्री एकनाथांच्या काळात महाराष्ट्रात मुसलमानांनी राज्य स्थापले होते. पैठण शहर अहमदनगरच्या निजामशाहीत होते. नाथांच्या जन्मकाली बुऱ्हाण निजामशहा राज्य करीत होता. मुसलमानी शाह्यांची वारंवार भांडणे होत व सतत लहान मोठ्या लढाया होत त्यामुळे लोकांचे राजकीय जीवन अस्थिर होते. लूटमार, जाळपोळ, बायकांची पळवापळवी इत्यादी अमानुष कृत्यांना तोंड देण्यास प्रजेला सिद्ध असावे लागे. मुसलमान व मुसलमानेतर यांना एक न्याय नसे. मुसलमानांचे भारतात आगमन हे धार्मिक आक्रमणासाठी राजकीय आक्रमण असल्यामुळे, त्यांच्या राजकीय सत्तेने तत्कालीन समाज पार हादरून गेला होता. सतत अन्याय व अपमान झाल्यामुळे मुसलमानेतरांचे जीवन लाचार झाले होते. अस्मिता हरपली होती. परत एकदा हिंदू जनता धर्मापासून दूर गेली होती. शेंदूर फासलेल्या अनंत दैवतांचा सुळसुळाट होऊन, बळी देणे, जादूटोणा करणे, जारणमारण इत्यादी प्रकार धर्मांच्या नावाखाली आचरले जात असत. ईश्वराच्या खऱ्या स्वरूपाचे विस्मरण होऊन अज्ञान, अश्रद्धा व आसुरी गुण यांचे साम्राज्य पसरले होते. पोषाख, भाषा, वर्तन, खाणेपिणे यांत राज्यकर्त्यांचे अनुकरण होऊ लागले. सर्व समाज दीन, दरिद्री, स्वार्थी व अनाचारी बनला होता.

अशा आणिबाणींच्या वेळी श्री एकनाथांनी तत्त्वज्ञान व अध्यात्माच्या मार्गाने समाजाचे परिवर्तन घडवून आणण्याची अवघड जबाबदारी उचलली व श्रीज्ञानेश्वरांनी दाखविलेल्या मार्गाने जाऊन, ती समर्थपणे पेलली यांत तिळमात्रही संदेह नाही.

भारतीयांच्या आध्यात्मिक जीवनात गीता व भागवत या दोन्ही ग्रंथांना, उपनिषदांच्या खालोखाल स्थान आहे. समाजाला योग्य मार्गावर आणण्यासाठी व जगाला तारक अशा वैदिक धर्माचे पुनरूज्जीवन करण्यासाठी श्रीज्ञानेश्वरांनी गीता हा ग्रंथ भाष्य करण्यास निवडला तर श्रीएकनाथांनी समाजोद्धार करण्यासाठी भागवत ग्रंथाची निवड केली. आसुरी गुणांचे दैवी संपत्तीत रूपांतर करणे हे महान जबाबदारीचे काम त्यांनी आपल्या नाथभागवतातून व वाङ्मयाचे अनेक इतर प्रकार योजून केले. त्यांनी नाथभागवतात सांगितलेले तत्त्वज्ञान म्हणजे त्यांनी अनुभवलेल्या व अत्यंत सूक्ष्म दृष्टीने अभ्यासलेल्या मानवी जीवनाचे समग्र दर्शन होय. तत्कालीन समाजात विचारक्रांती व आचारक्रांती घडवून आणण्याची विलक्षण शक्ती असलेले अद्वैत तत्त्वज्ञान मांडून, त्याचे अभिसरण होण्यासाठी, ज्ञानेश्वरीत प्रतिपादन केलेल्या ज्ञानोत्तर अद्वैत-भक्तीचा जोरदार पुरस्कार केला. त्यांच्या सर्व ग्रंथसंपदेतून या मार्गाचा आविष्कार दिसून येतो.

सर्व विश्वाच्या रूपाने श्रीहरीच नटला आहे हे जाणून आपल्यासकट सर्व ठिकाणी श्रीहरीलाच पाहणे हीच ती अव्यभिचारी भक्ति.

"जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ।
हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥११८॥ अध्याय १०

समाजाला आध्यात्मिक व नैतिक भरभराटीसाठी, सहज समजण्याजोगा व अनुसरता येण्याजोगा भक्ती हा एकमेव राजमार्ग. पतितांना पावन करणारी ही भक्ती उदार आहे. हिला कुलाची शुद्धता, शास्त्रज्ञान, वय, रूप, यापैकी कसलेही बंधन नाही. जीवनाची कृतकृत्यता भक्तीतच आहे.

"तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ।
जाती तवंचि वेगळालिया । जंव न पवती माते ॥४६०॥
अध्याय ९ वा

यालागी पापयोनीही अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना ।
माते भजता सदना । माझिया येती ॥४७४॥
अध्याय ९ वा

भक्ती हाच परमार्थाचा राजमार्ग हे दाखवून देताना श्री एकनाथ नाथभागवतात म्हणतात –

"ठसावल्या माझी भक्ति । सकळ सिद्धींची होय प्राप्ती ।
संदेह नाही ये अर्थी । जाण निश्चिती उद्धवा ॥३८॥
भावे करता भगवद्‌भजन । श्वपच जाहले पावन
जेणे भक्तीसी विकिले मन । त्या अधीन सदा देवो ॥४३॥
अशा अनन्य भक्तीला देव भुलतो.

ज्ञानेश्वरी व नाथभागवत या दोन्ही ग्रंथांमध्ये भगवान् श्रीकृष्ण हा मुख्य वक्ता असून, त्याच्या मुखाने या दोन्ही संतांनी तत्त्वज्ञान व आध्यात्माचे अनेक पैलू प्रकट केले आहेत.

सामाजिक परिवर्तन म्हणजे वैचारिक क्रांतीतून आचरणांत क्रांती घडवायची असेल तर लोकशिक्षणाचे प्रभावी साधन म्हणजे तत्कालीन लोकभाषेतून धर्मप्रसार. बदलत्या काळाप्रमाणे आध्यात्मिक तत्त्वांना देखील परिचित रूप धारण करावे लागते. ही जाण या दोन्ही संतांनी, मराठी भाषेत ग्रंथरचना करून दाखविली आहे. वैदिक विद्वान संस्कृतचा अभिमान सोडायला तयार नव्हते. तत्त्वज्ञान, धर्म वगैरे विषयांचे विवेचन संस्कृत भाषेतूनच झाले पाहिजे असा त्यांचा अट्टाहास होता.

या सर्व विरोधाला शांततेने व धैर्याने सामोरे जाऊन श्री ज्ञानेश्वरांनी श्रीएकनाथांपूर्वी तीनशे वर्षे हे क्रांतिकारक पाऊल उचलले होते. प्राकृत भाषेच्या सामर्थ्याबद्दल असलेला त्यांचा आत्मविश्वास व प्रेम खालील ओव्यांत दिसून येते. श्रीज्ञानेश्वर म्हणतात –

"माझा मराठाचि बोलु कौतुकें । परि अमृतातेंही पैजा जिंके।
ऐसीं अक्षरे रसिकें । मेळवीन ।।१४।। अध्याय ६.
जैसे अंगाचेनि सुंदरपणे । लेणियासी अंगचि होय लेणे ।
अळंकारिले कवण कवणें । हे निर्वचेना ।।४४।। अ. १०

श्रीएकनाथांच्या काळीही प्राकृत भाषेला विद्वानांची मान्यता लाभली नव्हती. त्यांना तर प्रत्यक्ष त्यांच्या पुत्राचा, हरिपंडितांचा विरोध सहन करावा लागला. हा विरोध इतक्या थराला गेला होता की त्यांनी पैठण सोडून काशीला बिऱ्हाड केले होते. काशीच्या विद्वानांना जेव्हा कळले की श्रीएकनाथ भागवताच्या एकादश स्कंधावर प्राकृतांत भाष्य करीत आहेत तेव्हा त्यांचा राग अनावर झाला. त्यांनी श्रीएकनाथांना बोलावणे पाठविले. काशीचे बोलावणे म्हणजे विश्वेश्वराचे बोलावणे समजून श्रीएकनाथ काशीला गेले. ग्रंथांची तज्ज्ञांकडून कसोटी घेतला गेली. ग्रंथ अप्रतिम उतरला असल्याने सर्वमान्य झाला. ग्रंथाची सन्मानपूर्वक मिरवणूक काढण्यात आली. काशीच्या पंडितांचे परिवर्तन हा श्रीएकनाथांच्या आयुष्यातील फार महत्वाचा विजय होता.

प्राकृत भाषेबद्दल नाथ म्हणतात,

"संस्कृत वंद्य, प्राकृत निंद्य । हे बोल काय होती शुद्ध ।
हाही अभिमानवाद । अहंता अशुद्ध परमार्थी ।।१०२५।।
माझी मराठी भाषा चोखडी । परब्रह्में फळली गाढी
संत सज्जन जाणती गोडी । त्यालागीं जोडी जोडिला ग्रंथ ।।१०३३।। नाथ भागवत अ. २९

श्रीज्ञानेश्वरांच्या विचारांची दाट छाया एकनाथांच्या वाङ्मयावर दिसते. संतवाङ्मयाचे गाढे अभ्यासक व अधिकारी विद्वान श्री. ल. रा. पांगारकर, आपल्या 'एकनाथी भागवत' या ग्रंथांच्या प्रस्तावनेत म्हणतात, "ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांतील कित्येक शब्द, शब्दरचना किंबहूना चरण अगर ओव्याच नाथभागवंतात तशाच दृष्टीस पडतात."

समर्पित भक्ती व आपणच देवरूप होऊन इतरांत देव पाहाणे हा भागवत संप्रदायाचा मुख्य गाभा. महाराष्ट्रातील अध्यात्मगंगा म्हणजे जनमानसाने मान्य केलेला भागवत संप्रदाय. स्वतः नाथपंथीय असूनही श्रीज्ञानेश्वरांनी आपल्या तत्त्वज्ञानाच्या धारा भागवत संप्रदायात आणून सोडल्या.

श्रीएकनाथांना गुरूपरंपरेने दत्तसंप्रदाय लाभला होता. तरीही त्यांनी भागवत संप्रदायाचे पुनरूज्जीवन करून सत्य धर्म, ज्ञान व श्रेष्ठ प्रतीचे अध्यात्म जातिभेदपंथातीत असून एकात्मतेच्या सिंहासनावर विराजमान झालेले आहे हे सिद्ध करून दाखविले. पंढरपूर हे अशा भागवत धर्माचे आद्यपीठ व तेथील दैवत श्रीविठ्ठल म्हणजे अद्वैत तत्त्वज्ञानाचे व भक्तीचे सगुण स्वरूप. पंथभेद व पंथाभिमान हे केवळ मनाने निर्माण केलेले भेद आहेत.

जे कार्य श्रीज्ञानेश्वरांनी आरंभिले होते तेच कार्य श्रीएकनाथांनी पुढे चालू ठेवले. मानवातले मन जागे केले. जाति-पंथ-लिंग या भेदातील असलेले मानव्य ओळखणे ही त्यांची शिकवण. श्रीज्ञानेश्वर व श्रीएकनाथांना जाऊन शेकडो वर्षे झाली तरी त्यांनी पेटवलेली ज्ञानज्योत अजून तितक्याच तेजाने तेवते आहे व समाजाला मार्गदर्शन करीत आहे.

श्रीज्ञानेश्वर व श्रीएकनाथ यांची आंतरिक जवळीक दाखविणारी घटना म्हणजे ज्ञानेश्वरांनी एकनाथांना स्वप्नांत येऊन दिलेला दृष्टांत. यासंबंधी नाथांचा अभंग असा –

*"श्रीज्ञानदेवे येऊन स्वप्नांत । सांगितली मात मजलागी ।।१।।*
*दिव्यतेजःपुंज मदनाचा पुतळा । परब्रह्म केवळ बोलतसे ।।२।।*
*अजान वृक्षाची मुळी कंठास लागली । येऊनी आळंदी काढ वेगीं ।।३।।*
*ऐसे स्वप्न होतां आले अलंकापुरी । तवं नदी माझारी देखिले द्वार ।।४।।*
*एका जनार्दनी पूर्वपुण्य फळले । श्रीगुरु भेटले ज्ञानेश्वर ।।५।।*

श्रीज्ञाननाथांनी नाथांना ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करण्यास सांगितले. अज्ञानी लोकांनी त्यांत बरेच अपपाठ घातले होते. श्री एकनाथांनी ही जबाबदारी स्वीकारली व तडीला नेली.

वरील विवेचनावरून 'ज्ञानाचा एका' ही वारकरी पंथातील म्हण बुद्धिनिष्ठ लोकही सार्थ मानतील यांत शंका नाही.

प्रा. लीना केळकर
२०, २१, योगायोग सोसायटी,
पी. एम्. रोड,
विलेपार्ले (पू) मुंबई ५७.

---

# आत्मतत्त्व

घनगंभीर त्या निळाईतलं तुझं आकाश कोणतं?
छे! आकाश कां असं तुझं माझं वेगळं असतं?
विशाल अथांग सागरातलं तुझं कोणतं पाणी?
पाणी असं तुझं माझं वेगळं करतं का कोणी?
सर्वव्यापी या किरणामधला तुझा कोणता प्रकाश?
नको तिथं कशाला हा तुझं माझं चा हव्यास?
माझा राम, तुझा रहिम, याचा विठू, त्याचा ख्रिस्त?
इथेच कां मोडलीस मग अद्वैताची शिस्त?
अजून कां मानत नाहीस एकच अथांग आत्मतत्त्व?
कशासाठी जपायचं असं पोकळ स्वत्व? असं पोकळ स्वत्व?

सौ. मंदाकिनी कुलकर्णी

# अद्वैती ज्ञानदेवांची परतत्त्वनिष्ठा

डॉ. सुशीला पाटील

'एकोऽ हम् बहु स्याम् ।' या आदिम स्फुरणानंतर प्रगटलेले हे विश्व नानाविधत्वाने नटलेले आहे. या विश्वात एक वस्तू दुसरीसारखी नाही. प्रत्येक जातीतील प्रत्येक व्यक्ती तेथे आपल्या व्यक्तिवैशिष्ट्यानं आपली स्वतःची ओळख पटवीत राहते. त्यामुळेच आपल्या अवतीभवती 'व्यक्ती तितक्या प्रकृती' वावरताना दिसतात. प्रकृतिभिन्नत्वामुळे प्रत्येकाच्या चिंतनमननाची रीतही, आगळी वेगळी जाणवते. 'पिण्डे पिण्डे मतिर्भिन्ना' । याचा अनुभव पदोपदी येतो. जसजसा या भिन्नतेचा मागोवा घ्यावा तसतसा विश्वाच्या बहुविधतेचा पसाराच डोळ्यात भरत राहतो. या पसाऱ्यात आपण स्वतःलाही दूर ठेवतो. जग वेगळे आणि आपण वेगळे ही द्वैताची जाणीव आपल्या मनीमानसी जागती असते. या द्वैतसृष्टीतील मानापमानात, रागलोभात, हर्षशोकात सुखदुःखात आपण सदैव गुरफटलेले असतो. 'एकोऽ हम बहु स्याम् ।' या स्फुरणातील 'बहु स्याम्' चा अनुभव आपण सतत घेतो आणि आधारभूत अशा 'एका'ला मात्र सपशेल विसरतो. परंतु एखादा द्रष्टा विचारवंत मात्र या विश्वाला आरपार पाहतो. अंतर्बाह्य न्याहाळतो. मूळ बीज कोणते अन् त्याचा फुलारलेला बहर कोणता ते तो नेमके ओळखतो. आपल्या हळूवार दृष्टीने विश्वातला द्वैताचा पापुद्रा तो अलगद बाजूला सारतो आणि नानाविविधतेच्या तळाशी असलेली एकता बघत राहतो. तिची शाश्वतता जाणतो. द्वैतातील अद्वैत हेरतो अन् मग त्याला 'पिण्डी ते ब्रह्मांडी' असा अद्वैतानुभव येतो. सर्वत्र एकच एक केवलतत्त्व त्याला दिसू लागते.

ज्ञानदेव असे द्रष्टे आहेत. अद्वैती आहेत. सर्वगत आणि सर्वातीत अशा ब्रह्मतत्त्वावर त्यांची नितांत निष्ठा आहे. 'ब्रह्म' या शब्दात वाढणे- पसरणे या अर्थाचा 'बृंह्' हा धातू आहे. जे बृहत्पणाने अणुरेणूला व्यापून उरते ते ब्रह्मतत्त्व होय! या ब्रह्मतत्त्वाला वेदांतील महावाक्यांनी अनेक परींनी दृग्गोचर केले आहे. 'अहं ब्रह्माऽस्मि' । मी ब्रह्म आहे. या महावाक्यात प्रथमपुरूषी 'मी' चा आणि 'ब्रह्मा'चा स्वतंत्र उल्लेख असला तरी विश्वांतर्गत ब्रह्मभावाशी 'मी'ची एकरूपता दर्शविली आहे. 'सोऽहम्' तो (परमात्मा) मी आहे. या महावाक्यातही 'मी' चा परमात्मरूप बोध आहे. स्वेतरांबद्दल 'तू' असा उल्लेखही महावाक्यात आला आहे. 'तत् त्वमसि' ते (विश्व) तू आहेस या महावाक्यात द्वितीय पुरूषी 'तू' आणि विश्व यांच्यातील ऐक्य स्पष्ट केले आहे. 'मी ब्रह्म आहे' किंवा 'ते विश्वतत्त्व तू आहेस' या सारख्या महावाक्यात 'मी' व 'तू' या उल्लेखाने नकळत 'मी' चा आणि 'तू' चा देहभाव सुचित होत आहे. कोणताही 'मी' वा 'तू' देहधारीच असतो. देहधारणेला आधार देहातील आत्मतत्त्वाचा असतो. देह गौण असतो तर आत्मतत्त्व महत्त्वाचे असते. म्हणून 'अयमात्मा ब्रह्म' हा आत्मा ब्रह्म आहे. या महावाक्यातून देहान्तर्गत आत्मतत्त्व आणि ब्रह्म यांच्यातील अभेद दर्शविला आहे. अशा रीतीने विश्व देह, आत्मा यांच्यातील एकात्मता ब्रह्मबोधाने या महावाक्यांनी अधोरेखित केली आहे. वेदकाळापासून मानवी जाणिवेने विश्वाच्या गाभ्याशी असणाऱ्या ब्रह्मतत्त्वापर्यंत झेप घेतली आहे. ज्ञानदेवांसारख्या द्रष्ट्या तत्त्वज्ञांनीही वेळोवेळी विश्वांतर्गत ब्रह्मभाव उजळून टाकला आहे. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव चांगदेव पासष्टी आणि स्फुट अभंग या साऱ्यातून ज्ञानदेवांनी याच ब्रह्मभावाचे संकीर्तन केले आहे. वेगवेगळ्या उपायांनी एका वस्तूला आत्मतत्त्वाला जाणून घेणे ज्ञानदेवांना आवश्यक वाटते. ते म्हणतात - 'ऐसे हे उपाये बहुवस एक आहे ।

जाणावेया होये एकी वस्तू । १३.१०४७

या ब्रह्मतत्त्वालाच ज्ञानदेव 'परतत्त्व' (श्रेष्ठ तत्त्व) असे म्हणतात. अवतीभवतीच्या बहुविध सृष्टीतही ते केवळ त्या एका परतत्त्वाचाच वेध घेत राहतात. त्याच्या ठायीच विश्रांत होऊ इच्छितात. या परतत्त्वावर त्यांची असीम श्रद्धा आहे. नितांत निष्ठा आहे. अशा प्रकारच्या निष्ठावंतांच्या निष्ठा त्यांच्या समग्र जीवन व्यवहारातून अखंड स्फुरत राहतात. त्यांना तोच एक ध्यास अहोरात्र असतो. ज्ञानदेव म्हणतात - 'दिसो परतत्त्व डोळा पाहो सुखाचा सोहळा । रिघो महाबोधसुकाळामाजि विश्व ।' १३.११५६

परतत्त्वदर्शनाने विश्वाचे रहस्य उलगडेल आणि महाबोधाच्या सुखाचा आस्वादसोहळा साऱ्या विश्वाच्या अनुभवाला येईल, असे त्यांना वाटते. ज्ञानदेवांच्यो समग्र जीवन व्यवहाराचे एकमेव लक्ष्य हे परतत्त्व आहे. आपल्या कवित्वाला देखील परतत्त्व-स्पर्श लाभावा म्हणून ते उत्सुक आहेत. त्यांचे जीवनमूल्य 'परतत्त्व' आहे आणि त्यांचे वाङ्मयमूल्यही 'परतत्त्वच आहे.' इंद्रियशक्तीत बुद्धीची सर्वश्रेष्ठता सांगताना त्यांनी सर्वश्रेष्ठ काव्याचे – परतत्त्वस्पर्श झालेल्या काव्याचे उपमान घेतले आहे.

'वाचे बरवे कवित्व कवित्वीं बरवे रसिकत्व ।
रसिकत्वीही परतत्त्वस्पर्शु जैसा ।' १८.३४५

ज्ञानेश्वरीतील रसवत्ता आणि कल्पकता यांची धावही सतत परतत्त्वाकडे असलेली दिसते.

हे परतत्त्वच समग्र विश्वाला व्यापून उरलेले ज्ञानदेवांना जाणवते. त्याचप्रमाणे विश्वाची कारकशक्तीही परतत्त्वातच त्यांना दिसते. गीतेतील भगवान ज्ञानदेवांना परतत्त्वाचा प्रतिनिधी वाटतो. ज्ञानेश्वरीत भगवानाच्या मुखातून सृष्टीतील बहुविधतेच्या रहस्यावर ते प्रकाश टाकतात.

'जैसे दूध मुरालें स्वभावे तरि तेचि दधि ।
का बीजचि जाले तरू अथवा भांगारचि अलंकारू ।
तैसा मज एकाचा विस्तारू ते हे जग ।' ९.६४,६५

दूधाचे दही व्हावे, बीजाचा तरू व्हावा, सोन्याचे दागिने व्हावे तसा परतत्त्वाचा हा विस्तार जगात झाल्याचे स्पष्ट चित्र ते येथे रेखाटतात. विश्वाचे असे वास्तव भान त्यांना आहे. त्याचप्रमाणे येथील रूपसृष्टीचेही नेमके मूल्यन त्यांनी केले आहे. दृश्य लौकिक विश्वाचा मायामय पापुद्रा त्यांना नश्वर वाटतो आणि त्या विश्वाच्या अंतरंगातील एकतत्त्व ते नेमके हेरतात. शाश्वत परतत्त्वाचा वेध घेतात.

'जे उपजे आणि नाशे ते मायामय दिसे ।
एरवी तत्त्वता वस्तु असे अविनाशचि ।' २.१०५

अविनाशी आत्मवस्तूची पुरती ओळख असूनही येथील बहुविध चंचल सृष्टीचा ते दुःस्वास मात्र करीत नाहीत. त्या बहुविधतेतही त्यांना आत्मतत्त्वाचा, परतत्त्वाचा विलास दिसतो.

'जैसे पवने तोय हालविले आणि तरंगाकार जाले ।
तरि कवण के जन्मले म्हणो तेथ ।' २.१०६

अथांग पाणी वाऱ्यामुळे लहरी-लहरीत विभागलेले वाटते. तशी त्यांनी येथील विविधता भासते. दृश्य विविधतेमागील एकता ते पाहतात. या ज्ञानदृष्टीने आनंदित होतात. आपल्यासारखाच ज्ञानजन्य आनंद इतरांनाही व्हावा अशी अपेक्षा बाळगतात. त्या करता शब्दमाध्यमाची कास ते धरतात. शब्दांच्या सामर्थ्यावर त्यांचा विश्वास आहे. वास्तविक शब्दांचे माध्यम हे तसे द्वैतातले माध्यम आहे. बोलणारा आणि ऐकणारा शब्दमाध्यमात अभिप्रेत आहेत. अद्वैतभावात शब्द व्यर्थ ठरतात. तिथे मग मौनालाच मिठी मारावी लागते. पण ज्ञानदेव मात्र शब्दमाध्यमाच्या संदर्भात 'मी बोलेन बोलीं अरूपाचे रूप दावीन' ६३६ असे म्हणतात. अरूप-परतत्त्वाचे रूप-ते शब्दातून सांगू इच्छितात. त्यांची ही उक्ती वरवर विरोधात्मक वाटते. कारण जे अरूप असेल ते रूपवान होणार नाही आणि जर ते रूपवान होणार असेल तर ते अरूप राहणार नाही. पण ज्ञानदेव 'बोलीं अरूपाचे रूप दावीन' असे प्रतिज्ञावजा आश्वासन देतात. वाणीच्या म्हणजे वैखरीच्या साहाय्याने अरूपाला रूप देणाऱ्या ज्ञानदेवांची वाणी ही तुमच्याआमच्यासारखी साधी लौकिक वैखरी नाही. परा-पश्यन्ती-मध्यमा या गूढ वाणींच्या जगातून फेरफटका मारून आलेली आणि त्या तीनही वाणींशी निगडित असलेली अशी त्यांची वैखरी आहे. त्यामुळे ती निःशब्दाचा पदर धरूनच प्रगट होते आणि म्हणूनच ती शब्दांच्या पलीकडचे शब्दात टिपू शकते. 'बोलू निमे ते बोलणे' ७.२०५ ती बोलते. जिथे बोलणेच खुंटते तिथे ती सहज प्रवेशते आणि म्हणूनच ज्ञानदेवांची वाणी अरूपाचे रूप दर्शवू शकते. ज्ञानेश्वरीच्या प्रारंभी 'हे अपार कैसेनि कवळावे' असा प्रश्न त्यांना पडला होता. पण नंतर आपल्या अमोघ शब्द सामर्थ्याने ज्ञानदेवांनी त्या अपाराला बोलाच्या चिमटीत पकडले आहे. ते पाहून असे वाटते की, ज्ञानदेव ज्ञात आणि अज्ञात यांच्या उंबरठ्यावर उभे आहेत. त्यामुळे त्यांना दोन्हीकडचे सारखेच स्पष्ट दिसते. सामान्य माणसाच्या दृष्टीची क्षमता जिथे संपते त्यापलीकडचेही त्यांना दिसते आणि त्यांना जे दिसते ते त्यांची समर्थ वाणी शब्दांच्या साहाय्याने सर्वसामान्यांच्या पुढ्यात उभे करते.

शब्द सामर्थ्याप्रमाणेच मराठी भाषामाध्यमाचे सामर्थ्यही त्यांनी जोखले आहे. संस्कृत गीता मराठीतून सांगण्याचे मुख्य कारण म्हणजे गीतेतील तत्त्वज्ञान बहुजनसमाजाला सहजी समजावे हे आहे. तत्कालीन पंडितांचा मराठीतून गीतातत्त्व सांगण्याला विरोध होता. मराठी ही तेव्हाची उपेक्षित लोकभाषा होती. संस्कृत हीच ज्ञानाच्या आदानप्रदानाची मान्यताप्राप्त भाषा होती. पण ज्ञान-प्रसाराच्या उत्कट मनीषेतून ज्ञानदेवांनी मराठी भाषेचे सामर्थ्य ओळखले. या संदर्भातील त्यांचे प्रतिज्ञावचनही प्रसिद्ध आहे. ते म्हणतात,

'माझा मऱ्हाठाचि बोलू कवतुके ।
परि अमृतातेही पैजेसि जिंके ।
ऐसी अक्षरे रसिके मेळवीन । ६.१४

मराठी भाषेचे अंतस्थ सामर्थ्य अन् गोडवा पाहून त्यांना अमृताचे उपमान आठवते. अमृत देहाला अमर करते. पण मराठीतून सांगितले जाणारे हे तत्त्वज्ञान मराठी मनाला चिरंतनाची ओळख पटविते. देहाच्या अमरत्वापेक्षा मनाला होणारी चिरंतनाची ओळख अधिक हितकर आहे. म्हणूनच ज्ञानदेवांचा मराठी बोल अमृतालाही पैजेवर जिंकणार असे ते म्हणतात. त्याकरता एकेक रसाळ अक्षर मिळवण्याची ग्वाही ते देतात.

या रसवत्तेमुळेच त्यांचे परतत्त्वविवेचन आस्वाद्य होणार याचीही त्यांना खात्री आहे. अरूप परतत्त्वाला शब्द बंदिस्त केल्यानंतर अमृतमधुर मराठी भाषेत परतत्त्वाचे विवेचन केल्यानंतर आपल्या श्रोत्यांनी त्याचा आस्वाद घ्यावा अशी ज्ञानदेवांची अपेक्षा आहे. आपले सारे आस्वाद इंद्रियांच्या कक्षेतले असतात. परतत्त्व जसे वाचातीत आहे तसेच ते इंद्रियातीतही आहे. पण ज्ञानदेव वाचातीताला वाचेत आणण्याची जशी प्रतिज्ञा करतात तशीच

अतींद्रियाला इंद्रियांच्या कक्षेत आणून इंद्रियांकडून त्याच्या आस्वादाचीही शक्यता ते प्रतिज्ञेवर सांगतात. 'अतींद्रिय परि भोगवीन इंद्रियांकरवी' । ६.३६ असे म्हणतात. इतकेच नव्हे, तर या आस्वादनाची रीतीही ते उलगडून दाखवतात. दूरस्थ पण अंतस्थ अशा वाचातीत, इंद्रियातीत असलेल्या परतत्त्वाचा हा आस्वाद आहे. तो श्रोत्यांनी अत्यंत हळूवारपणाने, आत्यंतिक कोमलपणाने आणि तितक्याच तटस्थपणाने घ्यावा असे ज्ञानदेव विवध दाखल्यांच्या द्वारा स्पष्ट करतात. चकोराची लहानगी पिले ज्या कोमलतेने शरदाच्या चांदण्याचे प्राशन करतील ती कोमलता ज्ञानदेवांना या आस्वादात हवी आहे.

'जैसे शारदियेचे चंद्रकळे-माजि अमृतकण कोवळे ।
ते वेचिती मने मवाळे चकोरतलगे ।' १.५६

या हळूवारपणाबरोबरच अलगदपणाही त्यांना या आस्वादात अपेक्षित आहे. परागकणांना जराही न दुखविता भुंगा जसा कमलपुष्पाचा आस्वाद घेतो तसा अलगदपणा त्यांना या आस्वादनात असावा असे वाटते.

'जैसे भ्रमर परागु नेती परि कमलदले नेला नेणति ।
तैसि परि आहे सेविती इये ग्रंथी ।' १.५९

या आस्वादनात हळूवार अलगदपणाबरोबरच तटस्थपणाही असावा असे त्यांचे मत आहे. त्याकरता आकाशातील चंद्राला पाहून फुलणारी कुमुदिनी त्यांना आठवते.

'आपुला ठावो न सांडिता आलिंगिजे चंद्रु प्रगटता ।
हा अनुराग भोगिता कुमुदिनी जाणे ।' १.६०

वाचातीत, इंद्रियातीत असे हे परतत्त्व शब्दमाध्यमातून मराठी भाषेतून भोगण्याची आस्वादण्याची ही कोमल, अलिप्त, तटस्थ रीत ज्ञानदेव सांगतात. आस्वादनावर, प्रत्यक्ष अनुभवण्यावर ते भर देतात. संत नामदेवदेखील 'एकतरी ओवी अनुभवावी' असे म्हणतात. 'ओवी अनुभवणे' म्हणजे त्या ओवीतील शब्दांमागचा अथांग आशय समजून घेणे, आणि त्या आशयात स्वतःला विसर्जित करणे होय. शब्दमाध्यमातून अरूप परतत्त्व पाहणे. त्याप्रत स्वतःला झोकून देणे. अशा अध्यात्मानुभवात ज्ञानेश्वरी या ग्रंथाचे विसर्जन आहे. अंतर्मुख वृत्तीच्या विवेकशीलांसाठीच ज्ञानदेवांचा हा प्रयास आहे.

'अध्यात्मशास्त्री इये एक अंतरंगचि अधिकारिये ।' १८.१७२८ असे त्यांनीच म्हटले आहे. अर्जुनासारखे उत्सुक श्रोतेच हे तत्त्वविवेचन ऐकण्यास योग्य होत असेही ते प्रारंभीच म्हणतात.

'अहो अर्जुनाचिये पाती जे परिसणेया योग्य होती ।
तिहीं कृपा करूनि संती अवधान देयावे ।' १.६२

अर्जुनासारख्या अधिकारी श्रोत्यांनाच ज्ञानेश्वरीच्या बोलातील 'अरूपाची रूपे' भावतील त्या रूपामागील अमूर्त परतत्त्वाचा आस्वाद घेता येईल असे ते म्हणतात.

ज्ञानेश्वरीला 'भावार्थदीपिका' असेही म्हटले जाते

'भावार्थ' म्हणजे गोळाबेरीज अर्थ असे समजले जाते. पण ज्ञानेश्वरीत गीतेचा गोळाबेरीज अर्थ नाही. तर त्या त्या शब्दामागील अमूर्त अर्थवत्ता या ग्रंथात मूर्त झाली आहे. त्यामुळे येथे गीतार्थ हा दृष्टीचा साक्षात् विषय झाला. अमूर्त अर्थ मूर्त झाला असे ज्ञानदेव म्हणतात.

'गीतार्थु मऱ्हाठिया केला लोकालागि या ।
दिठीचा विखो ।' १८.१७७५

परंतु 'दृष्टीचा विषय' म्हणून हा गीतार्थ केवळ डोळ्यांनाच तोषवितो असे मात्र नाही. या गीतार्थाचा आस्वाद कसा घ्यावा ते तर ज्ञानदेवांनी परोपरीने सांगितलेच आहे पण त्याचबरोबर हा आस्वाद केवढा संपन्न, समृद्ध अन् त्यामुळेच सकळ इंद्रियांना तोषविणारा आहे. तेही त्यांनी अत्यंत आकर्षक आणि नाट्यात्मक पद्धतीने सांगितले आहे. वास्तविक शब्द ऐकणे हा कानांचा धर्म आहे, रस चाखणे हा जिभेचा, तर वास घेणे हा नाकाचा धर्म आहे. पण ज्ञानेश्वरीतील शब्द इतके रसाळ आहेत की, ते ऐकता ऐकता कानांना जणू जिभा फुटतात. आपला आस्वादनाचा गुण कानांनी घेतला म्हणून जीभ कानांशी भांडू लागते. नाकाला त्या शब्दांचा गंध जाणवतो आणि हा आपलाच आस्वादविषय आहे असे नाकाला वाटते. डोळ्यांना तर हे शब्द पाहून जणू काही रूपाची खाणच आपल्या पुढ्यांत उघडली असे वाटते आणि तो शब्द डोळ्यांना त्यांच्या आस्वादनाचा विषय वाटू लागतो. असा हा ज्ञानेश्वरीतील शब्दांचा आस्वाद पंचज्ञानेंद्रियांना संतुष्ट करणारा आहे. सर्व ज्ञानेंद्रियांच्या संतोषाने सहावे इंद्रिय जे मन ते इतके सुखलीन होते की, आत्यंतिक आनंदापोटी त्या शब्दांना अलिंगन धायला ते पुढे धावते. अशी ही गीतार्थाच्या आस्वादाची समृद्धी ज्ञानदेव अतिशय उत्कटत्वाने सांगतात.

'साहाजे शब्दु तरि विषो श्रवणाचा ।
परि रसना म्हणे का रसुचि हा आमुचा ।
घ्राणासि भावो जाय परिमळाचा हा तोचि का होईल ।
नवल बोलतिये रेखेची वाहाणी ।
दाविता डोळेयाही पुरो लागे आणि ।
ते म्हणति, उघडिली का खाणी रूपाची हे ।
जेथ संपूर्ण पद उभारे तेथ मनचि धावे बाहिरे ।
बोलू भुजाही आशेभरे आलिंगावेया ।' ६.१७,१८,१९

अशी ही सर्वांगीण आस्वाद्यता ज्ञानेश्वरीत अवतरली. कारण अरूप परतत्त्वाला ज्ञानदेवांनी रूप दिले. अतींद्रियांना इंद्रियांच्या आटोक्यात आणले. गीतार्थ केवळ दृष्टीचाच नव्हे तर सकल

इंद्रियांचा आस्वादविषय केला.

ज्ञानेश्वरी या गीताभाष्याचा विस्तार देहातील आत्मतत्त्वापासून तो विश्वतत्त्वापर्यंत आहे. या ग्रंथाचा प्रारंभ आत्मरूपाच्या जयजयकाराने होतो. प्रत्येक जीवमात्राच्या ठायी असणारे स्वसंवेद्य आत्मरूप ज्ञानदेवांनी प्रथम वंदिले आहे. आपला 'स्व' जागा असल्याखेरीज आपल्याला कोणतेही ज्ञान होऊ शकत नाही. म्हणून वेदप्रतिपाद्य असा स्वसंवेद्य आत्मभाव ग्रंथारंभी ज्ञानदेवांनी जागवला आहे. त्याचा त्यांनी आदर केला आहे. त्याला नमन केले आहे.

'ॐ नमोजी आद्या वेदप्रतिपाद्या ।
जय जय स्वसंवेद्या आत्मरूपा ।' १.१

असे ते म्हणतात. सर्वत्र व्यापलेला ब्रह्मरूप परमात्मा प्रत्येक प्राणिमात्रांमध्ये आत्मरूपात आहे. त्याला जाणण्यासाठी दुसऱ्या कोणत्याही साधनाची गरज नाही. तो 'स्वसंवेद्य' आहे. 'स्व' म्हणजे आत्मतत्त्व होय. त्यानेच तो परमात्मा यथार्थतेने जाणता येतो. या आत्मरूपाचे प्रतिपादन वेदांनी केले आहे म्हणून ते 'वेदप्रतिपाद्य' आहे. या स्वसंवेद्य वेदप्रतिपाद्य आत्मरूपाची ओळख पटली की 'हे विश्वचि माझे घर' ही वृत्ती स्थिरावते. आत्मरूप विश्वरूप एक होते. ग्रंथाच्या प्रारंभीचे स्वसंवेद्य आत्मरूप अखेरच्या अध्यायात विश्वात्मक झाले आहे आणि या विश्वात्मक देवाला ज्ञानदेवांनी अभिवादन केले आहे.

'आता विश्वात्मके देवे येणे वाग्यज्ञे तोषावे ।
तोषोनि मज द्यावे पसायदान हे ।' १८.१७७२

असे म्हणून ज्ञानदेवांनी विश्वात्मक देवाला विश्वकल्याणकारी असा प्रसाद मागितला आहे. ज्ञानेश्वरीच्या आरंभीचे आत्मरूप आणि अखेरचा हा विश्वात्मक देव हे एकरूपच आहेत. त्यामुळे या ग्रंथात आत्म्याचा विश्वात्मकापर्यंतचा प्रवासच मूर्त झाला आहे. व्यष्टीपासून समष्टीपर्यंतची ही वाटचाल आहे. ज्ञानदेवांच्या जाणिवेतील प्रारंभीचे लहानसे व्यक्तिविशिष्ट आत्मरूपच जणू विस्तारत विस्तारत विश्वात्मकापर्यंत पोचले आहे. पिंडातले परतत्त्व त्यांनी ब्रह्मांडात पाहिले आहे.

भाष्याच्या प्रारंभी आत्मरूपाला वंदन केल्यानंतर त्यांना कार्यारंभी गणेशवंदन करण्याची प्रथा आठवते. गणेश ही ज्ञानाची देवता आहे. पण साऱ्याच देवता या द्वैतसृष्टीतल्या आहेत. देव वेगळा आणि भक्त वेगळा असे हे द्वैत आहे. ज्ञानदेवांना द्वैत मान्य नाही. म्हणून ते आत्मरूपाला उद्देशून 'देवा, तूचि गणेशु ।' १.२ असे म्हणून गणेशाला आत्मरूपातच पाहतात. ज्ञानदेवांचा गणेश म्हणजे ज्ञानदायिनी शक्ती आहे. कोणतीही शक्ती ही अरूप असते. तिचे कार्य तेवढे दिसते. त्यामुळे ज्ञानदेवांचा गणेश 'सकलार्थमति प्रकाशक' १.२ सकल अर्थशक्तींनी मतीला प्रकाशित करणारा. या कार्यरूपातच साकार होतो. ज्ञानदृष्टीमुळे आपली मती प्रकाशित होते. ज्ञानदृष्टी ग्रंथांमुळे लाभते. त्यामुळे ज्ञानदेव ग्रंथांचा सन्मान करतात.

उपलब्ध सारी ग्रंथसंपदा ज्ञानदेव गणेशाच्या अंगोपांगाच्या ठायी, दागदागिन्यांच्या ठायी विराजमान करतात. त्यामुळे नेहमीचा लंबोदर, पीतांबरधारी वक्रतुंड गणेश लोपतो आणि त्या जागी ज्ञानदेवांचा ग्रंथगणेश नव्याने साकारतो. 'स्मृति तेचि अवयव ।' १.३ या थाटातील हा ग्रंथ गणेश पाहून आपणास गणेशाच्या ठायी असणारी अमूर्त ज्ञानशक्तीच प्रकर्षाने मूर्त झाल्याचे जाणवते. त्या त्या ग्रंथांचे योग्य ते मूल्यमापनही सिद्ध होते. परतत्त्वाच्या ज्ञानसाधनेकरता स्मृती महत्त्वाच्या आहेत, आधारभूत आहेत. म्हणून त्या गणेशाच्या अवयवांच्या जागी ज्ञानदेवांनी ठेवल्या आहेत. तात्त्विक सिद्धान्त आकर्षक कथारूपात मांडणारी अठरा पुराणे ही गणेशाची शोभादायक मणीभूषणे आहेत. मनोरंजन करणारी काव्य नाटके गणेशाच्या पायातील रुणुझुणु नाद करणाऱ्या घागऱ्या आहेत. अशा रीतीने त्या त्या ग्रंथाची मौलिकता ज्ञानदेवांनी नेमकेपणाने व्यक्त केली आहे.

ज्ञानदेव 'बोली अरूपाचे रूप' कसे सादर करतात ते त्यांच्या ग्रंथगणेशावरून सहज स्पष्ट होते. अमूर्त ज्ञानशक्तीला ते ग्रंथरूपात मूर्त करतात आणि मूर्त परिचित गणेशाला अमूर्त ज्ञानशक्तीचे अधिष्ठान देतात. एकीकडे बोली 'अरूपाचे रूप' दाखवतात तर त्याचवेळी दुसरीकडे 'रूपाचे अरूपही' स्पष्ट करतात. ज्ञानेश्वरीत अशी कितीतरी अरूपाची रूपे आणि रूपाची अरूपे प्रगटली आहेत. या रूपसृष्टीमुळेच ज्ञानेश्वरीला सर्वांगीण आस्वाद्यता लाभली आहे. परतत्त्वाने भान जागा करणारा आणि त्याद्वारा ब्रह्मबोध उजळून टाकणारा हा ग्रंथ प्रामुख्याने शांतरसपर आहे. अधूनमधून त्यात अद्‌भुतता आहे. त्यामुळे आश्चर्यचकित करणाऱ्या या ग्रंथात अन्य लौकिक भावभावनांचाही परिपोष झाला आहे. ज्ञानदेव आलंकारिक भाषेत आपल्या ग्रंथाची रसवत्ता सुस्पष्ट करतात. हे शांताचे घर आहे. येथे अद्‌भुत पाहुणा आला आहे. या पाहुण्यांच्या पंगतीला अन्य लौकिक रस आहेत. त्यामुळे अनायसेच साऱ्या रसांना शांताचा आश्रय लाभला आहे. लौकिकाला अलौकिक परतत्त्वाचा स्पर्श झाला आहे.

'येथ शांताचिया घरा अद्‌भुत आला पाहुणेरा
येराही रसा पातिकरा जाहला मानु ।' ११.२

अशी ही ज्ञानेश्वरीची रसवत्ता आहे. या रसास्वाद्यतेच्या मुळाशी ज्ञानदेवांची अखिल विश्वाला पालाण घालू पाहणारी एक स्थिर वृत्ती आहे आणि ती म्हणजे अद्वैती ज्ञानदेवांची परतत्त्वनिष्ठा!

डॉ. सुशीला पाटील
ज्ञानदीप
राठी नगर, अमरावती - ४४४ ६०३.

# तैं भूतसृष्टीची पडे टांकसाळ

डॉ. रवींद्रनाथ वामन रामदास

गीतेचे तत्त्वज्ञान जनसामान्यांपर्यंत पोहोचावे म्हणून ज्ञानेश्वरांनी तिचे मराठीत विवेचन केले. अनेक उदाहरणे देऊन ज्ञानेश्वरांनी आध्यात्मासारखा गूढ विषय सोपा करून सांगितला आहे.

सर्व प्राणिमात्र परा व अपरा या दोन प्रकृतींपासून निर्माण झाले आहेत. त्याप्रमाणे सर्व जगाचा आदि व अंत 'मी' आहे याचे विवरण करताना ज्ञानेश्वरांनी टांकसाळीची उपमा दिली आहे.

*ते सूक्ष्म प्रकृति कोडे । जे स्थूळाचिया आंगा घडे ।*
*तैं भूतसृष्टीची पडे । टांकसाळ ॥७.२२॥*
*चतुर्विध ठसा । उमटों लागे आपैसा ।*
*मोला तरी सरिसा । परि थरचि आनान ॥७.२३॥*
*होती चौऱ्यांशी लक्ष थरा । येरा मिती नेणिजे भांडारा ।*
*भरे आदिशून्याचा गाभारा । नाणेयांसी ॥७.२४॥*
*ऐसे एकतुके पांचभौतिक । पडली बहुवस ढांक ।*
*मग तियें समृद्धीचे लेख । प्रकृतीची धरी ॥७.२५॥*
*जे आंखूनी नाणे विस्तारी । पाठी तयाची आटणी करी ।*
*माजी कर्माकर्मांचिया व्यवहारी । प्रवर्तु दावी ॥७.२६॥*

ती सूक्ष्म प्रकृति जेव्हा आवडीने स्थूल महाभूतांच्या अंगांना घडविते, तेव्हा भूतसृष्टीची (म्हणजे प्राणिमात्राचा उत्पत्तीची) टांकसाळ सुरू होते. या टांकसाळीतून निघणाऱ्या प्राणरूपी टांकाचे चार ठसे आपोआप उमटू लागतात. जरायुज, अंडज, स्वेदज व उभ्दीज असे हे चार प्रकारचे ठसे आहेत. यांची किंमत सारखीच आहे. पण त्यांची वर्गवारी मात्र भिन्नभिन्न आहे. यांच्या वर्गवारीची एकूण संख्या चौऱ्याऐंशी लक्ष आहे. शिवाय मुख्य वर्गात आणखी जे पोटवर्ग आहेत त्यांची तर गणतीच नाही. अशा अपरंपार प्राणिरूपी नाण्यांनी निर्गुण, निराकार, अव्यक्त बीजाचा गाभारा भरून जातो. अशा प्रकारे पंचमहाभूतांची सारख्या तोलाची इतकी विपुल नाणी पडतात की, एकट्या प्रकृतिमायेलाच त्यांची गणती करता येते. ज्या नाण्याची आखणी करून ती तयार करते तेच नाणे ती नंतर आटपून टाकते. मात्र मध्यंतरीच्या अवस्थेत ती त्याच्याद्वारे कर्माकर्माचा व्यवहार चालविते.

पंधराव्या अध्यायात ज्ञानेश्वर सांगतात,

*जेतुले पांचभौतिक घडते । जे नामरूपा सांपडते ।*
*गुणत्रयाच्या पडते । कमळां जे ॥१५.४८०॥*
*भूताकृतीचे नाणे । घडत भांगारें जेणे ।*
*काळासी जूं खेळणे । जिहीं कवडां ॥१५.४८१॥*

जे जे पंचमहाभूतांचे बनले आहे, ज्याला ज्याला नामरूप आहे, जे जे गुणत्रयींच्या कचाट्यात सापडते, ज्या सोन्याचे भूतमात्ररूपी नाणे घडते, ज्या कवडसा ढाळून काळाबरोबर जुगाराचा खेळ चालू असतो, विपरीत ज्ञानाने म्हणजे भ्रममोहाने जे जे जाणले जाते, ते क्षणोक्षणी उत्पन्न होते व नष्ट होते.

*जैसे कां कुडे नाणे । खऱ्याचेनि सारखेपणे ।*
*डोळ्याचेही देखणे । संशयी घाली ॥४.८६॥*

जसे खोटे नाणे खऱ्यासारखे हुबेहूब दिसून जाणकारालाही भ्रमात पाडते. त्याचप्रमाणे कर्म म्हणजे काय आणि अकर्माचे लक्षण कोणते याचा विचार करता करता शहाणेही गुरफटून गेले आहेत.

*परि तेचि ऐसेनि निवाडे । जैसे भेसळले खरे कुडे ।*
*मग काढिजे फाडोवाडे । पारखूनिया ॥९.४३॥*

नवव्या अध्यायात ज्ञानेश्वर सांगतात,

खरी खोटी नाणी एकत्र मिसळली असता अशी त्यांची निरनिराळी फाडे लावून निवड करण्यात येते, त्याचप्रमाणे ज्ञात आणि विज्ञान ही वेगळी करून तुला दाखवू.

*राजाज्ञेची अक्षरें आहाती । तिये चामा एका जया पडती ।*
*तया चामासाठी जोडती । सकल वस्तु ॥४५३॥*
*वाचूनि सोने रूपे प्रमाण नोहे । एथ राजाज्ञाचि समर्थ आहे ।*
*तेंचि चाम एक जे लाहे । तेणे विकती आघवी ॥४५४॥*
*तैसे उत्तमत्व तैंचि तरे । तैंचि सर्वज्ञता सरे ।*
*जै मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमे ॥४५५॥*

राजाज्ञेची अक्षरे एखाद्या चामड्याच्या तुकड्यावर उठविण्यात आली म्हणजे त्या चर्मखंडाच्या मोबदल्यात सर्व वस्तू मिळू शकतात. तोच राजाज्ञेचा अक्षरांचा ठसा नसेल तर सोन्यारूप्याच्या तुकड्यांनाही कोणी हाती धरीत नाहीत. तेव्हा सर्व माहात्म्य राजाज्ञेचे आहे, आणि राजाज्ञेच्या अक्षरांनी अंकित झालेले एखादे चर्मखंड जर लाभेल तर त्याच्याच साह्याने वाटेल ती वस्तू विकत घेता येते. त्याप्रमाणे जेव्हा माझ्या प्रेमाने मन आणि बुद्धीही तुडुंब भरून जातात तेव्हाच मोठेपणा व सर्वज्ञता ही उपयोगी पडतात.

सतराव्या अध्यायात ज्ञानेश्वर महाराज सांगतात,

*पैं भांगार जरी पंधरे । तऱ्ही राजावलीची अक्षरें ।*
*लाहे तैंचि सरे । जियापरी ॥१७.३२०॥*

सोने शुद्ध असले तरी त्यावर राजमुद्रा उमटली तरच ते व्यवहारात नाणे म्हणून चालते.

*तरी सच्छब्दे येणे । आटुनि असताचे नाणे ।*
*दाविजे अव्यंगवाणे । सत्तेचे रूप ।।१७.३८०।।*

या 'सत्' शब्दाने 'असत्' म्हणजे अज्ञानजन्य नामरूपात्मक विश्वाचे नाणे आटून सत्‌तत्त्वरूपी सुवर्णाचे खरे निर्दोष स्वरूप व्यक्त होते.

ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीत नाणकविषयक ज्या संज्ञांचे विवेचन केले आहे, याचा मागोवा घेण्याचा हा प्रयत्न.


डॉ. रवींद्रनाथ वामन रामदास
एम्. ए. पीएच्. डी
१३, भारती भवन,
७३, किडवई मार्ग,
माटुंगा, मुंबई ४०० ०१९.


---

# किमया

*नभ झाकोळते उदास भासते*
*लख्ख ऊन पडताच प्रसन्न वाटते ।।*
*मन चंचल अस्थिर होते*
*पाहता पाहता स्तब्ध राहते ।।*
*वेड्या मनाचे खेळ चालतात असे*
*आपले परके ओळखावे कसे? ।।*
*मन पाखरा पाखरा*
*तुला कसे रे आवरू*
*कळते ना मला*
*मला कसे मी सावरू? ।।*
*ज्ञानेशाच्या ओवीने केली ही किमया*
*मनाच्या गाभारी हसे ज्ञानराया ।।*
*हसत खेळत नित्यकर्मे करावी*
*फलाची अपेक्षा सोडूनिया द्यावी ।।*
*अर्जुनाच्या मिषे सांगितली गीता*
*कृष्णाचा हा सांगावा माझ्यासाठी होता ।।*
*ज्ञानेशाच्या ओवीमुळे सारे गवसले*
*ज्ञानीया चरणी मस्तक ठेवियले ।।*

**सौ. स. अ. करंदीकर**

# सागरास

*गर्जतोस तू गरजतोस तू*
*सांग सतत काय सांगतोस तू*
*म्हणतोस काय तू मानवाला*
*तयार रहा सतत समर्पणाला*
*का सांगतोस तू आम्हाला*
*विशाल हृदय हे करावयाला*
*आकाशाचे प्रतिबिंब तुझ्याच ठायी*
*सूर्यालाही सामावून तू घेई*
*तुझेच पाणी तुझीच रेती*
*तुझेच शिंपले तुझेच मोती*
*करतोस सारे दान जगाला*
*तरीही ठरतोस कारण कलहाला*
*अंतःकरण तुझे का व्यथित होई*
*मानवनिर्मित प्रदूषणापायी*
*सावरकरांशी तुझेच नाते*
*म्हणूनच तुज का भरती येते*
*जे आम्हाला प्रेरणादायक*
*विवेकानंदांचे त्या तूंच स्मारक*
*म्हणूनच वाहतोस का रे अश्रु*
*गतस्मृती त्या कशा विसरू*
*तुझे उदात्त रूप पाहता*
*विचार येतो मनी एकदा*
*घ्यावे तुझे ते विराट रूप*
*ते विशाल हृदय ते मोठे मन*
*स्पर्शावे तुझे चरण*
*करावे तुझे सतत स्मरण*
*अर्पावे तुजसमान जीवन*
*तुजला आमुचे अभिवादन*

**क्षितिजा सोमण**

# वैराग्य : योगमार्गातील पहिले पाऊल

डॉ. कालिदास जोशी

आपल्याला नेहमी सुख मिळावे आणि दुःखाचा प्रसंग येऊ नये अशी प्रत्येक माणसाची इच्छा असते. ज्या गोष्टींपासून सुख मिळते त्यांच्याविषयी प्रत्येकाच्या मनात जी ओढ, आसक्ती, लालसा, वासना, प्राप्तीची इच्छा असते तिला योगाच्या परिभाषेत 'राग' असे म्हणतात. अनुराग किंवा प्रीती हे त्या मूळ प्रेरणेचेच स्वरूप आहे. तिलाच तृष्णा असे नांव दिले जाते. ही तृष्णा हेच जीवनातल्या सर्व दुःखाचे मूळ असल्याने तिचा नाश करणे, तिच्यापासून दूर राहणे, तिच्या पाशातून सुटका करून घेणे, हे सर्वांत प्रथम आवश्यक आहे असा उपदेश बौद्ध, जैन यांच्यासकट सर्वच भारतीय साधकांना नेहमीच केलेला आढळतो.

तसे पाहिले तर भोगेच्छा, सुखाची ओढ किंवा तृष्णा हे माणसाला कोणत्याही व्यवहारात प्रवृत्त करणारे मुख्य कारण आहे. मुळात इच्छा नसेल तर कोणतीही क्रिया किंवा व्यवहार होणारच नाही. इच्छा नसत्या तर मानवाची प्रगती होऊच शकली नसती. इच्छा असतात आणि त्यांच्या पूर्ततेतून सुख मिळविता येते, म्हणूनच तर जीवनाला काही अर्थ आहे. समजा जीवनात आपल्या पृथ्वीवर अशी परिस्थिती असती की प्रत्येकाच्या मनात उद्‌भवणारी प्रत्येक इच्छा आपोआपच पूर्ण होऊ शकली असती, तर मग इच्छांना नियंत्रणात ठेवणे, मनाला आवर घालणे, तृष्णा नाहीशी करणे, या कल्पना उद्‌भवल्या नसत्या. पण जीवनाचे स्वरूप तसे नसल्याने सर्व इच्छा पूर्ण झाल्या असे कधी घडत नाही. कित्येक इच्छा अतृप्तच राहतात असे प्रत्येकाच्या अनुभवाला येते. इच्छा अतृप्त राहण्याने दुःख होते आणि हे दुःख आपल्यापैकी प्रत्येकाच्या वाट्याला येत असते. ते दुःख प्राप्त न व्हावे, त्यापासून सुटका किंवा मुक्ती मिळावी यासाठी दोनच उपाय शक्य आहेत. एक तर सर्व इच्छा पूर्ण होणे, किंवा तसे होऊ शकत नसेल तर मग इच्छा, वासना, तृष्णा, यांनाच सोडून देणे, त्यांच्यावर विजय मिळविणे किंवा मनातून तृष्णा किंवा राग यांचा अभाव होणे. याला वितृष्णा किंवा वैराग्य असे म्हणतात. वैराग्य म्हणजे राग किंवा आसक्तीचा अभाव होणे. वैराग्यावाचून योगमार्गात प्रगती होणे, किंबहुना प्रवेश होणेच अशक्य आहे. म्हणूनच वैराग्य हे योगमार्गातील पहिले पाऊल ठरते.

भोगेच्छा किंवा 'राग' ही सर्व माणसांच्या मनात असणारी सार्वत्रिक आणि स्वाभाविक बाब आहे. तिच्यामुळे मन नेहमी विषयांच्याकडे आकर्षित होत राहते. ते नेहमी चंचल आणि अस्थिर राहते. राग किंवा भोगेच्छा कमी झाली तर मनाचे विषयांच्या



(म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पंचज्ञानेंद्रियांचे विषय आहेत, त्यांच्या) मागे धावणे कमी होऊन, त्यांची चंचलता कमी होऊन ते स्थिर होऊ लागते. योगमार्गात ही स्थिरता अत्यंत आवश्यक आहे. वैराग्यावाचून ही स्थिरता प्राप्त होऊ शकत नाही.

वैराग्य ही स्वप्नातून किंवा झोपेतून जागे होण्यासारखी स्थिती आहे. ती एक नवचैतन्याची, किंवा अंधकार नाहीसा होऊन प्रकाशाचा उदय होण्यासारखी अवस्था आहे असे म्हणता येईल. पण ती अवस्था फारच थोड्या लोकांच्या ठिकाणी दिसून येते. कठोपनिषदात त्याचे कारण पुढील शब्दांत सांगितले आहे.

पराचि खानि व्यतृणत्स्वयंभूः ।<br>
तस्मात् पराङ् पश्यति नान्तरात्मन् ।<br>
कश्चित्, धीरः प्रत्यगात्मानमैक्षत् ।<br>
आवृत्तचक्षुः अमृतत्वमिच्छन् ॥ २:१:१

म्हणजे असे की ज्ञानेंद्रिये स्वभावतःच बहिर्गामी आहेत. आत्मज्ञानाच्या आणि अमरत्वाच्या इच्छेने क्वचित एखादाच धैर्यशाली मनुष्य इंद्रियांना माघारी वळवू शकतो.

पण असे असले तरी आपल्यापैकी प्रत्येकाला कधीकधी वैराग्याचा निश्चितपणे अनुभव येतो. तो येतो शवयात्रेच्या वेळी. मृत व्यक्तीचे नाते जितके जवळचे, मृत्यु जितका अकस्मात्, आणि वय जितके तरुण असेल तितके हे वैराग्य तीव्र असते. त्याला म्हणतात स्मशानवैराग्य. त्याचा प्रभाव थोडाच वेळ टिकतो. योगमार्गात त्याचा विशेष उपयोग होत नाही. योगात उपयोगी पडणारे वैराग्य म्हणजे साधकाच्या स्वभावाचे एक अंग बनले पाहिजे. पतंजलींनी योगसूत्रात (१:१५) अशा वैराग्याची व्याख्या "अनुभवाला येणाऱ्या (दृष्ट) आणि ऐकिवात असलेल्या (आनुश्रविक) अशा दोन्ही प्रकारच्या भोगविषयांच्या संबंधात वितृष्ण होणे" अशा शब्दांत केली आहे. वितृष्ण म्हणजे तृष्णेचा अभाव होणे. या सूत्रावरील वाचस्पति मिश्रांच्या टीकेत या वैराग्याच्या चार पायऱ्या सांगितल्या आहेत. पहिल्या पायरीला यतमान वैराग्य म्हणतात. तेव्हा वितृष्णेची नुकतीच सुरूवात झालेली असते. दुसरी पायरी, व्यतिरेक वैराग्य, म्हणजे अनेक विषयांचे आकर्षण मनातून नाहीसे होणे. तिसऱ्या एकेंद्रिय वैराग्याच्या अवस्थेत भोगेच्छा जवळ जवळ नष्ट झालेली असते, पण तरीही थोडेसे कुतूहल मनात शिल्लक असते. तेही नाहीसे झाले की चौथी वशीकार वैराग्याची अवस्था प्राप्त होते. त्याच्याही पुढे वैराग्याची एक श्रेष्ठ अवस्था असते. तिला 'परवैराग्य' असे म्हणतात. ती जीवनमुक्त व्यक्तींच्या ठिकाणी आढळणारी अवस्था आहे.

वैराग्याच्या महत्त्वाचे वर्णन प्राचीन साहित्यात अनेक ठिकाणी आढळते. शंकराचार्यांनी केनोपनिषदावरील भाष्यात सुरूवातीस "केवळ विरक्त पुरूषालाच आत्मज्ञानाची पात्रता असू शकते, इतरांना नाही" असे स्पष्टपणे म्हटले आहे. वैराग्य अंगी नसल्यामुळे कित्येकदा मोठाले नामवंत आणि ख्यातिप्राप्त योगी, महाराज, महर्षि, भगवान आणि आचार्य अत्यंत अडचणीत आल्याची उदाहरणें फार पूर्वीच्या काळापासून आढळतात. दक्षस्मृती या ग्रंथात (७:३७:३८) अशा योगपथभ्रष्टांना 'कुतपस्वी' असे म्हटले असून, त्यांच्या आचरणांची वैशिष्ट्ये पण सांगितली आहेत. वैराग्याचा अभाव हेच त्यांच्या पतनाचे मुख्य कारण असते. ही गोष्ट विष्णुपुराणात (४:२:५२) पुढील श्लोकात फार सुंदर रीतीने स्पष्ट केली आहे.

*निःसंगता मुक्तिपदं यतीनां संगादशेषाः प्रभवन्ति दोषाः ।*
*आरूढयोगोऽपि निपात्यतेऽधः संगेन योगी किमुताल्पसिद्धिः ॥*

म्हणजे, भोगेच्छा ही अनेक दोषांना जन्म देते आणि प्रगत साधकाचेही पतन घडविते, तिथे सामान्यांचा काय पाड?

वैराग्य हे नदीच्या अवखळ प्रवाहाला अडविणाऱ्या धरणासारखे म्हणता येईल. योगसूत्रावरील व्यासभाष्यात (१:१२) चित्ताला नदीची समर्पक उपमा दिली आहे. ही चित्तनदी वैराग्याचा बांध घालून अडविल्यावर पुढे तिला कैवल्य किंवा मुक्तीच्या मार्गाला लावण्याच्या प्रयत्नांना 'अभ्यास' असे म्हणतात. अभ्यासाची अनेक रूपे होऊ शकतात, जसे भजन, पूजाअर्चा, आसन, प्राणायाम, फलाशेचा त्याग, ध्यानाचा अभ्यास किंवा सरळ आत्मज्ञानाचा अवलंब. अभ्यासाचे स्वरूप कोणतेही असले तरी त्याला आधी वैराग्याची बैठक पाहिजेच. ती कशी प्राप्त होईल हे ज्ञानेश्वरीत (१५:३८:३९) ज्ञानदेवांनी पुढील शब्दांत सांगितले आहे.

जे विषे रांधिली रससोये । जैं जेवणारा ठाऊवी होये ।
तैं तो ताटचि सांडूनि जाये । जियापरी ॥१५:३८॥
तैसी संसारा या समस्ता ॥ जाणिजे जैं अनित्यता ॥
तैं वैराग्य दवडिता । पाठी लागे ॥१५:३९॥

डॉ. कालिदास जोशी
एफ् ३०५, रम्यनगरी,
पुणे - ४११ ०३७.

## स्वप्नांच्या राज्यांतून

*अहो, एकदा गंमतच झाली*
*सकाळ व्हायची राहूनच गेली*
*सूर्य गेला होता झोपेत*
*त्याला उठवायला त्याची आईच नाही आली*
*आठ वाजले तरी सगळीकडे अंधारबुडुक*
*इतका उशीर झाला तरी सर्व चिडीचूप*
*अहो, पक्षांनी पण काय घेतल्या*
*होत्या झोपेच्या गोळ्या*
*सर्वांना उठवायला त्यापण नाही झाल्या गोळा*
*हळूहळू परिस्थिती सर्वांच्या लक्षात आली*
*सूर्याच्या निद्रेने भीती घर करून बसली*
*आता काय करावे म्हणून सुरू झाला*
*गोंधळ*
*सूर्याला उठवायला निघायची झाली*
*सुरू धावपळ*
*मग शेवटी सर्वांनी सूर्याला गदागदा*
*हलविले*
*सूर्याला हलविले खरे पण का कोण जाणे*
*धक्के मलाच बसले*
*अहो, आईच उठवत होती मला सकाळ*
*झाली म्हणून*
*आणि नंतर मी जागी झाले*
*"स्वप्नांच्या राज्यातून"*

**कु. तृप्ती कपटकर**
पी-१, रम्यनगरी, पुणे - ४११ ००३७.

# ज्ञानेश्वरीतील अध्यात्मशास्त्र

– ह.भ.प. कृष्णकांत नाईक

संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांचे काळी ईश्वराचे सगुण साकार रूपाला एक आगळेच महत्त्व प्राप्त झाले होते. ईश्वराच्या मूर्तीची तांत्रिक पूजा म्हणजे भक्ती होय ही समजूत सर्व सामान्यांमध्ये रूढ झाली होती. व्रत-वैकल्ये, होमहवने आणि तीर्थयात्रा यांना धर्माचे स्वरूप लाभल्यामुळे सर्वत्र कर्मकांडाचे स्तोम माजले होते. शुद्र व अशुद्र कल्पनामुळे विचारांत व आचारात विसंगती निर्माण झाली होती. यास्तव खऱ्या वैष्णव धर्माचा दीप प्रज्वलित करून त्याच्या प्रकाशात ज्ञानाची वाट दाखविण्यासाठी ज्ञानेश्वरांनी आपले शिष्य सच्चिदानंदांकडून भावार्थदीपिका नावाचा ग्रंथ लिहून घेतला. कालांतराने या ग्रंथाचे नामकरण ज्ञानेश्वरी असे झाले, की ज्या ज्ञानेश्वरी ग्रंथामधून ज्ञानेश्वरांनी गीतेवर विस्तारपूर्वक भाष्य केले आणि गीता हेच परब्रह्माचे स्वरूप आहे असे जनसामान्यांना प्रतिपादन केले.

*की परमधाम प्रकट । सर्व विद्यांचे मूळपीठ ।*
*शास्त्रजाता वसिष्ठ । अशेषांचे ॥* अध्याय १ ओवी ३०

(किंवा ही कथा म्हणजे गीताशास्त्र प्रत्यक्ष परब्रह्म असून सर्व विद्यांचे प्रमुख स्थान आहे त्याचप्रमाणे सर्व शास्त्रांमध्ये श्रेष्ठ आहे.)

खरोखरच ज्ञानेश्वरी हा ग्रंथ अलौकिक व असामान्य असून सर्व ग्रंथांचा राजा आहे. या ग्रंथांमध्ये देवदेवतांची स्तुती, तीर्थयात्रांचे वर्णन अथवा निरनिराळ्या चमत्कारांचे स्तोम नसून द्वैत व अद्वैत भक्तीचा आविष्कार असून सिद्धान्त, तत्वज्ञान व आत्मसाक्षात्काराचा त्रिवेणी संगम घडवला आहे. नवरसांची पेरणी करून अलंकारयुक्त शब्दांच्या योजनेने हा ग्रंथ काव्यमय झालेला आहे. भावनेची कोमलता, कल्पनाशक्तीची उदारता आणि रचनेची सहजता ही या ग्रंथाची वैशिष्ट्ये असून योगमाध्यमाद्वारे ज्ञान, कर्म व भक्तीचा चातुर्याने मिलाफ साधून ज्ञानेश्वरांनी अध्यात्मशास्त्राचा पायाच रचला आहे. इतर सर्व शास्त्रे जीवनातील मूल्यांचा आपआपल्या दृष्टीने विचार करतात. परंतु अध्यात्मशास्त्र हे अंतिम मूल्याचा विचार करते.

चैतन्याचे म्हणजे तेजाचे एकत्व व अविनाशत्व सांगणाऱ्या विद्येला अध्यात्मशास्त्र अशी संज्ञा आहे. ज्ञानेश्वरांनी गीतेला अध्यात्मशास्त्र संबोधून ज्ञानेश्वरी ग्रंथात प्रामुख्याने ज्ञानाला विशेष महत्त्व दिले. उदाहरण द्यावयाचे झाल्यास वारा फक्त अभ्रे दूर करतो, तो सूर्याला निर्माण करीत नाही, अभ्रे दूर गेली की सूर्याचे दर्शन घडते. तद्‌वत आत्मस्वरूपाचे आड येत असलेले अज्ञान नाहीसे झाले की आत्मस्वरूपाचे ज्ञान होते. हे ज्ञान म्हणजेच ब्रह्मविद्या होय. ज्ञानेश्वरांनी ही ब्रह्मविद्या सर्वसामान्यांना परिचित करून दिली किंवा हे विश्व ब्रह्म केले हाच त्यांनी केलेला सर्वश्रेष्ठ चमत्कार होय. या चमत्काराचा अर्थ असा की, "विश्व हे वेगळे नसून ते चिन्मय ब्रह्मच आहे किंवा अविनाशी चैतन्य हे प्रत्येकाचे स्वरूप असून यालाच ब्रह्मविद्या म्हटले जाते" असा सिद्धांत मांडला.

*इये मऱ्हाठियेचि नगरी । ब्रह्मविद्येचा सुकाळु करी ।*
*घेणे देणे सुखचिवरी । हो देईं या जगी ॥*

अध्याय १२ ओवी १६

(या मराठी भाषेच्या नगरीत आत्मज्ञानाची रेलचेल करून या जगाला केवळ ब्रह्मसुखाचे देणे घेणे होऊ देत.)

ब्रह्मज्ञानाचा प्रचार होऊन सर्वांना अध्यात्मज्ञान प्राप्त व्हावे अशी ज्ञानेश्वरांची तळमळ आहे. कारण हे ब्रह्मज्ञान शोकग्रस्त व संकटग्रस्त माणसाला मुक्त करते आणि त्याच्या संसारात सुख समाधान व शांतीचे साम्राज्य मिळवून देते.

*जे इंद्रियांचे आडी । प्रवृत्तीचे पाय मोडी ।*
*जे दैन्यचि फेडी । मानसाचे ॥* अध्याय १३ ओवी १६९

(जे ज्ञान इंद्रियांची द्वारे बंद करते, बहिर्मुख वृत्तीचे पाय मोडते आणि मनाचे दारिद्य नाहीसे करते)

ज्ञानेश्वर हे अद्वैताचे पुरस्कर्ते असून गीता ही "अद्वैतामृतवर्षिणी" असल्यामुळे या अमृताची मेजवानी सर्वांना प्राप्त व्हावी व त्यायोगे हे विश्व आनंदित व्हावे यासाठी ज्ञानेश्वर प्रयत्नशील आहेत. त्यांनी उपनिषदेतून अद्वैतवाद स्वीकारला. शंकराचार्यांच्या मायावादाला सम्मति दिली आणि गौडपादाचार्यांकडून अजातवाद ग्रहण केला.

अविनाशी तत्त्व म्हणजे अद्वैतवाद असून या चैतन्यावर येणारे भासमय आकार ही मायावादाची प्रतीके आहेत आणि या आकारांना जो जाणून घेतो तो अजातवाद होय. याचा अर्थ असा की भौतिक देह किंवा विश्व परमात्म्याच्या दृष्टीने कधीच अस्तित्वात नसते. परमात्म्याचे हेच खरे अस्तित्व असून भूतभौतिकांचे अस्तित्व सर्परज्जूप्रमाणे आहे.

*तरी आता देह असो अथवा जावो ।*
*आम्ही तो केवळ वस्तुचि आहो ।*
*की जे दोरी सर्पत्व वावो । दोराचिकडूनि ॥*

अध्याय ८, ओवी २४८

(तर आता देह असो अथवा जावो आम्ही तर केवळ ब्रह्मच आहोत कारण की जसे दोरीवर भासलेला सर्पपणा दोरीच्या दृष्टीने मिथ्या आहे.)

हेच ज्ञानेश्वरांचे सर्वसामान्यांना समजलेले अध्यात्मशास्त्र की ज्यावर भागवत धर्म उभारला असून त्याला वारकरीपंथ असे म्हटले जाते. हा पंथ विवेकप्रधान असून लौकिक व पारलौकिक क्षेत्रांत जीवनाविषयीचे समतोल राखणारे तत्त्वज्ञान सांगतो. डोळे मिटून वेदशास्त्राचे प्रामाण्य मानलेच पाहिजे. रूढी व परंपरांचे आचरण केलेच पाहिजे. ही तत्कालीन पंडितांनी रुजवलेली समजूत वारकरी पंथाला मान्य नसल्यामुळे ज्ञानेश्वर दाखला देतात–

*जरी वेदे बहुत बोलिले । विविध भेदे सूचिले ।*
*तरी आपण हित आपुले । तेचि घेणे ॥*

अध्याय २, ओवी २६०

(जरी वेदात खूप गोष्टी सांगितल्या आहेत. अनेक विधिनिषेधाचे प्रकार सुचवले आहेत तरी त्यांपैकी जेवढे काही आपल्या हिताचे असेल तेवढेच घ्यावे.)

यास्तव विश्वाचे जड व नामरूपांनी दिसणारे स्वरूप खरे नसून ते मायिक आहे, असा विचार जर प्रत्येकाने केला तरच त्याचे आयुष्य आनंदमयी ठरेल यात संदेह नाही. कारण विनाश आकाराला असतो, मूळ वस्तूला नसतो. उदाहरणार्थ, मातीपासून तयार केल्या गेलेल्या निरनिराळ्या आकारांना विनाश आहे मातीला नाही. त्याचप्रमाणे विश्वाचा विनाश आहे चैतन्याचा नाही. देहाचा विनाश आहे पण देहामधील असलेल्या आत्म्याचा विनाश नाही. कारण आत्मा अमर आहे.

*हा अनादि नित्यसिद्धु । निरुपाधि विशुद्धु ।*
*म्हणऊनि शस्त्रादिकी छेदु । न घडे यया ॥*

अध्याय २, ओवी १४५

(हा आत्मा अनादि, नित्यसिद्ध, (शाश्वत) उपाधिरहित व अत्यंत शुद्ध असा आहे, म्हणून याचा शास्त्रादिकांच्या योगाने घात होत नाही.)

बाह्य साधनांनी केलेली ईश्वराची पूजा ही खऱ्या अर्थाने भक्ती नसून कर्मफुलांनी केलेली पूजा ईश्वराला मान्य आहे. देवदेवतांना भजण्यापेक्षा स्वधर्माचे आचरण करणे हाच खरा संसार-यज्ञ असून प्रत्येकाने कर्म हे केलेच पाहिजे असे ज्ञानेश्वरांचे आग्रही मत आहे. कर्म करीत असताना कर्मातील आसक्तींचा त्याग करून मिळालेले फळ ईश्वरार्पण करणे हाच कर्मयोग आहे.

*परी कर्मफळी आस न करावी । हे सत्क्रीयाची आचरावी ।*
*आणि कुकर्मी संगती न व्हावी । हेतुवीण ॥*

अध्याय २, ओवी २६६

(परंतु कर्मफळाच्या ठिकाणी आशा न ठेवता, निषिद्ध कर्म न करण्याविषयी प्रवृत्ती होऊ न देता हा सदाचार निष्काम बुद्धीने आचरावा.)

किंबहुना नित्यनैमित्तिक कर्मे करून त्याचे फळ स्वीकारावे. मात्र आध्यात्मिक कर्मापासून मिळालेल्या फळांचा त्याग करणे इष्ट आहे. रुग्णसेवा, समाजसेवा, रंजल्यां-गांजल्याची सेवा हीच आध्यात्मिक सेवा असून ती प्रामाणिकपणे करणाऱ्या स्थितीला नैष्कर्म्य अवस्था म्हटले जाते किंवा यालाच निष्काम कर्मयोग अशीही संज्ञा आहे. या निष्काम कर्मयोग्याने समाजातले अज्ञान नाहीसे करून सर्वसामान्यांना ज्ञानाचा प्रकाश दाखवावा असे ज्ञानेश्वरांनी सूचित केले.

*मार्गी अंधासरिसा । पुढे देखणाही चाले जैसा ।*
*अज्ञाना प्रकटावा । धर्मु तैसा ॥*

अध्याय ३, ओवी १५६

(रस्त्याने आंधळ्याच्या बरोबर पुढे चालणारा डोळस मनुष्य आंधळ्यास सांभाळून घेऊन त्याचेबरोबर चालतो त्याप्रमाणे अज्ञानी मनुष्याला ज्ञानी मनुष्याने आपण आचरण करून धर्म स्पष्ट करून दाखवावा.)

कर्म करीत असता सामाजिक आणि कौटुंबिक कृत्ये पार पाडण्यासाठी व्रतवैकल्ये अथवा तीर्थयात्रा करणे उचित आहे. व्रतामुळे चित्ताची शुद्धी होते तर तीर्थयात्रेमुळे निसर्गाचे सान्निध्य मिळून संतांचा सहवास प्राप्त होतो अशी ज्ञानेश्वरांची धारणा आहे. मात्र तीर्थक्षेत्री स्नान केल्यामुळे पापे नाहीशी होतात, व्रत केल्यामुळे फलप्राप्ती होते आणि पूर्वजांचे श्राद्ध केल्यामुळे त्यांना मुक्ती मिळते किंवा नवस केल्यामुळे इच्छित वस्तू पदरात पडते या अंधश्रद्धेला ज्ञानेश्वरांचा पूर्णपणे विरोध असून ईश्वराचे ठायी मन व बुद्धी स्थिर केल्यास कल्याण होते असा ज्ञानेश्वरांचा उपदेश आहे.

*जे मन बुद्धी इही । धर केले माझे ठायी ।*
*तरी सांगे मग काई । मी तू ऐसे उरे ॥*

अध्याय १२, ओवी ९९

(कारण की मन व बुद्धी ही माझे ठायी कायमची राहिली तर मग मी व तू असे द्वैत उरेल काय? ते सांग.)

थोडक्यात स्थितप्रज्ञाची भूमिका प्रत्येकाने स्वीकारावी, मान अपमान यांना समान लेखणारे, सुखदुःखात स्थिर असलेले, कामक्रोधाचा त्याग केलेले आणि विश्वात सर्व ठिकाणी ईश्वराचे स्वरूप पाहणारे तसेच रंजल्यागांजल्याची सेवा करणारे पुरुष स्थितप्रज्ञ असतात. हे स्थितप्रज्ञ विवेकी असून संन्यासमार्गाने मिळणाऱ्या मोक्षापेक्षाही भूतजाताच्या प्रेमाने केलेल्या निष्काम कर्तव्यकर्मांनी ईश्वराला प्रसन्न करून घेणारे मोक्षाचीच अपेक्षा करतात. आचरणाने शुद्ध असलेले हे स्थितप्रज्ञ भूतजाताच्या

कल्याणाचा मार्ग अनुसरतात हाच अध्यात्मशास्त्राचा गाभा आहे.

*ऐसेनि माझेनि नामघोषे । नाहीची करिती विश्वाची दुःखे ।*
*अवघे जगची महासुखे । दुमदुमित भरले ॥*

अध्याय ९, ओवी २००

(या प्रमाणे माझ्या नामघोषाने ते विश्वाची दुःखे नाहीशी करतात व सर्व जगच ब्रह्मसुखाने जिकडे तिकडे कोंदून भरतात.)

शंकराचार्यांच्या मते जग हे मिथ्या असून क्लेशदायक आहे. यासाठी संन्यासाश्रम स्वीकारून मोक्षपद प्रत्येकाने पदरात पाडून घ्यावे. अर्थात ज्ञानेश्वरांना शंकराचार्यांचे मत अथवा तत्त्व मान्य नाही. शंकराचार्यांच्या तत्त्वानुसार जग हे क्षणिक व क्लेशदायक असले तरी ते अभावात्मक नाही कारण गीतेमध्ये "माम् भजस्व" हे भक्तियोगाचे सूत्र सांगून जग हे सुखदायी आहे हा भावात्मक सिद्धांत सांगितला आहे. या सिद्धांताचा ज्ञानेश्वरांनी प्रचार करून प्रत्येकाने आपले मन सदोदित प्रसन्न ठेवले तर दुःख त्याच्या वाटेला जाणार नाही, असे सर्वसामान्यांना पटवून दिले.

*तैसे हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैंचें कें आहे ।*
*तेथ आपैसी बुद्धी राहे । परमात्मरूपी ॥*

अध्याय २, ओवी ३४०

(त्याप्रमाणे अंतःकरण प्रसन्न झाले तर मग दुःख कसले आणि कुठले? त्या वेळी परमात्मस्वरूपाचे ठिकाणी बुद्धि सहजच स्थिर होते.)

जगात असणारे चार वर्ण म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र, ब्रह्मदेवाने निर्माण करून एकमेकांना क्षुद्र न लेखता कर्मयोगाची कास धरावी, असे सांगितले. ज्ञानेश्वरांनीही जातिभेदाची तमा न बाळगता प्रत्येकाने अभेदवृत्ती स्वीकारावी असा उपदेश केला. उच्च जातीत वा कुळात जन्माला आला म्हणून अहंकार बाळगू नका, विद्वत्ता असली तरी घमेंडखोर होऊ नका, संपत्ती आहे म्हणून माजू नका, कारण या सर्व गोष्टी नाशाला कारणीभूत असून समता व सहिष्णुता अंगी धारण करावी हेच अध्यात्मशास्त्र नाही का?

*का रूपे वयसा माजा । अथिले पणे का गाजा ।*
*एक भाव नाही माझा । तरी पाल्हाळ ते ॥*

अध्याय ९, ओवी ४३२

(उत्तम सुखरूपाने व तारूण्याने मस्त का व्हावे? संपन्नपणाचा डौल कशाला हवा? माझ्याविषयी प्रेम नसेल तर हा सारा पसारा निष्फळ आहे.)

ज्ञानेश्वरांच्या अध्यात्मशास्त्रांत भक्तियोगाला प्राधान्य दिले असून त्यांनी भक्तीची सामाजिक नीतीशी सांगड घातली. परमार्थ साधनेच्या प्रवृत्तीला लोकसंग्रहाची जोड देऊन भागवतधर्मात नवचैतन्य निर्माण केले. आपली दृष्टी चिद्विलासाची आहे अशी भूमिका मांडून जगातील नानात्व या चिद्वस्तूची क्रीडा आहे हे जनसामान्यांना समजावून दिले. इतकेंच नव्हे, तर दया, क्षमा आणि शांती या अलंकारांनी विभूषित झालेला व नम्रता आणि सहिष्णुतेचे वस्त्र चढवलेला भक्त ईश्वराला आवडतो ही भावना लोकांच्या मनात रुजवली.

*ऐसे अनन्ययोगे । विकले जीवे मने आंगे ।*
*तयाचे कायी एक सांगे । जे सर्व मी करी ॥*

अध्याय १२, ओवी ८२

(त्याप्रमाणे एकनिष्ठ भक्तीने जीव, शरीर व मन यासह जे मला विकलेले असतात त्यांचे मी काय करीत नाही. सर्व काही करतो.)

ज्ञानेश्वर अद्वैताचे पुरस्कर्ते जरी असले तरी ज्ञानेश्वरी ग्रंथामध्ये त्यांनी ज्ञान, कर्म व भक्तीची सुरेख गुंफण करून त्यायोगे अध्यात्मशास्त्राची ओळख करून दिली. उदाहरण द्यावयाचे झाल्यास एखाद्या सुगरण स्त्रीला स्वयंपाकाचे पूर्ण ज्ञान असल्यामुळे ती स्वयंपाक करते म्हणजे कर्म करते व तो स्वयंपाक मन लावून करते, म्हणजे भक्तीने करते. अर्थात ज्ञान, कर्म व भक्तीने केलेला स्वयंपाक निश्चितपणे रुचकरच असतो यात संदेह नाही आणि त्या स्वयंपाकाचे भोजन केल्यामुळे तिचा पती जेव्हा तिचे कौतुक करतो तेव्हा तिला जो आनंद होतो त्याचे वर्णन करता येत नाही. वास्तव ज्ञान, कर्म व भक्ती या गोष्टींचा संसारात उपयोग केला गेला तर माणसाचे जीवनात आनंद निर्माण होतो. तो खऱ्या अर्थाने अध्यात्म जगतो आणि अहंकारादि विकारांना बाजूला सारतो.

*तैसे मनपण मुदल जाये । मग अहंभावादिक कें आहे ।*
*म्हणोनि शरीरेचि ब्रह्म होये । अनुभवी ते ॥*

अध्याय ५, ओवी १५७

(त्या प्रमाणे मनाचे मनपण मुळीच नाहीसे झाल्यावर मी देह वगैरे अहंकारादि विकार कुठे राहिले? तो ब्रह्मानुभवी पुरूष देहधारी असतानाच ब्रह्म होतो.)

माणसाचे पृथक्करण केले तर अध्यात्मशास्त्रातले विवेचन तीन घटकांतच सामावले आहे. ते घटक म्हणजे मन, बुद्धी आणि शरीर होय. मनाला भक्तियोग, बुद्धीला ज्ञानयोग व शरीराला कर्मयोग म्हटले आहे. जे भावनाप्रधान असतील त्यांनी भक्तियोग स्वीकारावा. ज्यांची बुद्धी कुशाग्र असेल त्यांनी ज्ञानयोग साधावा व जे उद्योगशील असतील त्यांनी कर्मयोगाचे आचरण करावे. कुठलाही योग आचरणात आणला तरी इतर दोन योगांचे कमी अधिक प्रमाणात समीकरण असावे.

ज्ञानेश्वरांच्या अध्यात्मशास्त्रातील जीवनाविषयक तत्त्वज्ञानाचा आणखी एक घटक म्हणजे आत्मसाक्षात्कार होय. वैराग्य व अभ्यास ही आत्मसाक्षात्काराची दोन साधने होत. वाईट

गोष्टींचा तसेच कामक्रोधादि विकारांचा त्याग करणे हे वैराग्याचे लक्षण असून संतसहवासात रमणे, ईश्वराचे नामस्मरण करणे आणि निष्काम बुद्धीने आचरण करून सेवामार्ग अवलंबणे म्हणजे अभ्यासयोग स्वीकारणे. हा योग प्रयत्नाने सहज साध्य होतो. यासाठी श्रद्धेची व दैवाची आवश्यकता आहे.

*अगा अभ्यास योगु म्हणिजे । तो हा एकू जाणिजे ।*
*येणे काही न निपजे । ऐसे नाही ॥*

अध्याय १२, ओवी ११०

(अरे अभ्यासयोग जो म्हणतात तो हा एकच आहे असे समज. याच्या योगाने कोणतीही गोष्ट प्राप्त होणार नाही असे नाही. सर्वच गोष्टी प्राप्त होतात.)

अर्थात यासाठी गुरूकृपा व्हावी लागते. कारण गुरूशिवाय ज्ञान नाही. गुरूच्या सानिध्यात राहिल्यामुळे व त्यांनी केलेल्या उपदेशामुळे पारमार्थिक ज्ञानाचा आविष्कार घडतो आणि आध्यात्मिक भाग्य उदयाला येते.

*म्हणोनि भाग्य जे सानकुळ । जालिया केले उद्यम सदा सफळ ।*
*तैसे श्रुताधित सकळ । गुरुकृपा साच ॥*

अध्याय १०, ओवी १६८

(म्हणून ज्या वेळी दैव अतिशय अनुकूल असते त्या वेळी हातात घेतलेले सर्व उद्योग फलद्रूप होतात. त्या प्रमाणे गुरूची कृपा झाली असता ऐकलेले व पढलेले सर्व ज्ञान आपले काम करते.)

अशा तऱ्हेने साधक आत्मप्राप्तीसाठी ईश्वराचे जवळ येऊ लागतो. त्या वेळी दैवी संपत्तीचे गुण त्याला चिकटतात. त्याच्या वृत्तीतील द्वैत नाहीसे होऊन अद्वैत निर्माण होते. ज्या प्रमाणे वसंत ऋतूने प्रवेश केला असता झाडांना टवटवी प्राप्त होते, त्याचप्रमाणे अज्ञानाच्या अंधकाराचा नाश होऊन आत्मानुभवरूपी सूर्यप्रकाशात तो न्हाऊन निघतो. यालाच आत्मसाक्षात्कार म्हणतात. आत्म म्हणजे आत्मा. साक्षात्कारातील साक्षात म्हणजे प्रत्यक्ष व कार म्हणजे दर्शन. याचा अर्थ असा की आत्म्याला परमेश्वराच्या तेजाचे प्रत्यक्ष दर्शन घडते. या दर्शनामुळे साधक संसारातून मुक्त होतो.

या तेजाचे दर्शन घडावे म्हणून योगी कठीण अशी योगसाधना आचरणात आणतात. तर संत भक्तीच्या माध्यमातून ईश्वरसेवेत मग्न होतात. एकदा का या तेजाचे दर्शन झाले की ते योगी वा संत संजीवन समाधी घेतात. ज्ञानेश्वरांना या तेजाचे दर्शन अवघ्या एकविसावे वर्षी झाल्यामुळे त्यांनी संजीवन समाधी घेतली. ज्ञानेश्वरांप्रमाणे कुणाही साधकाला अल्पकाळात वा वृद्धापकाळात किंवा पुढील जन्मातही दर्शन होण्याची शक्यता नाकारता येणार नाही. अर्थात यासाठी दैवाची अनुकूलता, गुरूचा अनुग्रहीता आणि अभ्यासयोगाची सिद्धता असणे आवश्यक आहे.

*तेवी सदभ्यासे निरंतर । चित्तासी परमपुरुषाची मोहर ।*
*लावी मग शरीर । असो अथवा जावो ॥*

अध्याय ८, ओवी ८२

(त्या प्रमाणे सदभ्यासाने तू निरंतर आपल्या चित्ताला परम पुरुषाचे ध्यान लाव, मग शरीर राहो अथवा जावो.)

अध्यात्मशास्त्रामध्ये ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात ज्ञानेश्वरांनी कुंडलिनीशक्तीसंबंधी विस्तृत असे विवेचन केले आहे. ही कुंडलिनी शक्ती गीतेमध्ये दिसून येत नाही. कुंडलिनी शक्ती जागवून जो मार्ग आक्रमिला जातो त्या मार्गाला पंथराज म्हटले जाते. हटयोग, मंत्रयोग, लययोगामुळे कुंडलिनी शक्ती जागृत होते. यासाठी ध्यानाची व प्राणायामाची आवश्यकता आहे. तसे पाहता हा कुंडलिनीशक्तियोग अत्यंत अवघड असून ते करीत असता योग्याला अनेक संकटांना सामोरे जावे लागते. म्हणून ज्ञानेश्वर महाराज सल्ला देतात की मनाची एकाग्रता, शरीराची सहनशीलता आणि संकटांची झुंज घेण्याची क्षमता असेल तरच या योगाच्या वाटेला जावे.

*म्हणोनि योगाचिया वाटा । जे निघाले गा सुभटा ।*
*तया दुःखाचाचि वाटा । भागा आला ॥*

अध्याय १२, ओवी ६९

कुंडलिनी ही मंत्रशक्ती वा तंत्रशक्ती नसून ती चित्‌शक्ती आहे. ती ज्ञानस्वरूप असून श्रुतीमध्ये हिला प्राण अशी संज्ञा आहे. ज्ञान, भक्ती व कर्मयोगापेक्षाही या कुंडलिनीशक्ति योगाचे विशेषत्व शक्तियोगाचे म्हणजे हा योग मन, प्राण व शरीर यांना संघटित करतो. त्यामुळे अल्पकाळातच साधक पूर्णावस्थेला पोहचून ईश्वराप्रत जातो.

ज्ञानेश्वर हे आत्मानुभवी संत असून थोर दर्जाचे तत्त्वज्ञानी आहेत. आत्मा ही त्यांच्या तत्त्वज्ञानाची मध्यवर्ती कल्पना असून त्यावरच अध्यात्मशास्त्र उभारले आहे आणि हे शास्त्र रूक्ष असल्यामुळे ते सोप्या शब्दातून म्हणजे काव्यरचनेतून सांगितले गेले. अर्थात हे काव्य परतत्त्वस्पर्शी असून चालत नाही तर ते रेखीव व प्रमाणबद्ध असावे लागते. त्यासाठी ज्ञानेश्वरांनी नादमाधुर्याकडे विशेष लक्ष दिले. उपमा, दृष्टान्त व रूपकासारखे अलंकार योजून काव्य रसाळ केले. नवरसांची पेरणी केल्यामुळे ते भावात्मक झाले.

*एथ चातुर्य शहाणे झाले । प्रमेय रुचीस आले ।*
*आणि सौभाग्य पोरवले । सुखाचें येथ ॥*

अध्याय १, ओवी ३५

(येथे चतुरता शहाणी झाली. तत्वांना गोडी आली व सुखाचे ऐश्वर्य येथे पुष्ट झाले.)

ज्ञानेश्वरीत कर्म आहे, पण कर्माचे अवडंबर नाही, ज्ञान आहे पण ज्ञानाचा रुक्षपणा नाही, भक्ती आहे पण ती अंधश्रद्धाळू नाही. तसेच कुठेही पांडित्यदर्शन नाही अथवा खंडण मंडणाची

तर्कट पद्धती अवलंबलेली नाही. उलटपक्षी सहज सोपी अशी ही मराठी भाषा अमृतालाही मागे सारील असा ज्ञानेश्वरांचा विश्वास आहे.

*माझा मऱ्हाठाचि बोलु कवतिके । परी अमृतातेही पैजा जिंके ।*
*ऐसी अक्षरे रसिके । मेळवीन ॥*

अध्याय ६, ओवी १४

(माझे हे प्रतिपादन मराठी भाषेत आहे परंतु लीलेने अमृतालाही प्रतिज्ञापूर्वक जिंकील अशा तऱ्हेची रसयुक्त शब्दांची रचना मी करीन.)

विश्वाचे कल्याण व्हावे यासाठी ब्रह्मविद्येची म्हणजेच अध्यात्मशास्त्राची ओळख करून देणारे महायोगी व महासंत ज्ञानेश्वर माऊली आपले गुरु निवृत्तिनाथांकडे एकच मागणे मागतात.

*दुरितांचे तिमिर जावो । विश्व स्वधर्म सूर्ये पाहो ।*
*जो जे वांछिल तो ते लाहो । प्राणिजात ॥*

अध्याय १८, ओवी १७९५

(पापवृत्तीचा अंधकार नष्ट होवो व या विश्वात स्वधर्मरूपी सूर्याचा उदय होऊन प्राणिमात्रात जो जे इच्छील ते त्याला प्राप्त होवो.)

कृष्णकांत नाईक
१३८१, शुक्रवार पेठ,
बदामी हौद,
पुणे - ४११ ००२.

---

# मानव

*विश्वाच्या गर्भात तुझे रूप अणुइतके*
*मान्य असे जगतास युगायुगापासूनी ते,*
*विश्व ब्रह्मांडगोल न असे अंत त्यास*
*परिघाच्या कक्षेत फिरते ते अहोरात,*
*भासतोस कीटक तूं जगताच्या अंतराळी*
*मुंगीसम असूनी तरी पाहतोस दिक्काली,*
*पृथ्वीच्या गर्भाचा लावतोस शोध तूं*
*चंद्रावर जाऊनी आलासी परत तूं,*
*विश्वाच्या कक्षांच्या पलिकडे तुज दिसे*
*धरणीवर बसुनी तूं ग्रहगोलक पाहतसे,*
*शक्ती तुझी जाण तूं ब्रह्मांडी गोलात*
*अणूइतुकी असली जरि लपली ती कोषात ॥*

**के. एन्. रिसबूड**

# संकल्प

१) *ठेवोनि विश्वास हा अंतरी*
*असे सत्य संकल्प दानिहरी*
*उभे राहोनि शुद्ध मार्गावरी*
*करू अल्पसे कार्य हे ईश्वरी*

२) *जेथे मनाची हवी तळमळ*
*येथे हवा यत्नही निश्चळ*
*नको वाऊगे बोलणे बाष्कळ*
*होईल मार्गावरी दलदल*

३) *जरी उत्तम आशा धरावी मनी*
*असावी सुचिष्मंतही साधनें*
*बालांकुरांची घडाया वनें*
*आम्ही थेंब थेंबे करू सिंचने*

४) *करू योग व्यायाम योगासना*
*जी सर्वदा मान्य योगीजना*
*ठेवूं मुठी बांधुनिया मना*
*करू नित्य स्वाध्याय ज्ञानार्जना*

५) *कुणी लाविला वृक्ष हे नाकळे*
*आम्ही चाखितो अमृताची फळें*
*मिळाया पुढे मौत्तिकांची खनीं*
*करू शुद्ध बीजांकुरे पेरणी*

६) *जरी सानुला वर्ग भासेतरी*
*असे ही पूजा शाश्वताची खरी*
*आम्हा धावणें ध्येय मार्गावरी*
*ओलांडूनी संकटांच्या सरी*
*ठेवोनि विश्वास हा अंतरी*
*असे सत्य संकल्प दानिहरी*

**म. भ. सोमण**

# विश्वरूपाहूनि कृष्णाकृती । देखिला लाभ

डॉ. कृ. मा. घटाटे

अर्जुनाचे म्हणणे बरोबर असले तरी ती अनधिकार चेष्टा होती म्हणून श्रीकृष्णाच्या सगुणापेक्षा विश्वरूपाचे यथार्थ आकलन आल्याशिवाय चतुर्भुज रूपाची महती कळत नाही, व्यापकता कळत नाही किंवा त्यावर असीम आत्मप्रेमही होऊ शकत नाही. म्हणून भगवंताने प्रथम विश्वरूपाच्या माहात्म्यज्ञानावर भर दिला.

शांतरसाच्या घरी अद्‌भुत रस पाहुणचाराला आला आहे. तो विलक्षण आनंदोत्सव पाहण्यासाठी सर्व रसांनी आपली हजेरी लावली आहे. असा अर्जुनाने अनुभवलेला विश्वरूपाचा सोहळा वर्णन करताना ज्ञानेश्वर महाराजांची वाणी "अमृतातेही पैजा जिंके" अशी बहरली आहे. अर्जुनाने विश्वरूपदर्शनाचा सोहळा भोगला पण शेवटी चतुर्भुज रूपाबद्दल विशेष आस्था दाखविली तेव्हा भगवंतानें त्याचा निषेध केला. पण पुनः शेवटी १२ व्या अध्यायात अव्यक्तापेक्षा किंवा विश्वरूपापेक्षा चतुर्भुजरूपाची भक्ती करणारा भक्तच मला आवडतो असे सांगितले. या विसंगतीची उकल माऊलीने तर ज्ञानेश्वरीत केलेली आहेच परंतु गीतोक्त विश्वरूपाचा विचार करताना १. यशोदेला दाखविलेले विश्वरूप २. ब्रह्मदेवाला दाखविलेले विश्वरूप आणि ३. दुर्योधनाला दाखविलेले विश्वरूप या तिघांचाही थोडक्यात परामर्श घेतल्यानंतर ती उकल अधिक लक्षात येईल.

१. श्रीकृष्णाने बालपणी यशोदेला विश्वरूप दाखवून कृष्णरूपाबद्दल असलेली मनुष्यबुद्धी नाहीशी केली, ज्ञान दिले व वात्सल्यरूपी पराभक्तीही तिला मिळवून दिली.

२. ब्रह्मदेवाला विश्वरूप दाखवून त्याचे गर्वहरण केले आणि कृष्णरूप एकदेशीय दिसले तरी तेच व्यापकही असते हे दाखविले व भक्ती प्रदान केली.

३. दुर्योधनाला मात्र केवळ भय उत्पन्न करणारे विश्वरूप दाखविले.

४. अर्जुनाला ज्ञान, आनंद आणि दुःख या तिन्हींचा अनुभव देणारे विश्वरूप दाखविले. त्या सर्वांचा थोडक्यात विचार करून अकराव्या आणि बाराव्या अध्यायात मिळून कोणता सिद्धांत



भगवंतानी मांडला आहे ते शेवटी पाहू.

**दुर्योधनाने पाहिलेले विश्वरूप**

युद्धात प्रचंड नरसंहार होऊ नये म्हणून भगवान पांडवांचे दूत होऊन एकटेच धृतराष्ट्राकडे गेले. कौरवांच्या सभेत त्यांनी पांडवांसाठी केवळ पाच गावांची मागणी केली. पण तीही दुर्योधनाने धुडकावून लावली. सुईच्या अग्राइतकी जमीनही मिळणार नाही असा जवाब दिला. भगवंताच्या नीतिप्रचुर आणि धर्मसंमत अशा भाषणाचा त्याचेवर काहीही परिणाम झाला नाही. उलट श्रीकृष्ण एकटा आहे असे पाहून त्याला बद्ध करण्याचा त्याने घाट घातला. तेव्हा क्षणमात्रात भगवान विश्वरूप झाले. इंद्र चंद्रादी लोकपाल भगवंताच्या शरीरात दिसू लागले. अर्जुनादी पांडव, अंधक, वृष्णी वगैरे सर्व भगवंताचे सखे भगवंताच्या शरीरातून बाहेर पडले व भगवंताभोवती उभे राहिले. त्या प्रसंगीचे विश्वरूपाचे भयावह आणि तेजस्वी स्वरूप पाहून दुर्योधन, शकुनी, कर्ण वगैरे सर्वजण मूर्च्छित-इव आले. त्यांना ते पाहवले नाही परंतु हा सर्व सोहळा भीष्म, द्रोण, कृप, संजय आणि धृतराष्ट्र यांना मात्र भगवत्कृपेमुळे पाहावयास मिळाला. दुर्योधन भयग्रस्त झाल्यानंतर मात्र भगवंतानी हा पसारा चतुर्भुज देहात आवरला आणि ते सभेतून निघून गेले.

या ठिकाणी 'श्रीकृष्ण एकटा आहे आणि मी त्याला बद्ध करू शकतो' या दुर्योधनाच्या वृथाभिमानाचा तोरा उतरविण्यासाठी भयानक स्वरूपाचे विश्वरूप दाखविले व त्याचा परिणामही दुर्योधन भीतिग्रस्त होण्यात झाला. (महाभारत उद्योगपर्व अध्याय १३१)

**यशोदेला दाखविलेले विश्वरूप**

लहानपणी गोकुळात खेळत असताना भगवंताने माती खाल्ली. यशोदेला वाटले की याची प्रकृती बिघडेल म्हणून तिने 'माती खाल्लीस काय?' असे दरडावून विचारले तेव्हा भगवंतांनी तोंड उघडले. ते पाहता पाहता तिला त्याच्या मुखात आकाश, पृथ्वी, स्वर्गादी त्रैलोक्य दिसू लागले. आपल्या पुत्राच्या मुखात हे सारे पाहून तिला आश्चर्य वाटले. हे स्वप्न आहे की भ्रम आहे, की देवमाया आहे, की माझ्या मुलात ही जन्मजात योगशक्ती आहे, हेच तिला कळेनासे झाले. पण नंतर भगवत्कृपेमुळे तिला संसाराची मायाममता जाणवली. ती वैराग्यसंपन्न झाली आणि ती 'विदिततत्त्वा' झाली. त्यानंतर भगवंतानी आपली योगमाया आवरली. तेव्हा तिला पुनः भगवंताच्या बालस्वरूपाचे उत्कट प्रेम उफाळून आले व तिने बाळकृष्णाला जवळ घेतले. (भागवत दशमस्कंध पूर्वार्ध अ.८)

सुरूवातीला यशोदा कृष्णाला पुत्र समजत होती म्हणून भगवंताला माती खाण्याने त्रास होईल, असे तिला वाटले. तिच्या ठिकाणी भगवंताविषयी भगवद्‌बुद्धी नसून केवळ पुत्रभावना होती. पण माहात्म्यज्ञान असल्याशिवाय पराभक्ती होऊ शकत नाही म्हणून माती खाण्याच्या निमित्ताने भगवंताने तिला विश्वरूप दाखविले आणि ते पाहताक्षणी ती 'विदिततत्त्वा' झाली.

> इत्थं विदिततत्त्वायां गोपिकायां स ईश्वरः ।
> वैष्णवीं व्यतनोन्मायां पुत्रस्नेहमयी विभुः ॥

४३ भा. स्कंध १०

या श्लोकांत विदिततत्त्वा झाल्यानंतर यशोदा पुनः पुत्रस्नेहमयी झाली असें म्हटलें आहे. यांतील पुत्रस्नेहमयीचा अर्थ अज्ञानजन्य पुत्रप्रेम असा नसून पराभक्तीतील वात्सल्यभक्ती असा अर्थ श्रीगुलाबराव महाराजांनी केला आहे. 'वैष्णवीं माया' चा अर्थ अविद्या नसून विद्याशक्ती आहे. कारण ज्ञानानंतर पुनः अज्ञान येत नसते.

"इयं ज्ञानकला राजन् सकृज्ज्ञातामिवर्धते" (योगवासिष्ठ)

एकदा ज्ञान झाल्यानंतर ज्ञानकला वाढत जाते, कमी होत नाही. किंवा

"न तत्र माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः" (नारदीय भक्तिसूत्र)

पराभक्तीत आत्मज्ञानसंपन्नता कायमच असते. या संबंधीचे श्रीगुलाबरावमहाराजांचे विवेचन सुरेख आहे. ते प्रीतिनिर्तनात म्हणतात-

> यशोदेच्या भजनाची रीति । मी म्हणे न बोलवेल श्रुती
> विश्वरूप दाखविताही विश्वपती । जिने वात्सल्यभक्ती न सोडिली ॥
> गर्ग नारदादि मुनिजन । क्षणाक्षणां सांगती येऊन ।
> की हा परमात्मा विश्वभूषण । वेदपुराणवंद्य जो ॥
> तेही ऐकोनी साठवी हृदयी । पुढे तान्हा म्हणोनि दे भातदही।
> मज वाटे श्रीकृष्णाहूनी लवलाही । यशोदा वरिष्ठ ॥
> पाहावया आपुली जाती । गोकुळांतुनी गेला श्रीपती ।
> परी यशोदावात्सल्यभक्ती । किंचित् चित्ती न मळली ॥

(५७ ते ६०)

याप्रमाणे विश्वरूप पाहिल्यानंतर यशोदा माहात्म्यज्ञानसंपन्न झाली. परंतु कृष्णावरचे वात्सल्यप्रेम तिने कमी होऊ दिले नाही. उलट आपला पुत्र हा साक्षात् भगवान आहे असे समजल्याने तिचे पूर्वीचे वात्सल्यप्रेम हेच असीम आत्मप्रेमात परिणत पावले. हीच "वात्सल्ययुक्त ज्ञानोत्तर पराभक्ती" होय.

प्रथम अज्ञानयुक्त पुत्रस्नेहामुळे श्रीकृष्णाचे ठिकाणी मनुष्यबुद्धी म्हणजे यशोदेच्या ठिकाणी अज्ञान.

नंतर आत्मज्ञानयुक्त विश्वरूप दर्शन.

शेवटी पुनः साकार भगवंताविषयी वात्सल्यभक्ती म्हणजे पराभक्ती. याप्रमाणे यशोदामातेला विश्वरूपदर्शनामुळे आत्मज्ञान, एकदेशीय भगवन्मूर्तीचा व्यापक साक्षात्कार आणि पराभक्ती या तीन गोष्टी मिळाल्या.

**ब्रह्मदेवाला दाखविलेले विश्वरूप**

पाच वर्षांच्या बाळकृष्णाने अघासुर-वध केला. तो प्रसंग ब्रह्मदेवाने पाहिला. परंतु मनुष्यरूपातील बालक असलेला श्रीकृष्ण खरोखरच भगवत्सामर्थ्याने युक्त आहे की नाही याबद्दल त्याला पुनः शंका आली. तेव्हा श्रीकृष्णाची परीक्षा पाहण्यासाठी ब्रह्मदेवाने वासरांना आणि गोपाळांना गोकुळातून चोरून ब्रह्मलोकांत नेले. त्यामुळे श्रीकृष्णाने बालकांची आणि वासरांची हुबेहूब रूपे धारण केली. पण कोणालाही हा प्रकार कळू दिला नाही. भगवानच सर्व रूपांनी नटल्यामुळे गोपिकांचे पुत्रांवरचे प्रेम आणि गायींचे वासरांवरील प्रेम अतिशय उत्कट झाले. त्या वर्षात नवीन जन्मलेल्या पुत्रांपेक्षा किंवा वासरांपेक्षा त्यांना भगवद्रूप असलेल्या जरठ पुत्रांचे आणि वासरांचे प्रेमच जास्त वाटे. ते दृश्य पाहून बलरामही आश्चर्यचकित झाला. परंतु ज्ञानदृष्टीने पाहताच तो सारा प्रकार बलरामाच्या लक्षात आला.

पुढे एका वर्षाने श्रीकृष्णाची काय स्थिती आहे हे पाहण्यासाठी ब्रह्मदेव आले पण त्यांनाही समजेना की मी गोपाळांना आणि वासरांना ब्रह्मलोकात ठेवले असता ती येथे कशी आलीत? नंतर त्यांच्या बुद्धीत प्रकाश पडला. भगवंताचे ऐश्वर्य जाणवले. गोकुळातील वासरे आणि गोपाळ सर्वच भगवान् श्रीकृष्ण चतुर्भुजरूपांनी नटले आहेत असे दिसले व त्या प्रत्येक चतुर्भुजरूपाची स्वतः ब्रह्मदेवासह संशयनिरास झाला. त्यांनी श्रीकृष्णाला साष्टांग नमस्कार केला, क्षमा मागितली व स्तुती केली. ती ब्रह्मस्तुती म्हणून भागवतात प्रसिद्ध आहे. (दशम स्कंध अ. १३१४) त्यात ब्रह्मदेव म्हणतात-

"भगवंता तुझे सगुण चतुर्भुजरूप माझ्या अनुग्रहासाठी असून ते स्वेच्छामय आहे. ते पंचभूतांचे म्हणजे जड नाही. कोणी योगाने समाधी लावून देखील या सगुण सच्चिदानंद विग्रहाचा महिमा जाणू शकत नाही किंवा प्राप्ती करून घेऊ शकत नाही (२,१४,१०) भक्ती सोडून जे केवळ ज्ञानाचा प्रयत्न करतात त्यांना क्लेशच होतात. (४,१४,१०) कारण तेथे निर्गुण अव्यक्ताचा अनुभव येतो. तुझ्या सगुण प्रेमविग्रहाचा अनुभव नसतो. म्हणून पूर्वीच्या मोठमोठ्या योग्यांनीही तुझ्या कथा प्रेमाने गायल्या व तुला प्राप्त करून घेतले."

या गोपाळांच्या इंद्रियांच्या ठिकाणी आम्ही एकेक देव राहतो व त्या त्या एका एका इंद्रियाने आम्ही तुझ्या माधुर्याचे सेवन करतो आणि धन्य होतो. परंतु पाचही इंद्रियांनी तुझे सेवन करणारे गोपाळ आम्हापेक्षा कितीतरी श्रेष्ठ आहेत. (३३,१४,१०) या परमपावन गोकुळात तिर्यक् योनीत दगडाचा जन्म मिळाला तरी आमचे भाग्य उजळून निघेल. कारण तुला प्रिय असलेल्या गायीगोपाळांच्या पायधुळीचा आम्हावर अभिषेक होईल व आम्ही धन्य होऊ.

जानन्त एव जानन्तु किं बहूक्त्या न मे प्रभो ।
मनसो वपुषो वाचो न वैभवं तव गोचरः ॥ ३८,१४१०. भागवत.

जाणणारे तुझा महिमा समजला असे खुशाल म्हणोत, पण मी तर तुझ्या सगुण षड्गुणैश्वर्याचा महिमा कधीही पूर्णपणे जाणू शकत नाही.

या प्रमाणे विश्वरूप दर्शन झाल्यानंतर ब्रह्मदेवाने श्रीकृष्णाची सगुणभक्तीच मागितली व गोपाळांच्या पायधुळीने पुनीत होण्याची इच्छा प्रदर्शित केली.

ब्रह्मदेवाला आत्मज्ञानसंपन्नता असूनही मनुष्यवेषधारी श्रीकृष्णाचे ठिकाणी भगवदैश्वर्य आहे की नाही ही शंका आली. आपल्या पुत्राचे हे अज्ञान घालविण्यासाठी भगवंतांने ब्रह्मदेवाला विश्वरूप दाखविले.

या विश्वरूपदर्शनात प्रत्येक गायीगोपाळाच्या ठिकाणी चतुर्भुज रूप दिसले व त्यात सारे विश्व भगवंताची पूजा करीत असल्याचे दिसू लागले.

या दर्शनात भयानकता नव्हती म्हणून ब्रह्मदेवाला दुर्योधनाप्रमाणे किंवा अर्जुनाप्रमाणे भय वाटले नाही. केवळ विस्मयाचा व आनंदाचा प्रत्यय आला.

भगवान एकदेशीय दिसले तरी ते व्यापकच आहेत असा अनुभव ब्रह्मदेवाला आला. हा भक्त्यनुभव ब्रह्मदेवाच्या विश्वरूपाचे फलित आहे. ज्ञानोत्तर भक्ती करावी असा स्पष्ट संकेत ब्रह्मस्तुतीत आहे. गीतेत अर्जुनाने विचारलेल्या प्रश्नाच्या संदर्भात हा मुद्दा लक्षणीय आहे.

याप्रमाणे याही विश्वरूपदर्शनाचे प्रयोजन माहात्म्यज्ञान आणि ज्ञानोत्तर पराभक्ती हेच आहे.

**अर्जुनाला दाखविलेले विश्वरूप**

भारतीय युद्धात मी मारणारा आहे आणि कौरवादि बाधव मरणारे आहेत, असा भ्रम अर्जुनाला झाला. तेव्हा भगवंताने आपले षड्गुणैश्वर्यसंपन्न विश्वरूप दाखवून त्याचा भ्रम नाहीसा केला. त्या प्रसंगाचे वर्णन ज्ञानेश्वरमाऊलींनी विस्तारपूर्वक आणि रोचक केले आहे.

अर्जुनाने विश्वरूप पाहण्याची इच्छा केली तेव्हा भगवंताने त्याला दिव्यचक्षू दिले. त्या क्षणीच अर्जुनाला प्रथम स्वरूपसमाधान म्हणजे अद्वैताज्ञानसंपन्नता लाभली. म्हणजे समाधीचा अनुभव आला आणि त्याच्या अज्ञानाचा साद्यन्त निरास झाला. अर्जुनाला भगवंताचे ऐश्वर्य दिसू लागले. चित्त विस्मयसागरात बुडून गेले. चराचर भूते लुप्त झाली. गगनदेखील नाहीसे झाले. दिशांचे ठाव हरपले. जसे जागे झाल्यावर निद्रेतील स्वप्न नाहीसे होते तसे लोकसृष्टीतील सारे आकार लयाला गेले. "गिळिली विश्वरूपे प्रपंचरचना" मनदेखील

स्फुरेनासे झाले. बाहेर असलेली इंद्रियांची धाव हृदयात कोंडून गेली. विचार मावळले आणि अर्जुनाच्या समोर असलेले चतुर्भुज कृष्णरूपच नानाप्रकारचे होऊन चहूकडे दिसू लागले. त्या स्वरूपाशिवाय एकही जागा शिल्लक राहिली नाही.

प्रथम स्वरूपसमाधान । पावोनि ठेला अर्जुन ।

सवेचि उघडी लोचन । तंव विश्वरूप देखे । १६५ - ११

अशी स्थिती झाली. साध्या डोळ्यांनी पाहता न येणारे अव्यक्त विश्वरूप पाहण्यासाठी दिव्यदृष्टी भगवंतांनी अर्जुनाला दिली आणि त्याची इच्छा पूर्ण केली. देव स्वतःच आंग-अलंकार, हात-हत्यार, जीव- शरीर झाले. सारे चराचर देवाने घनदाट भरून गेले. सर्वत्र चतुर्भुज मूर्तिमयच दिसू लागले आणि 'आता नको' म्हणून डोळे मिटले तरी आतही तोच अनुभव आला. हा भगवंताचा अनुग्रह कसा विलक्षण आहे पहा, की पार्थाचे "पाहणे आणि न पाहणे" यासहित अर्जुनाला भगवंताने व्यापून टाकले. अनंतरूपानी कवटाळले. विश्वापासून आपण वेगळे आहोत असे जे दुजेपण होते तेही आटून गेले आणि अन्तःकरणही विरले. हृदयात आनंदाचे भरते आले पण बाहेर मात्र अर्जुनाची गात्रे बलहीन झाली. सर्वांगावर आनंदाचे रोमांच आले. आतील सुखाच्या उर्मीमुळे अंगाला कंप सुटला. डोळ्यातून आनंदाश्रू वाहू लागले. अशी अष्टसात्विक-भावांची परस्परात चढाओढ सुरू झाली. अर्जुनाला ब्रह्मानंदाचे साम्राज्य मिळाले परंतु भगवंताने त्याला आनंदात विरू दिले नाही. द्वैत मोडू दिले नाही. अद्वैत भक्तीतील 'द्वैत इव स्थिति' सांभाळून ठेवली.

याप्रमाणे सुरुवातीला 'आनंदाचे डोही आनंद तरंग' उठले परंतु पुढे जेव्हा भगवंताने आपली अक्राळविक्राळ भयानक रूपे दाखविली आणि त्यात कौरव, भीष्मद्रोणादी महारथी आणि पांडवाकडील वीर योद्धे दातांच्या खाली रगडण्यास सुरूवात केली तेव्हा मात्र अर्जुनाला भयाचे कापरे सुटले. तो सारखे भगवंताला नमन करू लागला आणि विनवू लागला.

**अर्जुन उवाच**

"तू खरोखर व्यापकच आहेस पण भक्तांवर अनुग्रह करण्यासाठी सावळे मुग्धरूप धारण करतोस आणि पुनः स्वतःचे चतुर्भुज रूप हे एकदेशीय नसून व्यापकच आहे हे समजावून सांगण्यासाठी विश्वरूपाचे ऐश्वर्य भक्तांपुढे प्रगट करतोस. (२५६ ते २६२) परंतु तुझ्या या संहारक रूपामुळे भय वाटते. पाहा तिन्ही भुवने दुःखकल्लोळात झाळंबत आहेत. तुझा महिमा पाहत असता सुख व्हावयास हवे पण उलट दुःखाची परमावधी झाली, असे काय म्हणून? तुझ्या या व्यापक रूपाला मिठी मारून आनंद घेता येत नाही. त्यामुळे तुझ्या विरहाच्या दुःखात मी कसा जिवंत राहणार? बरे, तुजपासून मागे सरावे तर संसाराचे दुःख सहन होत नाही आणि सामोरे पाहावे तर तुझ्या अनावर व्यापक स्वरूपाला मिठी मारता येत नाही. माझा देह गेला तर त्याची खंत नाही पण माझे चैतन्यच राहते की नाही याचेच मला भय वाटते.

बाप साक्षात्काराचा वेध । कैसा देशधडी केला बोध।

हा गुरू शिष्य संबंध । विपाये नांदे ॥३६० ॥

विश्वरूप साक्षात्काराच्या मागे लागून माझा आत्मबोधही देशोधडीला लागला आहे. तुझा माझा गुरूशिष्य संबंधही टिकून राहण्याची मारामार, अशी स्थिती या विश्वरूपाच्या महामारीमुळे झाली आहे.

वाऱ्याबरोबर धावणे, आकाशाला आलिंगन देणे वगैरे कसे शक्य आहे? जसे आपण बाहेर जाऊन सृष्टिसौंदर्याचा आवडीने आनंद घेतो पण नंतर त्या सुखाच्या आठवणी काढीत विसावा घेण्यासाठी घरात परत येतो; त्याप्रमाणे विश्वरूपाचे आश्चर्य पाहून तुझा महिमा कळला पण आता विसावा घेण्यासाठी तुझे चुतर्भुज रूपच आम्हाला विश्रांतिस्थान आहे. आम्ही योगाचा अभ्यास करावा, शास्त्राचे सार काढावे, दानादि विविध पुण्ये करावीत, त्या सर्वांचे फळ तुझे चतुर्भुजरूप हेच आहे. (५६०) हे विश्वरूपाचे सोहोळे पाहून माझे डोळे निवाले. आता कृष्णाकृती पाहाण्यासाठी ते अधीर झाले आहेत. कृष्णाकृतीपुढे विश्वरूपही मला कमी प्रतीचे वाटते. (६०६, ६०७)

आम्हा भोगमोक्षाचिया ठायी । श्रीमूर्तिवाचूनि नाही

म्हणोनि तैसाचि साकार होई । हे उपसंहरी आता (६०७)

आम्हा भक्तांना भोग म्हणजे जीवन्मुक्तीतील दृष्ट परमानंद असो, की विदेहमुक्ती असो, दोन्ही ठिकाणी तुझ्या सगुण कृष्णाकृतीवाचून दुसरे काही नको असते. म्हणून तू विश्वरूप आवरते घे आणि साकार हो.

**श्रीकृष्ण उवाच**

अर्जुनाने विश्वरूप प्रथमच पाहिले. म्हणून तो भयभीत झाला 'विश्वरूप म्हणजे ज्ञानाचा व्यापक अन्वयानुभव', त्यापासून भीतीचे काहीच कारण नाही. परंतु अर्जुनाला, हृदयात व्यतिरेकानुभव भगवत्कृपेने मिळाला असला तरी, त्याचा अन्वय परिपूर्ण झाला नव्हता. म्हणून भगवंताचे संहारक विश्वरूप पाहून त्याला भय वाटले आणि यापेक्षा एकदेशीय सगुण कृष्णाकृती बरी असेही त्याला स्वाभाविकपणेच वाटले. म्हणून भगवंताने अन्वयरूपी व्यापक ज्ञान परिपक्व होण्यासाठी विश्वरूपावर चतुर्भुजापेक्षा जास्ती भर दिला आणि त्यासाठी धसाळ, हेकड वगैरे शेलकी विशेषणे देऊन अर्जुनाची निंदा केली. भय वाटणे हे अज्ञानाचेच लक्षण. अज्ञान पूर्ण गेल्याशिवाय ज्ञानातील आणि भक्तीतील व्यतिरेक अन्वयाचा पूर्ण अनुभव येणे शक्य नव्हते. म्हणून व्यापक अन्वयानुभवासाठी म्हणजे माहात्म्यज्ञानासाठी चतुर्भुज रूपाला 'छाया किंवा अवगणियेचे' वगैरे

विशेषणे लावून, विश्वरूपावर भर देऊन, तत्संबंधीचे अर्जुनाचे भय भगवंतांनी नाहीसे केले.

**भगवान म्हणतात -**

"विश्वरूपासारखी वस्तू मिळाली तरी तुला आनंद होत नाही. हे माझे परात्पर स्वरूप आहे. रामकृष्णादी सर्व अवतार यापासूनच उत्पन्न होतात. हे निखळ ज्ञानतेज आहे. विश्वात्मक आहे. अनंत आहे. सर्वांचे आदिकारण हेच आहे. या विश्वरूपाच्या लाभाने सुखी हो. भय वाढू देऊ नकोस. यापेक्षा चांगले काही असेल असे मनात सुद्धा आणू नकोस. याच्या दर्शनाने तुझे मन का गजबजले हेच कळत नाही. तू गावंढळासारखा अंग सोडून छायेला अलिंगन देण्याची इच्छा करतोस. अवगुणियाचे म्हणजे चतुर्भुजाचे प्रेम धरतोस. तरी अर्जुना, एकदेशियाची आस्था सोडून विश्वरूपावर प्रेम कर. हे रूप जरी घोर, थोर आणि विकृत दिसले तरी याचाच कृतनिश्चय कर. त्याचा विसर कधीही पडू देऊ नकोस. माहात्म्यज्ञानाने युक्त हो."

याप्रमाणे चतुर्भुजापेक्षा विश्वरूपाचे श्रेष्ठत्व भगवंतानी प्रतिपादन केले. परंतु अकराव्याच्या शेवटी आणि बाराव्या अध्यायाच्या सुरूवातील चतुर्भुज रूपाचीच भक्ती श्रेष्ठ असल्याचेही भगवान सांगतात. तेव्हा या दोन मतांचा समन्वय कसा होईल ते पाहिले पाहिजे.

**१. अनधिकार चेष्टा**

श्रीकृष्णरूपात विश्वरूपापेक्षा अधिक लाभ आहे. हे अर्जुनाचे म्हणणे बरोबर असले तरी ते विश्वरूपाचा अन्वय – ज्ञानानुभव पचवून अर्जुनाने सांगितलेले नाही. उलट भयामुळे सांगितले. म्हणून त्याने सांगितलेला भक्तीचा हा वेदान्त – सिद्धान्त खरा असला तरी ती अनाधिकार चेष्टा होती. त्यामुळे विश्वरूपाचा अन्वयानुभव परिपक्व होण्यासाठी भगवंताला चतुर्भुजरूपाचे कनिष्ठत्व प्रतिपादन करावे लागले.

**२. परीक्षा घेण्यासाठी**

किंवा असे म्हणता येईल की अर्जुनाला ज्ञानबोध झाल्यानंतरही अर्जुनाचे भक्तिप्रेम पूर्वीसारखेच टिकून आहे की नाही, हे पाहण्यासाठी म्हणजे मुद्दाम परीक्षा घेण्यासाठी - भगवंताने चतुर्भुजापेक्षा विश्वरूप श्रेष्ठ असल्याचे सांगितले. परंतु अर्जुनाला स्वाभाविकपणेच ते म्हणणे पटले नाही आणि त्याने ११ व्या अध्यायाच्या शेवटी विश्वरूप व चतुर्भुजरूप यांत श्रेष्ठ कोणते, असा प्रश्न विचारला व १२ व्या अध्यायात श्रीकृष्णाने "चतुर्भुजाची भक्ती हीच श्रेष्ठ आहे," असे उत्तरही दिले. म्हणून विश्वरूप– श्रेष्ठत्वाचे प्रतिपादन अर्जुनाची परीक्षा घेण्यासाठी होते असेच म्हणावे लागेल.

**३. पूर्वपक्ष आणि उत्तरपक्ष**

अर्जुनाचे श्रीकृष्णाकृतीवर निरतिशय प्रेम होते पण त्याला एकदेशीय सगुणकार स्वरूप हेच व्यापक सच्चिदानंद ब्रह्मरूप आहे असा अन्वयानुभव नव्हता. म्हणून भगवंताने त्याला व्यतिरेक आणि अन्वय हे दोन्ही अनुभव दिले. पण अन्वयरूप असलेल्या विश्वरूपात स्वतःच्या अपरिपक्वतेमुळे अर्जुनाने भयानकता अनुभवली आणि त्यामुळे त्याने चतुर्भुजाचे श्रेष्ठत्व कृष्णापुढे मांडले, म्हणजे आपला पूर्व पक्ष मांडला.

अज्ञानजन्य भयविकार कायम राहून मुखाने वेदान्ताचा, उद्घोष करणे याचा सर्वांनी निषेधच केला आहे. त्यामुळे भगवंताने अर्जुनाचे म्हणणे खोडून काढले. त्याच्या गावंढळपणाची निंदाही केली आणि विश्वरूप श्रेष्ठ आहे असे आग्रहपूर्वक सांगितले. त्यामुळे अर्जुनाला वाटत असलेली भीती निघून गेली एवढे समजावयास हरकत नाही. हा भगवंतांनी मांडलेला उत्तरपक्ष होय.

**संजय उवाच - सिद्धान्तपक्ष**

संजयाचे भाग्य थोर होते. व्यासांच्या कृपेने त्याला गीता ऐकावयास मिळाली व विश्वरूपही पाहावयास मिळाले. कृष्णार्जुनांच्या दिव्य संवादाला तो साक्षी होता. विश्वरूपदर्शनाच्या वेळची अर्जुनाची भीती त्याने पाहिली आणि त्या संदर्भात भक्तीच्या आधाराने अर्जुनाने मांडलेला सगुणविग्रहाचा सिद्धान्त त्याने ऐकला व त्या वरील श्रीकृष्णाचे म्हणणेही त्याने ऐकले. परंतु भगवंताच्या उत्तराप्रमाणे वस्तुस्थिती आहे असे मात्र संजयालाही वाटल्याचे दिसले नाही. तो अर्जुनाचा पक्ष घेऊनच बोलतो. याचा अर्थ अर्जुनाचे म्हणणे बरोबर असले तरी ती 'अनधिकार चेष्टा' होती म्हणून श्रीकृष्णाला सगुणापेक्षा विश्वरूपाचे महत्त्व सांगावे लागले. किंबहुना विश्वरूपाचे यथार्थ आकलन झाल्याशिवाय चतुर्भुज रूपाचा महिमा कळत नाही, व्यापकता कळत नाही किंवा त्यावर असीम आत्मप्रेमही होऊ शकत नाही; म्हणून भगवंताने प्रथम विश्वरूपाच्या माहात्म्यज्ञानावर भर दिला. हे संजयाला माहीत असल्यामुळे त्याने भक्तीचा म्हणजे चतुर्भुजरूपाचा म्हणजे अर्जुनाचा पक्ष उचलून धरला, असे माऊलीच्या ओव्यांवरून स्पष्ट दिसते. संजयाच्या मुखाने माऊली स्वतःच या संवादाचा भावार्थ काय ते मोजक्या शब्दात सांगते-

अर्जुनाच्या आवडीचा नवलावो कोणता तर भगवंताचे सगुण साकार चतुर्भुज रूप.

"श्रीकृष्णचि कैवल्य उघडे । वरी सर्वस्व विश्वरूपा एवढे।
हाती दिधले की नावडे । अर्जुनासी"

वस्तू हातात घेऊन पाहावी व नको म्हणावी, रत्नाला दूषण ठेवावे, कन्या मनाला येत नाही म्हणावे, सोन्याचे दागिने घडवावे पण ग्राहकाला आवडले नाही तर पुनः मोडून टाकावे, त्याप्रमाणे अर्जुनाच्या इच्छेनुसार भगवंताने आपले विश्वरूपाएवढे सर्वस्व उकलून दाखविले पण अर्जुनाला ते न आवडल्याने त्याने पुनः त्या विश्वरूप पटाची कृष्णाकृतीत सुंदर घडी केली.

तैसे शिष्याचिया प्रीती जाहले । कृष्णत्व होते ते विश्वरूपत्व केले ।

ते मना न येचि मग आणिले । कृष्णपण मागुते ॥

अशी शिष्याची कुरकूर सहन करणारे गुरू कोठेतरी सापडतील काय? पण काय आश्चर्य, भगवंताने अर्जुनाचे सर्व काही सहन केले. जसे त्वंपद तत्पदी सामावले जाते, विशाल वृक्ष बीजात अन्तर्भूत असतो किंवा स्वप्नसंभ्रमाला जागृती गिळून टाकते. त्याप्रमाणे विश्वरूपी दिव्य तेज श्रीकृष्णाने स्वतःच्या चतुर्भुजरूपात पुनः सामावून घेतले.

नातरी गुरूकृपेसवे । वोसरल्या प्रपंच ज्ञान आघवे ।

स्फुरे तत्त्व ते पांडवे । श्रीमूर्ती देखिली ॥

या ओवीत विश्वरूपाला प्रपंचाची व कृष्णरूपाला तत्त्वस्फुरणाची सर्वोच्च उपमा देऊन आपले मनोगत, माऊलीच्या आवडीचा भक्तिसिद्धान्त संजयाच्या मुखाने मंडित झाला आहे. हाच माऊलीला संमत असलेला सिद्धान्तपक्ष होय.

अकराव्या अध्यायाचे शेवटी भगवंतानी विश्वरूपाचे महत्त्व सांगून पुनः हे विश्वरूप भक्तीशिवाय प्राप्त होऊ शकत नाही हेही प्रतिपादन केले. या भक्तीचे वर्णन करताना माऊली म्हणते -

गंगा जशी सकळ-जळ-संपत्ती घेऊन सागराला मिळते आणि मिळतच राहते, त्याप्रमाणे सर्व प्रेमभावांच्या संभाराने भक्ताच्या सर्व वृत्ती अनावर होऊन भगवंताच्या सगुणरूपाचे ठिकाणीच धाव घेतात आणि सर्व चराचर दृश्य पदार्थात विश्वरूपाने भगवानच भरला आहे, असा अनुभव घेतात. मणभर सोने काय किंवा वालभर सोने काय त्याच्या सोनेपणात किंचितही फरक नसतो. अमृताच्या सागरात किंवा चूळभर अमृतात अमर करण्याचे सामर्थ्य तेच कायम असते; त्या प्रमाणे एकदेशीय चतुर्भुज असो की व्यापक विश्वरूप असो त्यात ओतप्रोत सामरस्य असते. म्हणून भक्ती जरी एकदेशीय कृष्णाकृतीची केली तरी विश्वरूपाचीच प्राप्ती होते.

असे ऐकताच अर्जुन आनंदसंपदेने मोहरून गेला आणि त्याने विश्वरूप आणि कृष्णरूप यातील श्रेष्ठ कोणतें असा प्रश्न केला. परंतु उत्तर देतांना मात्र बाराव्या अध्यायांत अव्यक्त श्रेष्ठ की व्यक्त श्रेष्ठ, याचा परामर्श भगवंतानी घेतला आहे. त्यामुळे वरवर पाहता प्रश्न आणि उत्तराची विसंगती वाटते. परंतु व्यक्त म्हणजे काय आणि अव्यक्त म्हणजे काय याचा अर्थ समजून घेतला तर विसंगती राहत नाही.

**व्यक्त आणि अव्यक्त**

व्यक्त म्हणजे चर्मचक्षूंनी सामान्य माणसाला दिसू शकते ते.
अव्यक्त म्हणजे दोन प्रकारचे -

१) समाधीत अनुभवाला येणारे आत्मस्वरूप आणि

२) दिव्य दृष्टीने प्रतीत होणारे विश्वरूप. विश्वरूपाला अव्यक्त म्हणण्याचे कारण असे की दिव्यदृष्टी मिळाल्याशिवाय ते साध्या डोळ्यांनी दिसत नाही. 'दिव्य दृष्टिबिन दृष्टि न आवे' आणि दिव्यदृष्टि मिळाल्यानंतर डोळे मिटले तरी दिसतच राहते. म्हणून विश्वरूपही अव्यक्तच होय. हे खालील तक्त्यातील माहिती समजून घेतल्यास अधिक स्पष्ट होईल.

आत्मसाक्षात्कार

- व्यतिरेक
  - १. निर्गुणाचा हृदयात अनुभव (ज्ञान)
  - २. सगुण चतुर्भुजाच्या हृदयात अनुभव ३. किंवा त्याच मूर्तीचा बाहेर एकदेशीय अनुभव (भक्ती)
- अन्वय
  - ४. हृदयाबाहेरील सर्व नामरूपात निर्गुण ब्रह्मच भरले आहे असा उपपत्तीने अनुभव ५. विश्वरूप किंवा (ज्ञान)
  - ६. सृष्टीची नामरूपे न दिसता चतुर्भुज रूपाची नामरूपे सर्वत्र अनुभवणे ७. ब्रह्म सगुणाचा व्यापक अनुभव ८. पराभक्तीत ब्रह्म अन्वयानुभव असतो (भक्ती)

बाराव्या अध्यायात अव्यक्ताच्या दोन्ही प्रकारांपेक्षा सगुण चतुर्भुज रूपाची भक्ती करणारा श्रेष्ठ आणि मला तो आवडतो हे भगवंताने स्पष्ट सांगितले. तसेच व्यतिरेक-अन्वयाचा विचार केल्यानंतर अन्वयात प्रेमवृत्तींचा अनुभव येऊन जाणीव-नेणीवरहित समाधिस्थिती साधण्यासाठी, एकदेशीय भासणाऱ्या पण व्यापक असलेल्या, चतुर्भुज रूपाचीच पराभक्ती करणे आवश्यक आहे, हे ब्रह्मदेवाच्या विश्वरूपदर्शनात आणि यशोदेच्या विश्वरूपदर्शनात आपण पाहिलेच आहे. तीच स्थिती अर्जुनाची होण्यासाठी विश्वरूपदर्शनानंतर भक्तियोग गीतेत सांगितला आहे.

"प्रथम स्वरूप समाधान । पावोनि ठेला अर्जुन" या चरणाने असे दिसते की अर्जुनाला प्रथम हृदयात निर्गुणाचा साक्षात्कार झाला. हेच अव्यक्त ब्रह्मरूप. हाच ज्ञानाचा व्यतिरेक अनुभव.

"सवेचि उघडी लोचन, तंव विश्वरूप देखे"

या चरणात अर्जुनाचा हृदयातील साक्षात्कार बाहेरील विश्वात व्यापून गेला. हाच ज्ञानाचा अन्वयात्मक अनुभव. हेच अव्यक्त विश्वरूप. या प्रमाणे माऊलीला अव्यक्त शब्दाने निर्देशदेशरहित असे निर्गुण ब्रह्म व अन्वयात्मक असलेले विश्वरूप हे दोन्ही अभिप्रेत आहेत. अर्जुनाला या दोन्ही अव्यक्तांपेक्षा कृष्णाकृतीत लाभ अधिक वाटला. ज्ञानेश्वर-माऊलीने संजयमुखाने त्याला संमती दिली आणि १२ व्या अध्यायात भगवंताने भक्तीलाच प्राधान्य दिले. असा एकूण क्रम असल्यामुळे विश्वरूपाच्या श्रेष्ठत्वाचे प्रतिपादन अर्जुनाची

परीक्षा पाहण्यासाठी होते, असे म्हणावे लागेल किंवा भक्तीतही अव्यक्त निर्गुणाची आणि अव्यक्त विश्वरूपाची जाणीव (म्हणजे माहात्म्य ज्ञान) कायम ठेवण्याची आवश्यकता आहे हे पटवून देण्यासाठी विश्वरूपाचे श्रेष्ठत्व सांगितले, असे म्हणावे लागते.

याप्रमाणे सर्व ठिकाणी विश्वरूपाचे मुख्य प्रयोजन एकच दिसते. ते म्हणजे भक्तांच्या असीम प्रेमाला आलंबन असलेले श्रीकृष्णरूप हे एकदेशीय नसून व्यापक आहे. पांचभौतिक नसून सच्चिदानंदघन आहे. उघडे कैवल्य आहे. कैवल्याचा पुतळा आहे. ज्ञान होण्यापूर्वी त्याची उपासना केली तर ब्रह्मज्ञान होण्यासाठी कष्ट पडत नाही आणि ज्ञानानंतर त्या सगुणाची भक्ती केली तर समाधीतीत आनंदाचा प्रत्यय ज्ञानाच्या जाणिवेमुळे खंडित होत नाही, अखंड समाधी साधली जाते. विश्वाचा भास देखील नाहीसा होतो. अशी चिद्विलासाची अवस्था भक्ताला मिळवून देण्यासाठीच विश्वरूपाचा खटाटोप भगवंताने वेळोवळी केल्याचे आढळते.

"एकदेशीय व्यापका । सरिसा पाडू" ज्ञानेश्वरी

डॉ. कृ. मा. घटाटे
नागपूर


With Best Compliments From

**ALURKAR MUSIC HOUSE**

**ALURKAR AUDIO VIDEO PRODUCTS**

4, Swapna Nagari,
Karve Road,
Pune - 411 004.
Shop Phone : 340662, 340910
Resi. Phone : 341670
Fax : 91-212-341533

With Best Compliments From

**Sprinkle**

**Building Painting Contractors**

**Prop. Prashant V. Pawar**

**Regd. Office :**
Avantika Apartments,
Flat No. 16, Ideal Conlony,
Kothrud, Pune - 411 029.
**Residence :**
Aniket Apartments,
Flat No. 10, Lane No. 8,
11 Dahanukar Colony,
Kothrud, Pune - 29.

हार्दिक शुभेच्छा !




२३८, नारायण पेठ, पुणे - ४११ ०३०.
फोन नं. : ४५४३०९

**प्लॅस्टिक (एच. डी. पी. ई.) ताडपत्री, स्कुटर, लुना, सनी व मोटार सायकल तसेच मोटारची कव्हर्स मिळतील.**




# ज्ञानयोगी

ज्ञानियांची गंगा, वाहते दुथडी । नको आचमन, घ्या हो आता बूडी ॥
काठोकाठ भरला, ज्ञानाचा हा पेला । नको अनमान, लावा ओठीयाला ॥
ज्ञानाचे निरांजन, तेवे तबकांत । नका त्यास दूर, बसा प्रकाशांत ॥
ज्ञानियांचा योगी, तो ज्ञानदेव । नका अंतरू तो, राखा सदा ठेव ॥
गीतेचा तत्वार्थ, सार्थ ज्ञानेश्वरी । माऊलीची नौका नेई पैलतिरी ॥

**भा. ना. रिसबुड**

# श्री ज्ञानेश्वर माऊलीच्या "समाधी संजीवन अवस्थेतील" सगुण साकार रंगविलेल्या चित्राबद्दल माझे मनोगत

**श्री. जि. भि. दीक्षित**

वैकुंठवासी श्री मामासाहेब दांडेकर यांच्या सार्थ ज्ञानेश्वरी या ग्रंथात प्रथम ॐकाररूप गणपतीचे व त्यानंतर दुसरे आळंदीतील ज्ञानेश्वरांचे गाभाऱ्यातील समाधीचे रंगीत चित्र छापले आहे. पुढे प्रत्येक अध्यायांत माऊलीने वर्णन केलेल्या दृष्टांतातील एकएक चित्र छापले आहे.

त्याचबरोबर प्रत्यक्ष त्यांचे समाधि-संजीवनीतील चित्र रंगवावे अशी इच्छा झाली. म्हणून मी मामांच्याकडे जाऊन विचारले. तेव्हा ते म्हणाले "ज्ञानेश्वरमाऊलीचे चित्र तुम्हाला जमेल का? कारण मला माऊलीचे सगुण साकार रूपाचे चित्र कोठेच पाहावयास मिळाले नाही. तुम्ही चित्र काढू शकाल पण त्यामध्ये "देवत्व व दिव्यत्व" कसे रंगविणार? त्यापेक्षा आळंदीच्या गाभाऱ्यातील त्यांच्या समाधीचे चित्र छापा. ते मला जास्त प्रिय आहे."

त्यांच्या "देवत्व व दिवत्वाच्या" बहुमोल उपदेशाने माझे मन भारावले. असे देवत्वाचे व दिव्यत्वाचे चित्र आपल्या हातून घडावे अशी तीव्र इच्छा मनन चिंतनात राहिली. त्याप्रमाणे संत श्रीनामदेवांच्या समाधीच्या अभंगांचा ध्यास घेतला. संत श्रीएकनाथांच्या गाथेत त्यांच्या दिव्यत्वाचा व देवत्वाचा शोध घेत असता एक बहुमोल अभंग मिळाला. त्यातूनच हे चित्र सगुण साकार नटले. तो अभंग असा.

कैवल्याचा पुतळा । प्रगटला भूतळा ।
चैतन्याचा जिव्हाळा । ज्ञानोबा माझा ।।
साधकांचा मायबाप । दरूशने हरी ताप ।
सर्वाभूती सुखरूप । ज्ञानोबा माझा ।।
ज्ञानीयांचा शिरोमणी । वंद्य जो का पूज्यस्थानी ।
साधकांचा चिंतामणी । ज्ञानोबा माझा ।।
चालविली जडभिंती । हरली चांगयाची भ्रांती ।
मोक्षमार्गीचा सांगाती । ज्ञानोबा माझा ।।
रेड्यामुखीं वेद बोलविला । गर्व द्विजांचा हरविला ।
शांतिरूपे प्रगटला । ज्ञानोबा माझा ।।
ब्रह्मसाम्राज्यदीपिका । वर्णीयेली गीतेची टीका ।
विठोबाचा प्राण सखा । ज्ञानोबा माझा ।।
गुरुसेवेलागी जाण । शरण एका जनार्दन ।
त्रैलोक्याचे जीवन । ज्ञानोबा माझा ।।

"दिव्यत्वाचा व देवत्वाचा" भाव पूर्ण लक्षात घेऊन तेच त्या माऊलीच्या चित्राचे नांव या अभंगाच्या पहिल्या चरणाचे नाव लिहिले. इंद्रायणीचे स्नान करून ज्ञानदेव समाधीच्या जागी येऊन पाटावर बसले व भावावस्थेत समाधिमग्न झाले, हा क्षण माझ्या मनाने टिपला व त्याच क्षणाचा भाव त्यांच्या मुखमंडलावर दिव्यत्वाने व देवत्वाने तेज:पुंज असा मनाला पटला व चित्रामध्ये तो रंगवला गेला.

माऊलीचे चित्र काढीत असताना रस्त्यावरून 'ज्ञानोबा तुकाराम' या गजरात काही वारकरी चालले होते. तो नामगजर ऐकताना मनात आले की या गजरात संत श्रीतुकारामांची मूर्ती मनात उभी राहिली. तरी माऊलीच्या सिद्ध अवस्थेबरोबर साधक अवस्थेमधील संत श्रीतुकारामांचे चित्र रंगवावे, त्यांचे ज्या भंडाऱ्याच्या डोंगरात मनन, चिंतन व निसर्गाचे निरीक्षण-परीक्षण करून रसग्रहण चालू होते, त्यांचे भावावस्थेतील चित्र काढावे. असे मनाला पटले व त्यांचा गाथा अभ्यासीत असता एक साधक अवस्थेला साथ देणारा अभंग मिळाला तो असा-

वृक्षवल्ली आम्हा सोयरी वनचरे । पक्षीही सुस्वरे आळवीती ।।
येणें सुखे रूचे एकांताचा वास । नाही गुण दोष अंगा येती ।।
आकाश मंडप पृथ्वी आसन । रमे तेथे मन क्रीडा करी ।।
कंथा कमंडलू देह उपचारा । जाणवितो वारा अवसरू ।।
हरिकथा भोजन परवडी विस्तार । करूनी प्रकार सेवू रूची ।।
तुका म्हणे होय मनासी संवाद । आपुलाची वाद आपणासी ।।

या अभंगातील पहिलेच चरण संत श्रीतुकारामांच्या साधक अवस्थेला योग्य म्हणून चित्रावर लिहिले. ही दोन्ही चित्रे पूर्ण योग्य अशी झाली. मनाला समाधान झाले. आता ही दोन्ही चित्रें श्री मामांना दाखवावी म्हणून घेऊन गेलो. त्यावेळी ती दोन्ही चित्रे त्यांनी समोर ठेवली व पाहात बसले. ती पाहून त्यांना फार आनंद झाला आणि म्हणाले ही दोन्ही चित्रें जरूर छापा. मला विश्वास वाटतो ती जनताजनार्दनाला आवडतील. भागवत धर्माचा पुरस्कार माऊलीने केला - त्याचाही दोन्ही चित्रात देवत्वाचा व दिव्यत्वाचा पूर्ण ठसा उमटला आहे अशी झाली आहेत. संत श्रीनामदेवांचे ज्ञानेश्वराच्या समाधीचे अभंग वाचताना एका अभंगात ज्ञानेश्वर पाटावर येऊन बसले आहेत. असे जे यथार्थ वर्णन दिले तो अभंग

असा –

देव निवृत्ति यानी धरिले दोन्ही कर ।
जातो ज्ञानेश्वर बैसावया ॥१॥
नदीचिया पारणी माशा घातले माजवण ।
तैसे जनवन कालवले ॥२॥
दाही दिशा धुंद उदयअस्तावीण ।
तैसेंचि गगन कालवले ॥३॥
जाऊनि ज्ञानेश्वर बैसले आसनावरी ।
पुढे ज्ञानेश्वरी ठेवियेली ॥४॥
ज्ञानदेव म्हणे सुखी केलं देवा ।
पादपद्मीं ठेवा निरंतर ॥५॥
तीन वेळा तेव्हां जोडिलें करकमळ ।
झाकियेले डोळे ज्ञानदेवें ॥६॥
भीममुद्रा डोळा निरंजन मैदान ।
झाले ब्रह्मपूर्ण ज्ञानदेव ॥७॥
नामा म्हणे आतां लोपला दिनकर ।
बाप ज्ञानेश्वर समाधिस्थ ॥८॥

अशा या यथार्थदर्शनाचा संजीवन भावसमाधीचा अभंग जो मनाला स्पर्श करून गेला, त्यानेच हे चित्र मनाला स्फुरले ते माऊलीच्या कृपाशीर्वादाने सगुण साकार झाले. या चित्रांत देवत्वाची व दिव्यत्वाची झलक आणता आली. त्यालाच अनुसरून समर्पक एक श्रीसंत एकनाथांचा ज्ञानेश्वर माऊलीच्या वैभवाचा अभंग मला लाभला तो मी दिलाच आहे.

हे चित्र पाहून काही लोकांनी मला विचारले, ज्ञानेश्वराना जानवे का घातले? कारण त्यांचे मौजीबंधन झाले नव्हते. त्या अगोदर श्री. केशवराव देशमुखांनी, श्री ज्ञानेश्वरांचे माझ्या तैल चित्राचे प्रकाशन केले असता हा प्रश्न विचारला की तुम्ही ज्ञानेश्वरांच्या अंगावर जानवे का घातले नाहीत, ते तुम्ही जरूर घाला, कारण ते ब्रह्मसूत्र अंगिकारून जन्माला आले आहेत, म्हणून मी या चित्रात जानवे व तुळशीची माळ घातली आहे. मी एक सेव्यसेवक भावाचा दासानुदास आहे. तसे आपण सर्वांनी त्यातील लक्ष्यार्थाची जाणीव ठेवून हे चित्र पाहावे ही इच्छा.

माझ्या जीवनात अघटित व अगाध प्रसंग घडला तो या दोन्ही चित्रांच्या संबंधात घडला, तो असा. परमहंस परिव्राजकाचार्य श्रीधरस्वामींनी मला श्रीसमर्थरामदास स्वामींचे चित्र काढण्यास सांगितले. श्री शिवछत्रपतींनी राज्याभिषेकानंतर श्रीसमर्थांची सज्जनगडावर राहाण्याची व्यवस्था केली. त्या वेळी श्रीसमर्थांच्या अंगावर वस्त्रे घालून त्यांची पाद्यपूजा केली, त्याचे यथार्थ वर्णन समर्थांच्या हनुमान बखरीत वर्णन केलेप्रमाणे एक उत्तम चित्र करण्यास सांगितले. ते पूर्ण झाल्यावर त्यांनी मला सूचक प्रश्न टाकला, "का हो दीक्षित, मानवी प्रयत्न इतकाच सगुण साकार घडतो. हे ऐकून माझे मन खट्टू झाले. पण लगेच म्हणाले, निराश होऊ नका, तुमचा जन्मच अशा चित्रकलेच्या माध्यमातून संतसेवा व सत्संग घडण्याकरिता आहे. हे ऐकून माझे मन शांत झाले. "बोले तैसा चाले । त्याची वंदावी पाऊले ॥" असाच अलौकिक प्रसंग जो घडला तो असा- श्रीसंतज्ञानेश्वरांचे व श्रीसंततुकारामांचे अशी दोन चित्रे एकाच वेळी माझ्या हातून झाली. ती स्वामींना दाखविण्याकरता सज्जनगडावर जाऊन त्यांना दाखवावी असे वाटले, पण त्या वेळी त्यांनी मौन स्वीकारले होते. "लेकुराचे हित जाणे माऊलीचे चित्त." त्याच वेळी मला एक स्वप्न पडले की, मी एका जुन्या वाड्यांत माडीवर जिन्यात उभा आहे. पण जिन्यात सात-आठ पायऱ्यांखाली एक संन्यासी बसले आहेत, त्यांचे समोर एक भव्य स्फटिकाचे शिवलिंग आहे. हे पाहात असताना स्वामींनीच वर माझ्याकडे पाहिले व खाली या अशी हसतमुखाने खूण केली. त्या प्रमाणे मी खाली जाऊन त्यांच्याजवळ बसलो. ते म्हणाले, "दीक्षित तुम्हाला काय बरे द्यावे, येथे तर कांहीच नाहीं. बघतो हं" असे म्हणून पाठीमागच्या भिंतीतल्या कोनाड्यातून कांही तुलसी मंजिरी हातात घेऊन "या घ्या आणि आपण वर जाऊन बसू या", असे म्हणाले. नंतर आम्ही दोघे वर आलो. माडीवर एक लांबरुंद जागा होती व तेथे एक चटई अंथरली होती. त्यावर आम्ही दोघे बसलो. लगेच त्यांनी विचारले, "आता कोणत्या संतविभूती रंगवल्या? मला त्या दाखविण्याची जरूर नाहीं. मी त्या पाहिल्या आहेत. तुम्ही त्या जरूर छापा" असे म्हणून उठले व डोक्यावर आशीर्वादाचा हात ठेवला. त्यांच्या दिव्यत्वाच्या आशीर्वादाने आतापर्यंत संत व सिद्ध सत्पुरुषांची चित्रे माझ्या हातून झाली व आजही माझ्या चालू ८८ वर्षांच्या वयात दृष्टी व हात चित्रकलेच्या माध्यमात चालू आहेत. 'हे देणे ईश्वराचे' या समाधानात अनुभवीत आहे. "वेडे वाकुडे गाईन, परी मी तुझाच म्हणवेन" ही जाणीव ठेवून माझ्या या दोन्ही चित्रांचे लिहिले गेलेले स्पष्टीकरण आपण आपुलकीने वाचावे ही नम्र विनंती.

जि. भि. दीक्षित
शांती सागर अपार्टमेंटस्,
सदाशिव पेठ,
पुणे - ४११ ०३०.

# जैसा अमृताचा निर्झरु ।....

डॉ. माधव नगरकर

ज्ञानेश्वरीबद्दल जर ज्ञानेश्वर महाराजांच्या शब्दांचाच आधार घेऊन बोलायचे झाले तर ते भगवद्‌गीतेबद्दल जे म्हणतात ते सर्व गुणवर्णन ज्ञानेश्वरीला लागू पडते.

जे ज्ञानामृताची जान्हवी । आनंद चंद्रीची सतरावी ।
विचार क्षीरार्णवीची नवी । लक्ष्मी जे हे ।। १५-५७२

अध्यात्मज्ञान नित्य आहे, संजीवक आहे. 'मी' म्हणजे हे मरणारे शरीर नसून, अज, अमर चैतन्य आहेत, या बोधाने अमर करून देणारे अमृत आहे. ते अमृत आपणापर्यंत पोहोचविणारी ही ज्ञान-गंगा स्वतः पवित्र आणि तिला स्पर्श करेल त्याला पवित्र करण्याच सामर्थ्य असलेली आहे.

तसेच तिच्यामध्ये नित्य नूतनत्व आहे. ही देखील ज्ञानेश्वर महाराजांचीच संज्ञा. नित्यत्व तिच्या तत्वात आहे नूतनत्व तिच्या अविष्कारात आहे. जसा गंगाजळचा प्रवाह, नित्य आहे पण क्षणाक्षणाला नूतन देखील आहे. सोळा कळांनी पूर्ण असा आनंदरूप चंद्र त्याची सतरावी कळा अनुभूति. ती प्राप्त करून देणारी म्हणून 'आनंदचंद्रीची सतरावी'!

विचार क्षीरार्णवीची नवी । लक्ष्मी जे हे ।। हे सांगताना ज्ञानेश्वर महाराज अनेक संवेदना प्रकट करतात. प्रथम विचार हवेत, ते क्षीर म्हणजे चांगले, गोड हवेत. तशा विचारांचा अर्णव म्हणजे सागर हवा. तो सागर मंथन करून जी नवी लक्ष्मी प्रकट झाली ती ही गीता, त्याच प्रमाणे ज्ञानेश्वरी! नाविन्याची झळाळी तिच्यात केंव्हाही पाहिलं तरी आहे.

दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञांची लक्षणे सांगताना गीता एवढी उंच गेली आहे आणि ज्ञानेश्वरी इतकी सुदंर ओव्यांनी युक्त आहे की 'अळंकारिले कवण कवणा । हे निर्वचेना ।।' आत्मरत, आत्मतुष्ट असा तो ज्ञानी पुरूष 'वीत राग भय क्रोधः'

या लक्षणांनी युक्त असतो असे सांगताना एक शब्दक्रम योजला आहे. कोणत्याही गोष्टीची आसक्ती म्हणजे राग. तो ज्याचा गेला आहे तो वीतराग. ज्या गोष्टीची आसक्ती गेली ती गोष्ट जाण्याचे भय आणि प्रत्यक्ष तिच्या जाण्याने किंवा न मिळण्याने येणारा क्रोध देखील जातात म्हणून 'वीतरागभयक्रोधः' हे ज्ञानी पुरुषाचे लक्षण सांगितले आहे. तर ज्ञानेश्वर महाराज म्हणतात त्याच्या ज्ञानाच्या परिपूर्णतेने त्याच्या ठायी कामक्रोध सहजच नाहीत आणि भयाला तो जाणतच नाही.

ज्ञानी पुरुषाचे स्वामीत्व कसे असते हे सांगताना कूर्म जसा अवयव आवरतो तसा तो विषयांपासून आवरून घेतो असं गीतेमध्ये मांडले आहे. त्यावर भाष्य करताना बहुतेक सर्व भाष्यकारांनी, 'धोक्याची सूचना मिळताच, भयाने तो आपली इंद्रिये आवरतो' असे स्पष्टीकरण केले आहे. केवळ ज्ञानेश्वर महाराजांनी, गीतेमध्ये जसा भय हा शब्द नाही त्याला अनुसरून आणि त्याच्याही पुढे जाऊन म्हटले आहे, 'का कूर्म जियापरी । उवाईला आवेव पसरी ।' उवाईला म्हणजे आनंदाने, कूर्म आपले अवयव पसरतो, तसा ज्ञानी आनंदाने आवश्यक आणि धर्म्य भोग घेतो. 'ना इच्छावशे आवरी । आपुले आपण ।।' आणि स्वेच्छेने आवरतो तो भीत नाही कारण अधर्म्य काही न करण्याची त्याच्या इंद्रियांनाच समज असते. तो काही साधक नाही आहे की त्याने भिऊन इंद्रियांना आवरावे. त्याची इंद्रिये पूर्ण त्याला स्वाधीन असतात आणि तो आत्मरत असतो. आंबा खाताना तो असं म्हणत नाही, "काय हा विषय मन, इंद्रिय आवरून घेऊ!' तो सहज आनंदाने खाईल, योग्य तेवढेच खाईल आणि हे पुन्हा पुन्हा मिळावे अशा संवेदना त्याच्या मनात रेंगाळत राहणार नाहीत.

असा इंद्रिये, मन पूर्ण स्वाधीन असलेल्या आवश्यक आणि धर्म्य विषय योग्य तेवढेच आनंदाने भोगणाऱ्या, इच्छा-अनिच्छेपासून वियुक्त झालेल्या ज्ञानी पुरूषाला प्रसाद म्हणजे चित्ताची प्रसन्नता प्राप्त होते.

प्रसादे सर्व दुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धि पर्यवतिष्ठते ।।

या श्लोकावर विवेचन करताना तर एखादे सुंदर कारंजे एकदम उडावे तसे ज्ञानेश्वर महाराजांचे वाक् विलास वैभव प्रकट झाले आहे.

देखे अखंडित प्रसन्नता । आधि-जेय चित्ता ।
तेथे रिगणे नाही समस्ता । संसार दुःखा ।। २-३३८

व्यास महर्षी म्हणतात, त्या आत्मप्रसादाने त्याच्या सर्व दुःखांचा नाश होतो. ही सर्व दुःखे कोणती तर ज्ञानेश्वर महाराज म्हणतात संसार दुःखे 'मी' प्रधान जीवन आणि त्यातला माझं म्हणजे संसार. त्या धारणेनी येणारी सर्व दुःखे. दुःख म्हणजे तरी काय? आपल्या चिन्मय स्वरूपापासून विचलीत झाल्याने होणारी वेदना. त्यांचा नाश होतो असं गीता म्हणते तर ज्ञानेश्वरी म्हणते की त्यांचा अंतःकरणात शिरकावच होत नाही. अंतःकरण अखंडित प्रसन्नतेनी भरून गेल आहे. त्यामुळे दुःखांना आत शिरायला वावच

नाही. त्यांचा नाश होण्याचा प्रश्नच नाहीय.

प्रसन्नतेचे आधिष्ठान आहे ज्ञानपूर्ण स्थिरता. शांती! चित्त विक्षेपित नाही. माणूस जेंव्हा प्रसन्न असतो तेव्हा कोणत्याही गोष्टीचा ताण त्याच्या मनावर नसतो. आपलं कर्तव्य कर्म नीट करणाऱ्या, सद्गुरूंचे मार्गदर्शन लाभून साधना करणाऱ्या, स्वाध्याय करणाऱ्या साधकाला प्रसन्नतेचा अनुभव येतो. तेव्हा चित्तावर उठणाऱ्या संवेदनांची संख्या आणि तीव्रता दोन्ही कमी असतात. त्यावेळी येणारे विचारतरंग पवित्र, परमेश्वराशी, संतांशी संबंधित असे असतात. त्यामुळे अंतःकरणातला स्वाभाविक आनंद प्रकट होत असतो. अशा रितीने शांती, पावित्र्य आणि आनंद यांच्या संगमाने निर्माण झालेली चित्ताची स्थिती म्हणजे प्रसन्नता. ती साधकाला मधून मधून प्राप्त होते. तर ज्ञानी पुरूषाला अखंडित असते.

अमृताचा निर्झरू । प्रसवे जयाचा जठरू ।
तया क्षुधे तृषेचा अडदरू । काहींचि नाही ॥
तैसे हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैंचे कें आहे ।
तेथ आपैसी बुद्धि राहे । परमात्मरूपी ॥

अमृताचा निर्झर जर कोणाच्या जठरात प्रसवेल तर त्याला जशी क्षुधा तृषा लागणार नाही तसा आनंदाचा झरा ज्याच्या अंतःकरणात वाहतो आहे त्याला वासनांचा आणि त्यातून निर्माण होणाऱ्या दुःखांचा व्याप नाही. नुसत अमृत नाही तर त्याचा निर्झर, वाहता झरा. आणि तो सौंदर्यपूर्ण आहे नैसर्गिकच, निर्मळ आहे स्वभावतःच! हे सर्व निर्झर या शब्दांतून प्रकट केले आहे. तो डोंगराच्या कपारीतून उगम पावलेला निर्झर बाहेरून पाहून आपल्याला एवढा आल्हाद होतो तर तो प्रसन्नतेचा झरा अंतःकरणात वाहतो आहे असा पुरूष किती आनंदमय असेल? तो सहज अत्यंत तृप्त असतो. स्वरूपाचा आनंद उपभोगत असतो. त्यामुळे किरकोळ वासनापूर्तीने त्याच्या आनंदात भर पडणार नसते. काही मिळालं किंवा न मिळालं तरी त्याच्या पूर्णतेत बदल घडत नसतो. त्यामुळेच देहाच्या विकल अवस्थेत देखील स्वामी स्वरूपानंद, कोणा साधकांच्या पत्रांना उत्तर लिहील्यावर, आपणा सर्वांचा आत्मतृप्त, स्वामी स्वरूपानंद असे लिहू शकत असत.

चित्त असो द्यावे निवांत प्रसन्न ।
कल्पांती ही खिन्न होऊ नये ॥
अंतरी असावा अखंड उल्हास ।
आपत्तीचा त्रास मानू नये ॥
संसारी असावे अलिप्त उदास ।
मोहे माय-पाश जोडू नये ॥
स्वामी म्हणे व्हावा ईश्वरी विश्वास ।
संतांचा सहवास सोडू नये ॥

तुकाराम महाराजांकडे ऐहिक वैभव काही नसताना त्यांची 'आनंदाचे डोही आनंद तरंग' ही अंतरावस्था त्यांनी प्रकट केली. त्यांनी अतिशय सौंदर्यपुर्णरितीने मांडलं की 'गर्भाचे आवडी मातेचा डोहळा । येथीचा जिव्हाळा बिंबे ॥' गर्भ म्हणजे गाभा. आनंदाचा गाभा परमात्मा मला प्राप्त झाला. गर्भाचा जिव्हाळा, सहज प्रवृत्ती मातेच्या वृत्तींमध्ये, कृतींमध्ये प्रकट होते. हा आनंदगर्भ असल्यामुळे माझ्या सर्व कृतींमध्ये तो प्रकट होतो. माझ हसणं, भजन करणं, खाणं, पिणं, बोलणं, बघणं, चालणं, किंवा शात बसणं हे सर्व आनंदाच्या तरंगावरचा विहार आहे. असं हृदय प्रसन्न असेल 'तर दुःख कैंचे कें आहे?'

सर्व संतांचे जीवन-काव्य हा अमृताचा निर्झर आहे. तो पाहूनच आपल्याला एवढा आनंद मिळतो तर त्याचा स्पर्श अंतःकरणाला झाला तर जीवन केवढे उन्नत होईल? पण हे केवळ भावनेनी होणार नाही. त्या भावनेला कृतीची जोड असली तरच जीवनात हा अमृताचा निर्झर अनुभवता येईल. नीती नियमांनी आपल्या स्वकर्माच्या क्षेत्रात वावरणे, समाजाशी प्रेमाचा, सौदाहऱ्याचा, मैत्रीचा संबंध असणे, आपला गीता-ज्ञानेश्वरी, दासबोध यांसारख्या अध्यात्मपर ग्रंथाचा अभ्यास असणे, सद्गुरूंना शरण जाणे, त्यांच्या मार्गदर्शनानुसार, नाम-ध्यान या साधनांनी एकांतात नित्य नियमाने साधना करून परमात्म तत्वाशी एकरूप होणे ह्या मार्गाने हा झरा आपल्याला लाभेल. अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, शांती, आर्जव हे सर्व दैवी गुण हे त्या निर्झराचे तुषार आहेत. ते ज्ञानेश्वर महाराजांनी केवढ्या उंचीला नेले आहेत ते पाहिलं की मोठं आनंदाश्चर्य वाटतं.

नाना कमळदळे । डोलविजती ढाळे ढाळे ।
तो जेणे पाडे बुबुळे । वारा घेणे ॥

कमळदल डोळ्यांसमोर हळूवारपणे डोलवली असता बुबुळांना जसा वारा लागेल,

तैसेनि मार्दवे पाय । भूमीवरी न्यसीतु जाय ।
लागती तेथ होय । जीवा सुख ॥

तशा मार्दवाने पाय भूमीवर तो ज्ञानी पुरूष ठेवीत जातो. त्याचे पाय ज्या ठिकाणी लागतात तिथल्या जीवांना सुख होत.

तो स्वतः कसा असतो तर,

वार्षियेवीण सागरू । जैसा जळे नित्य निर्भरू ।
तैसा निरुपचारू । संतोषी जो ॥
जीवु-परमात्मा दोन्ही । बैसानिया ऐक्यासनी ।
जयाच्या हृदय भुवनी । विराजती ॥
आत बाहेरि योगु । निर्वाळलेयाही चांगु ।
परि माझा अनुरागु । सप्रेम जया ॥
अर्जुना तो भक्तु । तोचि योगी तोचि मुक्तु ।

तो वल्लभा मी कांतु । ऐसा पढिये ॥

नुसतं 'श्री भगवान उवाच' असं ज्ञानेश्वर महाराज कधीही म्हणत नाहीत. त्या भगवंताला आळवण्याची संधीच ते तेंव्हा घेतात.

ऐसे निजजनानंदे । तेणे जगदादि कंदे ।
बोलिले मुकुंदे । संजयो म्हणे ॥

किंवा

तव ह्रदयकमळ आरामु । जो योगियांचा निष्कामकामु ।
तो म्हणतसे पुरूषोत्तमु । सांगेन आईक ॥

गीतेबद्दल तर एवढं सौंदर्यपूर्ण काव्य प्रकटन कोणीही केलेले नसेल.

सभाग्य संती भ्रमरी । सेविले ते श्लोक कल्हारी ।
श्रीकृष्णाख्य सरोवरी । सासिन्नली हे ॥

म्हणजे श्रीकृष्णनामक सरोवरात वाढलेल्या त्या श्लोकरूपी कमळांचे, ज्यांचे भाग्य आहे असे संत सेवन करतात.

असा हा ज्ञानेश्वरी काव्य-अमृताचा निर्झर! त्यांच्याच भाषेत,

अध्यात्मशास्त्री इये । अंतरंगचि अधिकारिये ।
परि लोक वाक्‌चातुर्ये । होईल सुखिया ॥
॥ ॐ तत् सत् ॥

डॉ. माधवराव नगरकर
८८५/३ इंस्टिट्यूट रोड,
शिवाजीनगर, पुणे - ४११ ००४.

## श्री संत श्रेष्ठ गुलाबराव महाराज यांचे उत्तराधिकारी श्री. बाबाजी महाराज कृत

*अलंकापुरीचा अगाध महिमा ।*
*नित्य पुरूषोत्तमा वास जेथे ॥१॥*
*कल्पांतीहि तया नोहेचि विनाश ।*
*अखंड अविनाश ब्रह्मरूप ॥२॥*
*सच्चित्सुखगाभा वसे ज्ञानदेव ।*
*कलिकाळ भेव नाही तेथें ॥३॥*
*स्कंददास म्हणे क्षेत्रीचे ते जन ।*
*नये महिमान वर्णू वाचे ॥४॥*
*आळंदीची वाट चालता पाऊली ।*
*दुरिते जळाली असंख्यात ॥५॥*
*चैतन्याची दीप्ती ज्ञानाबाई ।*
*गर्भवासा न येणे पुनः ॥६॥*
*इंद्रायणी स्नाने कायाची चिन्मय ।*
*देहासह होय ब्रह्मरूप ॥७॥*
*जाणता नेणता नाही भेदभाव ।*
*एकसरे जीव उद्धरती ॥८॥*
*स्कंददास म्हणे सुलभ हे वाट ।*
*पाविजे वैकुंठ हेळामात्रे ॥९॥*

---

*नमो जी दयाळा संप्रदायेश्वरा ।*
*अलकावतीवरा ज्ञाननाथा ॥१॥*

*वाणी मन तुम्हां कराया अर्पण ।*
*कृष्णलीला गान करो वाटे ॥२॥*

*बालकाचे चोज पुरवावे कोडे ।*
*पाजोनी रोकडे प्रेमदुग्ध ॥३॥*

*स्कंददासा तुम्ही घेतले पदरी ।*
*आता उणे परी सरते करा ॥४॥*

*अहो आळंदीच्या राया ।*
*हेचि पाया विनवणी ॥५॥*

*लटिका भाव लटिकी सेवा ।*
*गोड देवा करूनि घ्या ॥६॥*

*दिसेदिस चित्तीं साचा ।*
*करा प्रेमाचा सुकाळ ॥७॥*

*ज्ञानेशजासुत म्हणे ।*
*नका उणे दाखवू ॥८॥*

*धाव मायबापा आळंदीच्या राया ।*
*पिडिलो सखया भवतापे ॥९॥*

*आम्हा दीन दुःखिताचा रे कणवा ।*
*कोणालागी यावा तुम्हाविण ॥१०॥*

*समर्थे दिधला शिरावरी हात ।*
*श्रुत झाली मात लोकामाजी ॥११॥*

*ज्ञानेश्वरकन्ये केले दूरदेशी ।*
*आता कोणापाशी तोंड वासूं ॥१२॥*

# ज्ञानेश्वर माऊलींची 'भारूडे'

डॉ. रामचंद्र देखणे

साधे सोपे समाजभिमुख रसाळ वाङ्मय म्हणून संत साहित्य अक्षरत्वाला पोहोचले आहे. खेडोपाड्यापर्यंत जिभेजिभेवर ते खेळते आहे. ह्याच समृद्ध आणि सर्वव्यापी संत वाङ्मयातून भारूडांचा जन्म झाला आणि संतसाहित्याचे लोकवाङ्मयीन गोजिरे रूप 'भारूड' प्रकारातून साकार झाला.

तत्त्वज्ञानाचा किंवा अध्यात्माचा उपदेश जरी ओवीबद्ध ग्रंथ, श्लोक, अभंग वगैरे संत वाङ्मयातून केला असला तरी सर्वसामान्य आणि बहुतांशी लोक ते वाङ्मय वाचतीलच असे नाही. तरीही सर्वसामान्य माणसाची अभिरूची काय असू शकेल याचा मराठी संत परंपरेने अभ्यास केला आणि समाजात, आढळणाऱ्या कांही लोकभूमिकांच्या माध्यमातून काहीशा नाट्यमय स्वरूपात भारूड वाङ्मयाला आकार दिला. महाराष्ट्रातील साऱ्या खेड्यापाड्या पर्यंत जावून त्यांच्या लोकभाषेत परंपरेनुसार कांही सांगणारा शिकवणारा आणि जाता जाता मनोरंजन करणारा एक फार मोठा लोककलाकारांचा वर्ग महाराष्ट्रात नांदत होता. वाघ्या, मुरळी, भराडी, गोंधळी, भालदार, चोपदार, वासुदेव, जोशी, दरवेशी, मलंग, फकीर, पांगुळ, सरोदा, जागल्या, पोतराज, भुत्या, कोल्हाटी यासारख्या असंख्य लोकभूमिका महाराष्ट्रात वावरत होत्या. ह्या लोकभूमिकांचा लोकसंपर्क दांडगा होता. ह्या भूमिका समाजात लोकप्रिय झाल्या होत्या, आणि राजाश्रयापेक्षा लोकाश्रयावर आपले चरितार्थ चालवित होत्या. मराठी संतांनी ह्या लोकभूमिकांचा पुरेपूर उपयोग करून घेतला आणि वरील स्वरूपातील प्रतिकात्मक भूमिकांमधून रूपकात्मक पद्धतीने तत्त्वज्ञानाची मांडणी करून 'नीति'चा उपदेश करण्यासाठी संत साहित्यातून ह्या 'बहुरूढ' म्हणजे भारूड वाङ्मयाचा उदय झाला.

**ब्रह्मरस सुस्वादे - अक्षरे गुंफिली**

मातृत्व किंवा माऊलीपणा जन्मावे लागतं. आईला आपल्या मुलासाठी जे परिश्रम घ्यायचे असात त्याचे प्रदर्शन करायचे नसते. मातृत्वाचे सारेच गुण ज्ञानदेवांच्या ठायी आढळतात. आईचं किंवा माऊलीचं सर्वात महत्वाचे लक्षण म्हणजे आईच्या ठिकाणी आपल्या लेकरांबद्दल आपपर भाव तर नसतो, उलट अडाणी, दुबळ्या अशा मुलांना तर ती अधिकच प्रेम देते. अशा मुलांबद्दल तिच्याठायी अधिकच तळमळ असते. आणि ह्याच भावनेने अशाच अबाल अडाण्यांसाठी ज्ञानोबा माऊलीने –

'तेणे अबाल सुबोधे । ओवियोचेनि बंधे ।
ब्रह्मरस सुस्वादे । अक्षरे गुंफिली ।'

आपल्या वाङ्मयातील ज्ञानाचे घास भरवून ब्रह्मरस चाखविला आहे.

स्त्री शुद्रांच्या प्रतिभेलाही समजेल इतक्या सोप्या शब्दात परब्रह्माचे स्वरूप मांडून आपल्या दीन-दुबळ्या लेकरांवर खरा प्रेमाचा वर्षाव केला आहे. पंडित, महापंडित, ज्ञानी यांच्यासाठी ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेव पासष्टी यासारखे ग्रंथ लिहून त्यांनाही ज्ञानाचे स्वरूप सांगितले आहे. तर अति सामान्य माणसांसाठी भारूडे, अभंग, हरिपाठ यासारखे वाङ्मय लिहून त्यांनाही परमेश्वर स्वरूप आणि खरा आनंद मिळवून दिला आहे. आपपरभाव न ठेवता पंडित, ज्ञानी याचबरोबर अतिसामान्य या सर्वांनाच त्यांच्या परीने अध्यात्म सांगून माऊलीचे खरे स्वरूप प्रकट झाले आहे. म्हणूनच मराठी सारस्वतात ज्ञानदेवांच्या भारूडांना एक वेगळे स्थान आहे.

**भारूडांचे जनक - ज्ञानदेव**

भारूडे म्हटले की, आपल्यासमोर मूर्ती उभी राहते ती संत एकनाथांची. त्यांनी भारूडला व्यापक आणि लोकप्रिय बनविले. तथापि मराठी साहित्य सृष्टीत 'भारूड' या काव्य प्रकारची आद्यरचना केली ती संत ज्ञानदेवांनी म्हणूनच भारूडाचे जनकत्व संत ज्ञानदेवांकडे जाते.

समाजात वावरणाऱ्या आणि नित्याच्या व्यवहारात आढळणाऱ्या विविध भूमिकांना बोलके करून त्यांच्याच माध्यमातून परोपरीची रूपके मांडून संत ज्ञानदेवांनी मराठीत प्रथम भारूडांची रचना केली. काहीशा स्वरूपात लोकसाहित्यिकाची भूमिका घेणाऱ्या ह्या संताने परमार्थासाठी ह्या भारूडांचा उपयोग करून घेतला आणि लोक वाङ्मयाच्या माध्यमातून ह्या तत्त्वज्ञानाला सुलभ केले.

**ज्ञानदेवांच्या भारूडांचे स्वरूप**

ज्ञानदेवांची भारूड रचनाही जरी संख्येने अल्प असली तरी मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने ती अतिशय महत्त्वाची आणि मोलाची आहे. ज्ञानदेवांची काही भारूडे प्रदीर्घ, काही संवादात्मक तर काही शब्दचित्रणात्मक आहेत. ज्ञानदेवांच्या काळातील सामाजिक स्थिती पाहता त्याकाळी मराठीत रचना करणेही अवघडच होते. त्यातून ज्ञानदेव हे पूर्णतः तत्त्वज्ञानाचे प्रणेते म्हणूनच की काय त्यांच्या भारूडांतून विनोद आणि उपहास जरी फारसा आढळत नसला तरी अध्यात्मिक उद्बोधन आणि आत्मानुभव निवेदन या दृष्टीने

ज्ञानदेवांचा अंबुला, सौरी, फुगडी, घोंगडी, जोहार, वासुदेव, डौर, आंधळा, पांगुळ, बाळछंद, कापडी, गोंधळ यासारख्या भारूडातून केलेला पारमार्थिक उपदेश सर्व सामान्यांना खडबडून जागे करीत आहे.

**ज्ञानदेवांचा डौर**

*आपल्या 'डौर' ह्या भारूडात ते सांगतात –*

*सभा समस्त साधु संतांची । महामुनी विरक्तींची ।*
*पंडीत पाठक ज्ञानियांची । समस्तांसी विनवणी ॥१॥*
*आता परिसा पाच नांद । पांच नादांचे पांच भेद ।*
*पहिला नाद चटपट चटपट । दुसरा नाद खटपटखटपट ।*
*तिसरा लटपट लटपट । चौथा फटफट फटफट ।*
*पांचवा तळमळ तळमळ ॥*

ह्यासारख्या जीवाच्या पांच अवस्था आहेत. तसेच जीवाला विकारांपासून दूर होण्यासाठी पांच नाद आणि पांच भेद सांगून ज्ञानदेवांचा डौर म्हणतो

*परि विषय वासना न सोडी*
*उपाधी गाढी श्रीपादा ।*

या विषयवासनांपासून दूर जावून जीवाला परमार्थाची तळमळ लागायला हवी. त्यातूनच पुढे विवेक जन्मास येतो आणि जीव हरिनामात दंगून जातो.

*ऐसे भेद नादाचे । मनी घरा विवेकाचे ।*
*ज्ञानदेव बोले निवृत्तीचे । बोला वाचे हरिनाम ।*

**ज्ञानदेवांचा अंबुला**

अंबुला म्हणजे नवरा. ज्ञानदेवांचा अंबुला आणि नाथांचा दादला यात बरेच साम्य आहे. परमार्थापासून दूर चाललेल्या अविचारीपणाला दूर सारून विवेक संपन्नतेची उंची येण्यासाठी ह्या अविचारी अंबुल्याला 'घालवून देवून आत्मसुखाची आनंद अवस्था त्यांनी 'अंबुला' ह्या भारूडात मांडली आहे. 'अंबुला' या रूपकातून ती सुविचारी नार आपल्या सखीला सांगू लागली काय करू? ह्या अविचारी अंबुल्याबरोबर आता मला संसार करणे अशक्य झाल्यं. मला आता कृष्णभेटीची म्हणजेच परमात्मसुखाची आस लागली आहे.'

*विचारीता देही अविचार अंबुला ।*
*न साहे वो साहिला काय करू ।*
*अंबुला विकून घेतली वस्तु*
*घराचार समस्तु बुंडविला ।*
*उठोनि गेलिये अज्ञान म्हणाल*
*म्या तव कैवल्य जोडियेले ।*

मी ह्या अविचारी अंबुल्या बरोबरचा संसार त्यागला. अविचारी अंबुल्याला बाजारात विकून विकृतींचा घराचार बुडविला. त्यामुळेच मी अज्ञान सांडले आणि मला कैवल्याची प्राप्ती झाली. जीवरूप नारीला ह्या संसारातील सुखात आनंद मिळेना म्हणून ती वैराग्याच्या भूमिकेवर येते आणि अविचारी अंबुल्याला विकून टाकते.

**ज्ञानदेवांचा आंधळा**

जीवाला आत्मस्वरूपाची ओळख होणे यातच जीवाचे खरे सुख सामावले आहे. आत्मस्वरूपी असणारा जीवात्मा हाच त्या शिवात्माचा अंश आहे म्हणजेच सर्वव्यापक परमेश्वर आत्मस्वरूपातही नांदत असतो ही आत्मस्वरूपाची ओळख होणे ह्यातच आनंद सामावला आहे. परंतु अविद्येमुळे किंवा अज्ञानामुळे जीव स्वरूपाला विसरतो. आणि विकारांच्या आहारी जातो विषयसुखात स्वतःला अडकवून घेतो आणि शेवटी दुःखमय असे फेरे हिंडत राहतो. हे सांगतांना ज्ञानदेव 'आंधळा' या भारूडात म्हणतात.

*'पूर्वजन्मी पाप केले ते हे बहुत विस्तारिले ।*
*विषय सुख नाशिवंत सेविता तिमिर कोंदले ।*
*चौऱ्यांशी लक्ष योनी फिरता दुःख भोगिले ।*
*ज्ञान दृष्टी हारपली दोन्ही नेत्र आंधळे ।'*

मी नाशिवंत अशा विषय सुखाला कवटाळून बसलो. त्यामुळे माझी ज्ञानदृष्टी हारपली आणि मी पारमार्थिक दृष्टीने आंधळा झालो. असा हा आंधळा जीव आता विनवणी करू लागला.

*संसार दुःखमूळ चहूकडे इंगळ ।*
*विश्रांती नाही कोठे रात्रंदिवस तळमळ ।*
*कामक्रोध लोभशुनी पाठी लागली वोढाळ ।*
*कवणा शरण जाऊ आता दृष्टी देईल निर्मळ ॥*

ह्या दुःखमय संसारात कामक्रोध माझ्या पाठीमागे लागले आहेत. रात्रंदिवस मी तळमळतो आहे. मी दुःखसागरात बुडालो आहे. आता मला कोण बरे ती दिव्य दृष्टी देईल?

अंधजीवाची ही विनंती सद्गुरू पर्यंत येऊन पोहोचली आणि सद्गुरूने त्यांच्या डोळयात अंजन घातले. (त्याला स्वरूपाचे ज्ञान दिले) आणि त्याचा मार्ग सुकर झाला.

*'कृष्णांजन एकवेळा डोळा घालिता अळळ ।*
*तिमिर दुःख गेले सुटले भ्रांति पडळ ।*
*श्रीगुरू निवृत्ति राजे मार्ग दाखविला सोज्वळ ।*
*बापरखुमादेवीवर विठ्ठल दिनाचा दयाळ ।*

केवळ सद्गुरूने त्यांच्यावरील भ्रांतीचे आवरण दूर करून त्याला स्वरूपाचे ज्ञान प्राप्त करून दिले. त्यामुळे त्याला विश्वव्यापक स्वरूपाचा बोध झाला आणि पारमार्थिक दृष्टीने अविद्येला किंवा अज्ञानाला दूर सारून तो डोळस बनला. त्याला ज्ञानदृष्टी मिळाली त्या ज्ञानदृष्टीने तो वाटचाल करू लागला.

**ज्ञानदेवांचा वासुदेव**

व्यापक तत्त्वज्ञानाला सुलभ करून ते समाजापुढे मांडण्यासाठी ज्ञानदेवांनी लोकभुमिकांना रूपकात्मक पद्धतीने उभे केले आहे. ज्ञानदेवांचा वासुदेव हातात टाळ-चिपळी घेऊन ह्या अज्ञानी जीवांना पहाटेच उठवायला येतो. त्यांची अज्ञानाची झोप घालवून त्यांना जागे करतो.

*घुळघुळीत वाजवी टाळ । झणझणा नाद रसाळ ।*

*उदो जाला पाहाली वेळ । उठा वाचे वदा गोपाळरे ।*

आणि जागे होऊन सावधपणाने भजन करायचा उपदेश करतात. जागे होऊन गोपाळाला स्मरले म्हणजे

*जगी जग झाले जनार्दन । उदो प्रगटला बिंबले भान रे ।*

संपूर्ण जगच जनार्दन-मय होऊन जाते आणि जेव्हा ही वासुदेवाची भूमिका अंगाअंगात भिनू लागते तेव्हा सर्वत्र अद्वैत दिसू लागते. देवो-देवीची चिपळी होते. सारे भोग आटून जातात आणि ज्ञानस्वरूपी गोविंद गाईला जातो.

*रामकृष्ण वासुदेवे । वैष्णव गाताती आवघे ।*

*दिंडी टाळ प्रेमभावे । वासुदेवो मन सामावेगा ॥*

*शांतिक्षमा दया पुरी । वासुदेवो घरोघरी ।*

*आनंदे वोसंडो अंबरी । प्रेमे डोले त्रिपुरारिगा ॥*

या रामकृष्ण वासुदेवाच्या नामस्मरणाने सारे वातावरण भारावून जाते. प्रेमभाव जोपासला जातो. भक्तीप्रेमाची अवस्था जन्मास येते आणि आनंद ओसंडून वाहू लागतो. ज्ञानदेवांचा वासुदेव हा भक्त आणि ज्ञानी आहे. 'संपूर्ण जग हेच जनार्दन आहे.' 'या भुमिकेवर येऊन हे समस्तही श्री वासुदेवो' ह्या तत्त्वाचाच तो फेरा करीत आहे.

**फुगडीचे रूपक**

ज्ञानदेवांनी फुगडी या भारूडातून जीवाला विषय वासनांपासून दूर जाण्याचा उपदेश केला आहे.

*फुगडी फुगे बाई फुगडी फू ।*

*निजब्रह्म तू गे बाई परब्रह्म तूं गे ।*

*मन चित्त धू । विषयावरी थू ।*

मनचित्त साफ करून विषयांना घालवून दिल्यावर

*एक नाम मांडी । दुजाभाव सांडी ।*

*हरि आला रंगी । सज्जनाचे संगी ।*

सर्व दूजाभाव नाहीसा होतो आणि खऱ्या हरिला आत्मसात करता येते.

*सकळ पाहे हरि । तोचि चित्ती धरी ।*

*ज्ञानदेवा गोडी । केली संसारा फुगडी ॥*

सर्वत्र हरीलाच पहाणे आणि त्यासच चित्तात साठविणे यातच खरा परमार्थ आहे. किंबहूना हेच खरे ज्ञान आहे आणि ते मिळविण्यासाठी ही अद्वैताची फुगडी घालूनच संसार सुखाचा करायचा आहे असे ज्ञानोबाराय सांगतात.

**पांगुळ आणि सौरी**

कल्पनेच्या भराऱ्या मारून मी मनाने पंगू झालो आहे. परंतु सद्गुरूच्या कृपेने हा पंगुपणा जावून मी पुन्हा खऱ्या ज्ञान मार्गाकडे वळलो.

*पांगुळा मी कल्पनेचा । पंगु जालो पै मने ।*

*वृत्ति हे हारवली । एका सद्गुरू रूपध्याने ।*

हे 'पांगुळ' ह्या भारूडांत सांगून समाजातील भेदावर आघात करून ती भेदभावना, ती द्वैतभावना दूर करण्यासाठी 'सौरी' ह्या भारूडात तळमळीने म्हणतात.

*द्वैतभावना कल्पना खोडी सांडी याची आशा ।*

*विठ्ठलनाम हेचि सार, जिव्हे प्रेमठसा ।*

*अद्वैत भरिन मन भारीना तोडीन अवपाश ।*

आणि मग ही द्वैतभावना दूर सारून विठ्ठलनामाचे सार घेतले की सर्वमय हरी दिसतो. आणि प्रत्येक घर हे आपलेच वाटू लागते.

सौरी ही स्वैरी आहे. ती मुक्त आहे. नुसतीच मुक्त नाहीतर मुक्तपणे संचार करणारी आहे. आध्यात्मिक संकल्पनेप्रमाणे ज्ञात्याने ज्ञेयाने ज्ञानाला जाणून घ्यायचे असते. म्हणजेच ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान ही त्रिपुटी परमात्म स्वरूपात रहात नाही कारण अवघे ज्ञानरूप होऊन जाते. ज्ञानदेवांची सौरी या अवस्थेला गेली आहे म्हणूनच ती सांगतेय

*ज्ञान ज्ञेय हाचि विचार सर्वमय हरि*

*मा मी सर्वमय हरि ।*

*दुजेपण न पडे दृष्टि एकपण घरोघरी ।*

सर्वमय हरि आहे याचा ती सौरी अनुभव घेत आहे म्हणूनच अवघ्या वासना सोडून पुंडलिकानी वसविलेल्या रामनामाच्या पेठेत, संतांच्या माहेर असणाऱ्या पंढरीनगरीत मुक्तपणे संचार करीत रामनामाचा टाहो फोडीत आहे. ज्ञानदेवांची सौरी सर्व विषय वासनांना त्यागून उपाधिंची बंधने झुगारून मोक्षाचा आनंद लुटण्यासाठी सौरी होऊन विवेक वैराग्याच्या बाजारात स्वैरपणे हिंडत आहे, नाचत आहे.

*वासना खोडीवेगी टाहो करीन रामनामे ।*

*मा मी टाहो करील रामनामे ।*

*पुंडलिक पेठ संताचे माहेर तिथे नाचेन मनोधर्मे ॥*

वेदांतांचे रूप सामान्यजनाला समजावे या हेतुने ज्ञानदेवांनी भारूड-रचना करून बोली भाषेत आणि बहुरूढ रुपकांमध्ये मांडून वेदांताला सोपे केले आहे. अविचाररूपी 'अंबुला', देवोदेवीची चिपळी घेऊन ज्ञानरूप सांगणारा 'वासुदेव', विकारमुक्त होऊन परमात्म्याच्या महालात स्वैरपणे संचार करणारी 'सौरी' आत्मदृष्टीने

अंधत्व आलेला 'आंधळा', अद्वैताच्या प्रांगणात घातलेली जीवाशिवाची फुगडी', अद्वैताच्याच पेठेतून आणलेले 'घोंगडे', संतुसंगाच्या आनंदात रंगलेले 'कापडी', विकारांपासून सावध रहाण्यासाठी पाच नाद आणि पांच भेदांचा वाजविलेला 'डौर' संकल्प विकल्पावर भिस्त देऊन कल्पनेने पंगु झालेला 'पांगुळ' यासारख्या अनेकविध रूपकातून ज्ञानदेवांची भारूडे प्रगटली आहेत. वेदांतांचा उपदेश सामान्यांच्या भाषेत आणि प्रचलित लोक भुमिकेमध्ये मांडून ज्ञानदेवांची भारूडे जन्माला आली आणि पुढे संत एकनाथांनी त्या भारूडाद्वारे परोपरीची रूपके मांडून खऱ्या अर्थाने जनजागरण घडविले. नाथांनी भारूडला लोकप्रियता मिळवून दिली. त्यातून मनोरंजन, उद्‌बोधन आणि प्रबोधन घडविले.

लोकशिक्षकाची भूमिका घेऊन तत्त्वज्ञानाचे हे लोकवाङ्मयीन रूप भारूडातून मांडणाऱ्या ज्ञानदेवांच्या भारूडांमुळेच पुढे नाथांची भारूडे अधिकाधिक लोकाभिमुख झाली आहेत. ते वेगळे सांगायला नको म्हणूनच मराठी भारूडांचे आद्य जनक या भुमिकेतून ज्ञानदेवांचे हे वाङ्मयीन मोठेपण विसरून चालणार नाही.

डॉ. रामचंद्र देखणे
५१३, शनिवार पेठ,
डॉ. नातू चाळ, पुणे - ३०.

*With Best Compliments From*

**MICROMAC SERVICES (I) PVT. LTD.**

Leena, 32 Sangamnagar,
Pune Satara Road,
Pune - 411 037.
Phone No. 422538

**Sales and Service
CNC Wire Cut of Sodick
Co. Ltd. Japan And
Drilling Machine of Avyac - France.**

*With Best Compliments From*

**PREMIER INRRIGATION EQUIPMENT LTD.**

*9, Sarosh Apartment,
Dr. Ambedkar Road, Camp,
Pune - 411 001.
Ph. : 647156*

*Manufacturers of
Premier Drip & Sprinkler
Products & Premier Fountains*

हार्दिक शुभेच्छा!

**मिठाई, फरसाण, दुग्धपदार्थ
या करिता सुप्रसिद्ध**

**गंगधर मिठाईवाले**

● बाजीराव रोड, नवा विष्णु चौक, पुणे - ३०.
● पेरुगेटाजवळ, सदाशिव पेठ, पुणे - ३०.
● १०२ सहकारनगर नं. १, पुणे - ९
फोन नं : ४७०७३४, ४४७२५७

# संत भागवतांचा साम्ययोग

डॉ. दि. ब. केरूर

आषाढ-कार्तिक-मराठी भक्तजनांच्या जीवनातील अतीव आनंदाचा अवधि. चंद्रभागेच्या तीरी, महायोगपीठावर पुंडलिकाच्या भेटीसाठी उभा असलेल्या विठ्ठलाच्या भजनात रंगलेले, दर्शनासाठी, उत्सुक अशा भक्त भागवताना पाहून सारा समाज संतृप्त राहतो. मराठी जनांना लाभलेले हे वरदान. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम या अवतारी संतांचे चिरंतन योगदान.

या संत महात्म्यांच्या व्यक्तिगत जीवनाची वाटचाल अतीव खडतर, सामाजिक अनुभवही कटुतर असे असूनही त्यांनी गायिलेली गीते, रचलेले ग्रंथ, प्रतिपादलेली प्रमेये, या मधून साऱ्या समाजाविषयी, साऱ्या सृष्टीविषयी त्या महात्म्यांच्या अंतरंगात असलेले सहज प्रेम, उदात्त उत्कटता, अभिव्यक्त होते. या संत साहित्याचे वाचन चिंतन चिंतकांना आनंद देते, अंतर्मुख करते, स्थिरचित्त करते, नित्य आनंददायी होते. ज्ञानदेवांच्या ज्ञानदेवीच्या प्रसादवर्षावाने सारे मराठीमन समृद्ध आणि संपन्न आहे.

**गीता-भागवत् – संतांचे आधार ग्रंथ.**

ज्ञानदेवी भगवद्गीतेचा भावार्थ प्रदीपित करते. महाराष्ट्रातील भागवत सरितेचे मूळ स्त्रोत, व्यास महर्षींच्या गीतेमधून, भागवतामधून प्रवाहित आहे. व्यासांनी वेदांची व्यवस्था लावली. वेदांचा आशय वर्णिणारा इतिहास लिहिला. पुराणांची रचना केली. महाभारत हा व्यासरचित ग्रंथ. भगवद्गीता महाभारताचा भाग. येवढे सारे करूनही व्यासांना चित्तशांति नव्हती. याचवेळी सरस्वती नदीतीरावर नारद ऋषींची भेट झाली आणि त्यांनी 'चित्तशांतीसाठी भगवंताच्या निष्कलंक यशाचे वर्णन कर'' असा उपदेश केला. यातूनच श्रीकृष्णलीलाचरित्र वर्णिणारा 'श्रीमद्भागवत' हा ग्रंथ अवतरला.

भगवद्गीतेमध्ये श्रीकृष्णांनी अर्जुनाला युद्धभूमीवर केलेला उपदेश आहे आणि अवतार समाप्तीच्या वेळी उद्धवाला केलेला उपदेश श्रीमद्भागवतात आहे. गीता आणि भागवत साऱ्या संतजनांचा अंतरंग आधारग्रंथ. ज्ञानदेवी ही गीतेची भावार्थदीपिका. नामदेव ज्ञानदेवांचे शिष्यवर. एकनाथांचे भागवत हे श्रीमद्भागवताच्या अकराव्या स्कंधाचे विवरण. नाथरचित भागवत तुकाराम महाराजांचा अभ्यासग्रंथ.

ज्ञानदेवांनी मराठी भागवत मंदिराचा पाया रचला. तुकोबा कळस झाले आणि सारे मराठी जनमन भागवत धर्माच्या आचरणाने शाश्वत आनंदात मग्न झाले.

**ज्ञान आणि परमज्ञान**

अर्जुनाला निमित्त करून श्रीकृष्णांनी कर्म, उपासना, भक्ती या मार्गांचे विवरण केले, हे सर्व मार्ग साधनरूप असून ज्ञान हे साध्य आहे. ज्ञानाने अज्ञानजन्य मोह, संभ्रम, विकल्प नाहीसे होतात. मात्र ज्ञान हे अहंकाराला कारण होण्याचे भय राहाते आणि या भयातून केवळ आत्मज्ञानाने मुक्तता होते हेही श्रीकृष्णांनी स्पष्ट केले आहे. 'ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे' हा गीता – अध्यायांचा समारोप ध्यानात घेण्यासारखा आहे.

ज्ञान, आत्मज्ञान हे भगवद्गीतेचे रहस्य, ज्ञानदेवांनी आपल्या स्वयंप्रज्ञेने, दिव्य प्रतिभेने आणि आत्मानुभूतीने या रहस्याचा विलोभनीय अन्वय केला आहे. आत्मज्ञानी पुरुषाला सारी सृष्टी, सारे विश्व' ईश्वररूपच असते. जीव हा मूलतः शिवरूपच असतो. जीवाला शिवाची ओढ सहज असते. जीवनाच्या वाटचालीत केव्हातरी शरीर आपले असले तरी आपण शरीराहून वेगळे आहोत हे जाणवते. शरीराच्या आश्रयाने तथापि शरीराहून वेगळा असणारा 'मी' त्या मीचे ज्ञान हे खरे ज्ञान. हा न दिसणारा पण असणारा 'मी' हाच ज्ञानाचा, आनंदाचा आधार. हा 'मी' साऱ्या विश्वाच्या अंतरंगात असलेल्या विश्वात्म्याचेच अभिन्नरूप होय. हे परमज्ञान गुरुकृपेने लाभले म्हणजे साऱ्या समाजाविषयी अन्तःकरणात सहज प्रेम प्रकट होते. हाच साम्ययोग, समता, प्रीति, सेवा, त्याग आणि चिरंतन आनंद हा साम्ययोगाचा साक्षात्कार असतो.

ज्ञानदेवांच्या जीवनांत या ज्ञानाचे, परमज्ञानाचे आणि साम्ययोगाचे उत्कट दर्शन होते. 'ॐ नमो जी आद्या' 'स्वसंवेद्या' या वचनाने ज्ञानदेवीचा आरंभ आहे. आणि 'विश्वात्मके देवे तोषोनि द्यावे पसायदान' या प्रार्थनेने समारोप आहे. स्वसंवेद्य आत्म्यापासून विश्वात्मक परमात्म्यापर्यंत हा चिद्विलास आहे.

**संतांची समदृष्टी**

ज्ञानदेवांचे जीवन म्हणजे साक्षात् साम्ययोगाचे जीवन. आळंदी, पैठण येथील वर्णाधिष्ठित समाज कठोरवृत्तीने वागला. असे असूनही 'भूतां परस्परे पडो । मैत्र जीवाचे' आणि 'जो जे वांछील तो तें लाहो । प्राणिजात' अशी विश्वात्मक देवाजवळ पसायदानाची मागणी केली.

नाथांच्या जीवनातही साम्ययोगाचा आविष्कार दिसतो. परमार्थ हा केवळ आत्मसुखात रमण्यासाठी नाही. लोकोद्धार हे त्याचे रहस्य आहे ही नाथांची श्रद्धा होती. पितरांच्या श्राद्धप्रसंगी

महारांना भोजनास बोलाविले. चुकलेल्या महाराचे मूल घेऊन त्याला त्याच्या आईकडे पोचविले. काशीहून रामेश्वरास चालविलेल्या गंगेच्या कावडीतील पाणी तहानेने तडफडत पडलेल्या गाढवाला पाजून हाच माझा रामेश्वर म्हणून नाथांनी कृतार्थता व्यक्त केली. यामधून समाजातील, प्राणिजगतातील अन्त्यजाविषयीची नाथांची समदृष्टी, त्यांचा साम्ययोग प्रत्ययास येतो.

तुकाराम महाराजांची जीवनयात्रा म्हणजे साम्ययोगाची गाथाच. सारा संसार अतीव कष्टाचा, वंश आणि जाति या संकटानाहि तोंड दिले. पंढरीच्या विठ्ठलभक्तीने सारा मार्ग धैर्याने आक्रमिला आणि 'अणुरणिया थोकडा' असा तुका आकाशाएवढा झाला.' जातिरीतीला तुकोबांचा विरोध नव्हता. सदाचार हे त्यांचे प्रधान लक्ष्य होते. 'जातीचा ब्राह्मण । न करिता संध्यास्नान । तो एक नावाचा ब्राह्मण । होय हीनाहूनी हीन ।' आणि सदाचार संपन्न यातिहीन हा तत्त्वतः ब्राह्मणच होय. हे तुकोबांचे प्रतिपादन ज्ञानदेवादि पूर्व संतांनी प्रतिष्ठिलेल्या मराठी भागवतमंदिराचे तुकोबा यथार्थत्वाने कळस झाले.

**वर्णाश्रम धर्म आणि समाज.**

समाजातील समता, नीति आणि भगवद्भक्ति यातील एकता, अद्वैत- हा साऱ्या संतचरित्रांचा विशेष आहे. वर्णाश्रमधर्माचे यथार्थ आचरण साऱ्यांच्या हिताचे आहे, ही संतजनांची भूमिका आणि त्याचे दायित्व ओघाने ब्राह्मणावर. 'हे ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासूनी भ्रष्टले । गुरुत्व सांडूनि आले । हे ब्राह्मणास कळेना । मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ।' असा जाब समर्थ रामदास स्पष्टपणे विचारतात । सकळ धर्मामध्ये धर्म । स्वरूपी रहाणे हा स्वधर्म । ही समर्थांची समर्थ भूमिका.

संत भागवतांचे सारे जीवन म्हणजे साम्ययोगाचे साक्षात् दर्शनच.

**श्रीकृष्णसाम्ययोगाचा साक्षात्कार-**

भगवान श्रीकृष्णाचे चरित्र म्हणजे साम्ययोगाचा साक्षात्कारच. श्रीकृष्ण यादव कुळातला राजपुत्र. जन्म कारागृहात. बालपण गोकुळात गवळ्यांच्या घरी, रानावनात गाई गुरांना राखीत गेले. छळणाऱ्या कंसमामाचा वध करण्याचा प्रसंग ओढवला. पांडवांचा सखा श्रीकृष्ण कुरुक्षेत्रात अर्जुनाचा सारथी झाला. अवतारसमाप्तीच्या वेळी त्याचा मुलगा सांब यानें श्रीकृष्ण दर्शनास आलेल्या ऋषींचा अवमान केला. ऋषींनी शाप दिला. श्रीकृष्णानी धर्मबुद्धीने शापाचा स्वीकार केला आणि एका उद्धवाला मागे ठेवून अवतार समाप्ति केली. ठेवून अवतार समाप्ति केली.

**गुणकर्म वर्णव्यवस्थेचा आधार**

ज्या वर्णव्यवस्थेमुळे ज्ञानदेवांच्या मातापित्याना देहांत परीक्षा द्यावी लागली. ती व्यवस्था आपण निर्माण केल्याचे श्रीकृष्णाचे गीतावचन आहे. ही व्यवस्था गुणकर्मावर अधिष्ठित आहे. केवळ जन्मावर नाही. असे भगवंताचे स्पष्टीकरण आहे. ब्राह्मण जातीमध्ये जन्मलेले सारेच ब्राह्मण वर्णाचे अधिकारी ठरत नाहीत. त्यासाठी संस्कार, अभ्यास, तपश्चर्या यातून ब्राह्मण गुणांचा अधिकार संपादावा लागतो. जन्म कोणत्याही जातीत असो, अभ्यासाने आपल्याला अनुकूल गुणांचे संवर्धन करता येतें रामायणाचे रचियते वाल्मीकि ब्राह्मण नव्हते. व्यासमहर्षीही मत्स्यगंधेचे पुत्र होते.

प्रेम, भक्ती, ज्ञान आणि योग ही साधने सर्वांना मुक्तपणे उपलब्ध आहेत. 'स्वधर्मे निधन श्रेयः' असे सांगणारे भगवान श्रीकृष्ण 'सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरण व्रज' असे सांगतात. 'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशे तिष्ठति तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत' हा श्रीकृष्णांचा गीतासंदेश आहे. या संदेशाचे स्मरण देणारी ज्ञानदेवांची ज्ञानदेवी, नाथांचे श्रीमद्भागवत, नामदेव, तुकोबा आदि संत महात्म्यांची अभंगवचने साम्ययोगाचे नित्य स्मरण देतात. साऱ्या जीवनाला शिवरूप देणारा हा साम्ययोग. पुंडलिकाच्या भेटीसाठी द्वारकेहून आलेला भगवान श्रीकृष्ण पंढरी येथे उभा आहे. या विठ्ठलाचे स्मरण देणारें. आद्यशंकराचार्यरचित पांडुरंगाष्टक सुपरिचित आहे. विठ्ठलाचे भजन, विठ्ठलाचे दर्शन, विठ्ठलाची एकरूपता हीच वारकऱ्यांच्या जीवनाची फलश्रुती. ही परमावस्था प्रत्येक प्राणिमात्राला प्राप्त करता येते. अशी साऱ्या संत भागवतांची धारणा.

आत्मज्ञानाचा मोक्षाचा मार्ग, सर्वांना मुक्त आहे. कोणीही श्रेष्ठ नाही वा कनिष्ठ नाही. सारे मिळून भगवद्भजन करीत पंढरीच्या परब्रह्माच्या दर्शनास जातात. हे समतेचं, बंधुत्वाचं, स्वत्वाचं दर्शन ही अनुभूति. हा संत भागवताचा प्रसाद.

डॉ. दि. ब. केरूर
गणंजय सोसायटी,
कोथरूड, पुणे.



# एक मूलभूत निसर्गनियम : क्रिया व प्रतिक्रिया यांचे संतुलन

केशवचंद्र गंगाधर भडभडे

इमर्सन हा इंग्रज तत्त्वज्ञानी म्हणतो : 'प्रत्येक कृत्याबरोबर त्याचा परिणाम बांधलेलाच असतो. त्यातला काही भाग दृश्य असतो व काही अदृश्य असतो, पण त्यात काही फरक नाही. एकाला आपण कारण म्हणतो व दुसऱ्याला कार्य किंवा परिणाम म्हणतो. पण वास्तविक दोन्ही मिळून एकच असते. एकाच नाण्याच्या त्या दोन बाजू असतात. भगवान बुद्ध म्हणतात, कार्य व कारण वेगळे करताच येत नाहीत, जसे ढोल व त्याचा आवाज. ढोल वाजवला की आवाज होतो, गुडुऽऽम.'

**कर्मनियमाचे तीन उपनियम**

आधुनिक विज्ञानाचे अध्ययन करणाराला निसर्ग नियमबद्ध आहे हे समजते. क्रियेला तितक्याच शक्तीची पण उलट दिशेची प्रतिक्रिया होते. या कर्माच्या नियमाला तीन उपनियम आहेत.

१) विचारशक्ती शीलाची बांधणी करते. जसा विचार करावा, चांगला किंवा वाईट, तसे आपण बनतो.

२) इच्छा व निर्धारशक्ती ही एकाच शक्तीची दोन टोके आहेत. इच्छा तुमची इच्छित वस्तू, माणूस, आदी तुमच्याकडे खेचून आणते किंवा तुम्हाला त्या ठिकाणी पोचवते, जिथे त्या इच्छेची पूर्ती होऊ शकेल.

३) आपल्या आचरणाच्या परिणामस्वरूप-ज्यामुळे इतरांना सुख किंवा दुःख होते- आपल्याकडे सुख किंवा दुःख येते. आपल्याला जर हे तीन उपनियम नीट समजले व ते कसे वापरायचे याची जाण आली, तर आपण आपल्या भविष्याचे स्वामी होतो.

**परिणाम व हेतू**

आपल्या आचरणाचे, विचाराचे किंवा इच्छेचे दोन पैलू आहेत. एक त्याचा परिणाम व दुसरा त्यामागचा हेतू. आपला हेतू चांगला असूनसुद्धा परिणाम विपरीत व दुःखद झाला तर चांगल्या हेतूचे चांगले फळ म्हणून चांगला स्वभाव मिळेल; पण दुःखद परिणामामुळे ते दुःख प्रतिक्रिया रूपाने आपल्याकडे परत येईल. आपण एखाद्या माणसाला मारले व तो जायबंदी झाला किंवा कान बहिरा झाला, तर ज्या प्रमाणात त्याला दुखापत झाली त्या प्रमाणात आपल्याला इजा होईल. आपण एखाद्याच्या मृत्यूला कारणीभूत झालो, हरिजनाची झोपडी पेटवून दिली, त्यात त्याची चीजवस्तू व बालक जळून मेले, तर आपल्याला पुढच्या जन्मी त्याचा जीव वाचवून किंवा आपला जीव गमावून त्याची भरपाई करावी लागेल किंवा तो आपला जीव घेईल. कर्माचा हा नियम संतुलनाचा नियम आहे, पण परिणाम दिसायला कदाचित् पुढचा किंवा त्याच्या पुढचा जन्म उगवेल किंवा लवकरही दिसेल. आपल्या विचारामुळे, इच्छेमुळे किंवा कृत्यामुळे आपण जे असंतुलन निर्माण करू ते त्याच्या हातून मारले जाऊन, किंवा त्याला वाचवताना प्राण अर्पण करून, ते संतुलन परत स्थापन होईल.

**निसर्गनियम : एक अनुक्रम**

निसर्गनियम एक अनुक्रम सांगतो. अमुक कार्य घडले तर त्याचा तमुक परिणाम होणार. अमुक क्रियेची तमुक प्रतिक्रिया होणार, एवढेच तो नियम सांगतो. निसर्गनियम आज्ञा करीत नाही. सत्य बोल, प्रामाणिकपणे वाग, हिंसा करू नकोस, दुसऱ्याच्या धनाची अभिलाषा धरू नकोस अशी आज्ञा किंवा सल्ला कर्मनियम देत नाही. असत्य बोलल्याने, अप्रामाणिकपणे वागण्याने, हिंसा केल्याने किंवा परधनाची अभिलाषा केल्याने काय परिणाम होईल एवढेच तो नियम सांगतो. नियम नीट समजल्यावर काय करायचे हे ठरवायला आपण स्वतंत्र आहोत. अमुकच करण्याचे बंधन आपल्यावर नाही. तराजूच्या एका पारड्यात आपण वजन ठेवतो व दुसऱ्यात वजन करायची वस्तू ठेवतो. दोन्ही पारडी समतोल होईपर्यंत वस्तू ठेवत जातो. वस्तू जास्त झाल्यास तेवढी आपण काढून घेतो. त्याचप्रमाणे आपल्या दुष्कृत्यांनी एक पारडे जड झाले तर दोन्ही पारडी समतोल होईपर्यंत दुसऱ्या पारड्यात सत्कृत्ये घालायला हवीत. दोहोंपैकी काहीतरी करून संतुलन परत आणणे आवश्यक आहे. दुष्कृत्ये कमी करून किंवा सत्कृत्ये वाढवून संतुलन आणता येईल.

**आपल्या भविष्याचे स्वामी**

कर्मनियमाचे वरील तीन उपनियम समजून घेणे आवश्यक आहे. १) पहिला उपनियम आहे विचारशक्तीने स्वभाव बनतो. सतत चांगले विचार करीत राहिल्याने सुस्वभाव बनतो. सच्छील होते. सतत वाईट विचार करत राहिल्याने दुष्ट स्वभाव, दुश्शील बनते. २) दुसरा उपनियम आहे, इच्छेच्या शक्तीने ज्या वस्तू, गुण,

मनुष्याची आपण अभिलाषा करतो ती वस्तु, गुण, मनुष्य आपल्याकडे ओढला जातो किंवा ज्या ठिकाणी इच्छापूर्ती होऊ शकेल त्या ठिकाणाकडे आपण ओढले जाऊ. ३) तिसरा उपनियम आहे– आपल्या वर्तनाचा, विचाराचा, इच्छेचा, चांगला वाईट परिणाम दुसऱ्यावर होईल, तो आपल्याकडे प्रतिक्रिया रूपाने येईल. या तिन्ही उपनियमांच्या सम्यक् ज्ञानाने व योग्य उपयोगाने आपण आपल्या भविष्याचे स्वामी व भाग्याचे शिल्पकार होऊ. आता हे उपनियम कसे कार्यान्वित होतात ते पाहू या.

**विचारांनी शील बनते**

याची सत्यता भूतकाळाच्या साक्षीने सिद्ध करता येईल. कारण याबद्दल जगातले आध्यात्मिक ग्रंथ अधिकारवाणीने बोलतात, पण इतकीच स्वानुभवाची साक्ष महत्त्वाची आहे कारण ती प्रत्यक्ष आहे व निरंतर सोबत करू शकते. श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ गीता १७.३ मनुष्य विचारांनी घडतो. श्रद्धेने घडतो. ज्याची जशी श्रद्धा तसा तो होतो. प्राचीन इस्त्राइलचा राजा सालोमन म्हणतो, "मनुष्य जसा विचार करतो तसा तो आहे. हा जर निसर्गाचा नियम असेल, तर त्याची सत्यता आपल्याला पडताळून पाहता येईल. व्यक्तिगत रूपाने आपण त्याचे खरेपण सिद्ध करू शकतो. विचाराने चारित्र्य कसे घडते? प्रयोग करून पाहू या. प्रयोग साधा आहे व काही महिन्यांत आपल्याला त्याची प्रचीती येईल. पण यासाठी सातत्याने प्रयत्नशील राहिले पाहिजे. आपण चिडखोर असलो तर चिडखोरपणा हा दुर्गण आपल्याला काढून टाकायचा आहे. एकदा तो आपल्यात आहे असे ठरल्यावर त्याचा पुन्हा विचार करायचा नाही. कारण चिडखोरपणाचा विचार करण्याने तो दुर्गुण वाढतो, कमी होत नाही. आपल्या विचाराने त्याला शक्ती प्राप्त होते. म्हणून याच्या विरुद्ध सद्गुण शांती आहे. त्याचा विचार करायचा. रोज सकाळी उठल्यावर स्नान केल्यावर स्वस्थ बसून 'शांती' वर पाच मिनिटे विचार करायचा. एक दिवस करून एक दिवस विसरल्यास पुढे टाकलेले पाऊल थोडे मागे येते. अनियमितपणाने विणलेला धागा उलगडला जातो. म्हणून प्रारंभी सातत्य व नियमितपणा टिकवायला हवा. अनियमितपणाने फारच थोडी प्रगती होऊ शकेल व त्यामुळे उत्साह वाढणार नाही. हा एक वैज्ञानिक प्रयोग आहे. रोज शांतीच्या वेगवेगळ्या नवीन पैलूंवर विचार करावा किंवा त्याच पैलूवर आवश्यक तर अनेक दिवस विचार करावा. विचार शांतीवर केंद्रित ठेवायचा. एखाद्या महिन्याने ध्यानात येईल, की शान्तीचा विचार दिवसभरात आपल्याआपण मनात येईल. याचा अर्थ सकाळचा शांतीचा विचार पल्लवित व्हायला लागला. असा विचार करायचा की आपण शान्तीची साक्षात मूर्ती आहोत व पूर्ण शान्त आहोत. आपली शान्ती कशानेही ढळत नाही.

यानंतर आपण दुसरा एक दुर्गुण घेऊ. अपयशानंतर आपण सहज निराश होतो. त्याविरुद्ध सद्गुण, आनंदीपणा, आशावादीपणा. आपण असा विचार करायचा की कसेही, कितीही अपयश आले तरी आपण आशावादीच राहणार. यानंतर आपण रोज सकाळी पाच मिनिटे आशावादावर व आनंदी वृत्तीवर ध्यान करायचे. आशावादावर सर्व बाजूंनी विचार करायचा. अपयश आल्यावरसुद्धा आपण आशावादी व आनंदी आहोत असे आपले चित्र रंगवायचे. चेहऱ्यावर आनंद आहे अशी मूर्ती मनात तयार करायची व रोज ती मूर्ती व ते चित्र विचारांनी सबल, सशक्त करीत राहायचे. मग पहिल्याप्रमाणेच आशावाद व आनंद याचा विचार दिवसात आपोआपच मनात येऊ लागेल व आपला विचार फलद्रूप व्हायला लागला आहे असे कळेल. यानंतर एखादी गोष्ट बिनसली की सवयीने आपण कच खाऊ व मग ध्यानात येईल की आपण आशावादी व आनंदी राहायचे ठरवले आहे. सकाळी पाच मिनिटे याच विषयावर विचार करायचा व तो अनुभवायचा हा क्रम चालूच ठेवावया. मग निराशेची भावना उत्पन्न होत असताना आपली आशावादी मूर्ती समोर येईल व त्या दोन्हीत संघर्ष होईल व एकाचा जय होईल. पुढे काही दिवसांनी आपण कच खाणार एवढ्यात आपली आनंदी मूर्ती प्रकटेल व आपण निराशेवर मात करू.

एकदम अनेक दोष व दुर्गुण काढून टाकायचा प्रयत्न करायचा नाही. एका गोष्टीने हे स्पष्ट होईल. एका शेतकऱ्याच्या आवारात २० डुकराची पिल्ले शिरली. त्याने नोकराला ती पकडून बाहेर हाकलून द्यायला सांगितले. नोकराने एक पिल्लू त्याची शेपटी पकडून त्याला फरपटत पकडले. दुसरे पिल्लू मुश्किलीने पकडले. मग दोघांना फरपटत तो तिसऱ्याच्या मागे लागला. असे वीस पकडणे अशक्यच होते. मग त्याला सांगितले की एकाला पकडून त्याला अडकवून ठेवायचे व असे एकेक करून सगळी पकडायची व हाकलून द्यायची. याचप्रमाणे एकेक दुर्गुण जिंकून खात्री झाल्यावर दुसऱ्या दुर्गुणामागे लागायचे.

**आपल्या स्वभावात बाणवायच्या सद्गुणांची एक यादी :**

सहानुभूती, सर्वांशी सुसंवाद, दया, क्षमा, शांती, नम्रता, सत्य बोलणे, धैर्य, समत्व, चिकाटी, शुद्धी, पवित्रता, भक्ती, स्नेह, प्रेम, प्रीती, न्यायीपणा, प्रामाणिकपणा, रास्तपणा, स्वाभिमान, आनंद, वात्सल्य, कृतज्ञता, सहकार्य, सहिष्णुता, स्थिरता, मितभाषण, सद्भावना, सद्विचार, मधुरभाषण इत्यादी. यांची यादी वाढवता व कमी करता येते आपल्या गरजेनुसार.

दुर्गुणांना स्वतंत्र अस्तित्व नसते. सद्गुणाचा अभाव म्हणजे दुर्गुण. म्हणजे सद्गुणाच्या रिकाम्या जागी दुर्गुण तयार होतो. सद्गुण स्वभावात बाणवला म्हणजे त्याच्या विरुद्धचा दुर्गुण आपोआप निर्मूळ होतो. दृढनिश्चय करून तो तडीला न्यायचा.

प्रयत्न चिकाटीनं व नियमितपणे चालू ठेवला म्हणजे काही वर्षांत आपण प्रगती केली असे ध्यानात येईल. आपण जास्त संयमी, आनंदी व निश्चयी होत आहोत असे आढळेल. त्यात लोक आपल्याला अडथळा करतील किंवा सहकार्य देतील हे आपण त्यांना दिलेल्या सहकार्यावर किंवा अडवणुकीवर अवलंबून राहील. ईश्वर त्याच्या योजनेनुसार या जगाची उत्पत्ती, स्थिती व लय करतो व त्यात नेहमी सुधारणा करीत असतो. इंग्रजी म्हण आहे, 'देअर इज नो एंड टु एफिशियन्सी', कौशल्याला मर्यादा नाहीत.

**इच्छा : संचालक शक्ती**

इच्छा इच्छा करणाराला इच्छित वस्तूकडे ओढून नेते. सर्व विश्वात इच्छा ही एकच संचालक शक्ती आहे. सर्वत्र ही आकर्षण रूपाने प्रतीत होते. रासायनिक आकर्षण-विकर्षणात ती आहे. चुंबकीय आकर्षण- विकर्षण, विद्युत शक्तीमुळे आकर्षण-विकर्षण, पाण्याच्या थेंबामधले आकर्षण, पाणी व इतर पदार्थांतले आकर्षण. ही निसर्गातली द्विमुखी शक्ती आहे. जोपर्यंत हे आकर्षण बाह्य वस्तूमुळे उत्पन्न होते तेव्हा त्याला इच्छा म्हणतात. स्वयंस्फूर्त, बाह्य वस्तूमुळे नसलेले आकर्षण, निश्चयशक्ती, निर्धार(विल) असते. दुर्बल मन व सामर्थ्यसंपन्न मन यामधला फरक बाह्याकर्षण व अंतःस्फूर्त शक्तीमुळे असतो. या सगळ्याचे कारण सर्वात एक दैवी जीवन व्याप्त असते. बाह्य आकारामुळे विलगता येते, पण अंतःस्थ जीवन आपले एकत्व पुनःस्थापन करायच्या प्रयत्नात असते. ज्या ज्याबद्दल तीव्र आकर्षण वाटते ते ते जवळ ओढले जाते.

परदेशगमनाची तीव्र इच्छा असल्यास केव्हातरी तशी संधी प्राप्त होते. त्याप्रमाणे इच्छेमुळे संधी उपलब्ध होते हा दुसरा उपनियम. यात एक धोक्याची सूचना अशी की, सुयोग्य गोष्टीबद्दलच अभिलाषा धरायला हवी व तीसुद्धा एका मर्यादेतच. उदाहरणार्थ, धनसंपत्तीची अभिलाषा. पुष्कळदा ही अभिलाषा अनावर होते व अमाप संचित धनामुळे त्याबद्दल अनिच्छा निर्माण होते. हा अर्थातच एक शुभ परिणामच. त्यामुळे हळूहळू त्याबद्दल वैराग्य उत्पन्न होते. असा धनिक मोठाल्या देणग्या चांगल्या व लोकोपयोगी कार्यासाठी देतो. एखादा विश्वस्तनिधी स्थापन करतो व त्यातून समाजाचे कल्याण होते. यामधेच उत्क्रांतीचे गुह्य निहित आहे. खेळण्याच्या आकर्षकतेमुळे मुल ते खेळणे घेण्यासाठी प्रयत्न करते व पुढे सरकायला, चालायला, पळायला शिकते, सशक्त होते. ही खेळणी हळूहळू आनाकर्षक वाटू लागतात, पण त्यामुळे आलेली प्रयत्नशीलता स्थायी होते. फार लवकर व अकाली आलेली अपरिपक्व निरिच्छता प्रयत्नशीलतेला म्हणजे उत्क्रांतीला मारक ठरू शकते. अजून अंतःस्फूर्त निर्धारशक्तीचे जागरण झालेले नसते व अकाली आलेले वैराग्य काही काळाने विरून जाते. असे अनेकदा होते व विवेकाने आलेले परिपक्व वैराग्य उदयाला येते. प्रत्येक वस्तू, व्यक्ती, प्रसंग यांचे उचित मूल्यांकन झाल्यामुळे त्या वस्तू, व्यक्ती, प्रसंग यांचे अवास्तव आकर्षण नाहीसे होते व त्यामुळे त्याबद्दलची वाजवीपेक्षा जास्त ओढ कमी होते. हे वैराग्य खरे व टिकाऊ असते. आत्म्याच्या उपलब्धीखेरीज बाकी सर्व उपलब्धीबद्दलचे आकर्षण विलीन होते.

प्रसिद्ध इंग्रज कवी जॉर्ज हर्बर्ट याच्या एका कवितेचा सारांश असा 'ईश्वराने मनुष्याची निर्मिती केली, तेव्हा त्याच्याजवळ पुष्कळशा सुंदर देणग्या होत्या. एकेक करून त्या मनुष्याला दिल्या गेल्या व शेवटी 'शांती' शिल्लक राहिली, तेव्हा ईश्वर थांबला. तो म्हणाला की, ही माणसाला देऊ नये कारण मग तो मलाच विसरून जाईल. तो अशांत राहिला म्हणजे त्याला माझी आठवण येईल व दोघांचाही फायदा होईल.'

ईश्वराशिवाय सर्वच अनित्य व नाशवंत आहे. मनुष्य अनेक गोष्टींचा अनुभव घेतो व त्यातल्या बऱ्याच व्यर्थ आहेत असे त्याला प्रतीत होते. त्या सर्वांपासून चिरंतन शांती व आनंद यांची प्राप्ती होत नाही असे पटल्यानंतरच तो शांतिपथावर अग्रेसर होतो.

आपण दुसऱ्यांना सुख किंवा दुःख देतो त्याप्रमाणे आपल्याला सुख किंवा दुःख प्राप्त होते. आपल्या विचारांचा, भावनांचा व कृत्यांचा दुसऱ्यावर जो परिणाम होईल त्याप्रमाणे त्यांची प्रतिक्रिया आपल्यावर होईल. हा नियम जीवनाच्या एका पैलूचे वर्णन करतो. एखादा मनुष्य ऐषआरामात लोळत असतो, पण त्याचे शील चांगले नसते. मग त्याला इतका ऐषाराम कसा मिळाला, असे आपल्याला वाटते. तो अत्यंत स्वार्थी, आपमतलबी व तिरस्करणीय आहे. सत्‌शीलामुळे संपत्ती मिळत नाही. कारण शीलाचा व संपत्तीचा संबंध नसतो. एक श्रीमंत मनुष्य एखादे परोपकाराचे काम करतो. आपल्या नगराला एक उद्यान देतो किंवा रुग्णालय बांधायला लाखो रुपये देतो. त्याला गरिबांची कणव आहे किंवा रुग्णांबद्दल सहानुभूती आहे म्हणून नव्हे, तर त्याचे नाव, त्याच्या नातेवाईकाचे नाव त्या उद्यानाला किंवा रुग्णालयाला द्यावे व दानशूर म्हणून ख्याती व्हावी एवढ्यासाठी. प्रत्यक्षात हजारो गरीब रुग्णांना आजारीपणात सुविधा उपलब्ध होईल किंवा थकल्याभागल्यावेळी गरिबांना आराम व करमणूक मिळेल. याची प्रतिक्रियास्वरूप त्याला आरामदायक परिस्थिती मिळेल. आजारीपणात चांगली शुश्रूषा होईल. पण त्याने हे स्वार्थी भावनेने, काही अपेक्षेने केले आहे, शुद्ध परोपकारासाठी नव्हे. त्यामुळे भावी जीवनात किंवा पुढच्या जन्मी स्वार्थी स्वभाव मिळेल. म्हणजे खऱ्या निर्मळ आनंदाचा अभावच. त्याने विचार, भावना व कृत्य या पातळीवर जे पेरले ते त्या पातळीवरच मिळेल. हे विसंगत वाटते का? नाही. हे कार्याच्या नियमाचे यथायोग्य फलित आहे. यात काही विसरले किंवा वगळले जात नाही. यात दिसणारा विरोधाभास आभासात्मकच आहे.

या तीन उपनियमांचा सांगोपांग विचार व शहाणपणाने उपयोग केला तर आपले उज्ज्वल भविष्य आपण निर्माण करू शकू, हे आपल्याला समजते. विचाराने शील बनते; इच्छेमुळे संधी मिळते; पार्थिव, भावनिक व मानसिक सुख दुसऱ्यांना दिल्यामुळे आपल्याला पार्थिव, भावनिक व मानसिक सुख मिळते. आता हे तीन उपनियम आणखी जास्त चांगले समजून घ्यायचा प्रयत्न करू या. या सगळ्या एकमेकांत गुंतलेल्या इच्छा, विचार व कृत्ये यामुळे जीवनाचे एक गुंतागुंतीचे वस्त्र विणले जाते. आपल्याला समजून घ्यायचे आहे की, भूतकाळचे गुंतागुंतीचे जीवन आपल्या आजच्या जीवनात कसे प्रकट होते? हे नियम सध्याचे जीवन जास्त शहाणपणाने जगायला कसे सहाय्यक होतात?

नियमांचे तुटपुंजे अर्धवट ज्ञान पुष्कळदा धोकादायक ठरू शकते. आपला गैरसमज होईल की हे पूर्व कर्माचे फळ अटळच आहे. आता त्यात सुधारणा कशी होणार? नियम आज्ञा करीत नाहीत. हे कर, ते करू नकोस असा सल्ला देत नाहीत. ते केवळ काय केले म्हणजे त्याचा काय परिणाम होईल एवढेच सांगतात. पीनल कोडचे नियम पुन्हा करू नकोस असा सल्ला देत नाहीत तर कोणता गुन्हा केला तर काय शिक्षा होईल, किती होईल एवढेच सांगतात.

**प्रयत्न व नियती**

महाभारतात युधिष्ठिर शरपंजरी पडलेल्या भीष्माचार्यांना - जे धर्माचार्य आहेत, –विचारतो की प्रयत्न श्रेष्ठ की नियती श्रेष्ठ? विचार, इच्छा, आकांक्षा व कार्यांच्या धाग्यादोऱ्याने विणलेला कर्माचा मजबूत दोरखंड कसा बनतो याची दीर्घ चर्चा केल्यावर भीष्माचार्य शेवटी सांगतात की नियतीपेक्षा प्रयत्न श्रेष्ठ. हे खरे कशावरून? भूतकाळातल्या अनेक जन्मात निर्माण झालेल्या कारणांच्या संभाराला या जन्मात तोंड देत असताना प्रयत्न कसा श्रेष्ठ ठरतो, हे समजण्यासाठी आपण एक दिवसाचा आढावा घेऊ या. रात्री झोपण्यापूर्वी सकाळपासून रात्रीपर्यंतच्या विचार, भावना, इच्छा, कृती यांचे अवलोकन केल्यावर आढळेल की, त्यात काही बरे, काही वाईट, काही निरर्थक, काही मिश्रित. या सगळ्यांच्या बेरीज- वजाबाकीनंतर एकूण परिणाम अगदी थोडा दिसेल. काही उदात्त, काही साधारण, काही नीच. आपली काही कामे दुसऱ्यांना सुखवणारी किंवा दुखवणारी. एकूण त्यात एकसूत्रीपणा नाही. याचप्रमाणे सबंध जीवनाचा आढावा घेतला तरी त्यात काही चांगल्या व काही वाईट.

एखाद्या माणसाने नेहमी वाईटच विचार केले, तर त्याचे शील वाईट होईल. त्याला स्वतःमध्ये सुधारणा करायला चिकाटीने आपल्या स्वभावाविरूद्ध चांगले विचार, चांगल्या भावना व चांगली कामे करण्याचा सतत प्रयत्न केला पाहिजे, तरच त्याचा चांगला परिणाम होईल. चांगल्या वाईट दोन्ही प्रवृत्तींचे संतुलन एकदा या बाजूला तर एकदा त्या बाजूला झुकेल. म्हणून भीष्माचार्यांनी निर्णय दिला की, दैवापेक्षा प्रयत्न श्रेष्ठ. त्यांनी श्रोत्यांना प्रयत्नवादाकडे वळवण्याचा प्रयत्न केला; म्हणजे भूतकाळाच्या कर्माच्या विरूद्ध प्रयत्नांनी पारडे चांगल्याकडे झुकवण्याचा प्रयत्न होऊ शकेल.

काही वेळा भूतकाळातले कर्म इतके एकांगी असते की, सध्याच्या पराकाष्ठेच्या प्रयत्नांनी त्यात बदल करायला फारसा वाव नसतो. पण कर्माचा नियम नीट समजल्यास आपल्याला आटोकाट प्रयत्न करायला धैर्य येईल. जरी पारडे चांगल्या बाजूला झुकू शकले नाही, तरी वाईट बाजूचा जोर पुष्कळच कमी होईल व पुढच्या जन्मी तरी आपण यशस्वी होऊ. उदाहरणार्थ एका मनुष्याने सतत दुसऱ्यांच्या वस्तूंची अभिलाषा केली तर पुढच्या काळात चोरीकडे त्याची प्रवृत्ती होईल. पण कर्मनियमांची चांगली माहिती झाल्यावर या दुष्प्रवृत्तीचा विरोध करण्याला आवश्यक मनोभूमिका तयार होईल व सफलता शक्य कोटीत येईल.

**एक गैरसमज**

कर्मनियमाबद्दल आणखी एक गैरसमज. एखादा मनुष्य अडचणीत असला, तर ते त्याच्या दुष्कर्माचे फळ आहे. मी त्याला मदत कशी करणार? आपल्या आसपास अशी अनेक माणसे असतात, पण ज्या अर्थी हीच गोष्ट आपल्या निदर्शनाला आली. त्या अर्थी कर्मदेवांची, मी त्याला मदत करावी अशीच अपेक्षा असणार. कदाचित् त्याचे दुष्कर्म संपलेले असेल व माझ्या वेळीच मदतीने त्याचे सुदैव उघडेल. अशा वेळी मदत केली नाही, तर आपल्या निष्क्रियतेची प्रतिक्रिया म्हणून, ज्या वेळी आपल्यावर असाच प्रसंग येईल त्या वेळी आपल्यालाही मदतीचे दार बंद होईल. न्याय देण्याचा अधिकार ईश्वराचा व कर्मदेवांचा आहे व तेच योग्य न्याय देऊ शकतात. म्हणून आपण ईश्वरी प्रेम व करुणा यांचे दूत होऊन दुःखितांना त्यांच्या दुःखात दिलासा द्यायचा प्रयत्न केला पाहिजे. जर ईश्वरी न्यायानेच त्यांच्या दुष्कर्माची प्रतिक्रिया म्हणून त्यांच्यावर दुःखभार आलेला असेल तर आपण कितीही प्रयत्न केले तरी ते दुःख आपण थांबवू शकणार नाही, पण आपल्याला ईश्वरी इच्छा काय आहे हे माहीत नसल्यामुळे आपण दुःखनिवारणाचे आपले प्रयत्न सोडून देता कामा नये. पाषाणहृदय, स्वार्थांधता आत्मकेंद्रितता यामुळे कर्मनियमांचा चुकीचा अर्थ लावून आपण मदत थांबवू नये. कर्माच्या नियमांचे ज्ञान अपूर्ण व अर्धवट असू शकते. कर्माचा योग्य दृष्टिकोन अंगिकारल्यास जीवनाकडे पाहण्याची दृष्टी ही योग्यच होईल. मग आपण आपल्या अडचणींबद्दल तक्रार करणार नाही, कारण त्यांच्या न्याय्यतेबद्दल आपली खात्री असेल. शास्त्रज्ञाचा प्रयोग अयशस्वी झाल्यास तो आपली चूक शोधून दुरुस्त करील व सफल होईल. नियमच चुकले,

असे तो मानणार नाही.

आपल्या अडचणींचे नेमके कारण कदाचित् आपल्याला समजणार नाही, पण त्यांना योग्य कारण आहे ही आपली खात्री असेल व आपल्यावर अन्याय होत नाही हे समजेल. मग त्या अडचणीला धैर्याने तोंड देऊन ते कर्म भोगून संपवू. त्याचप्रमाणे आपल्या कोणत्या चुकीमुळे हा प्रसंग आला हे शोधून पुन्हा चूक होणार नाही अशी काळजी घेऊ. एका इंग्रजाला वाटले की कर्माचा नियम जटिल आहे व साधारण मनुष्याला त्याचे आकलन होणार नाही. पण त्याचा भारतीय मित्र म्हणाला, "त्या समोरच्या मजुराला विचारून तर पाहा." मजूर म्हणाला, "तुम्ही सुस्थितीत आहात, कारण गेल्या जन्मात तुम्ही ती मिळवली आहे, पण या जन्मी दुष्कर्म केल्यास पुढच्या जन्मी तुम्हीही दुःखी व्हाल. गतजन्मात चुकीच्या कृत्यामुळे माझी या जन्मी दुर्दशा झाली, पण या जन्मी मी चांगली वर्तणूक करतो आहे व पुढच्या जन्मात मलाही सुस्थिती येईल." अपूर्ण ज्ञानाने व कर्मनियमाबद्दलच्या गैरसमजुतीमुळे आपण चुकीच्या मार्गाने जाऊ शकतो, पण ज्ञानात भर घालून व गैरसमज दूर करून योग्य मार्गावर अग्रेसर होणे शक्य होईल.

पुष्कळदा आपल्या आवडीनिवडी व इच्छा योग्य नसल्या, तर त्यांच्याबद्दल नावड व चांगल्या पण नावडत्या इच्छा व निवडीबद्दल आवड, कशी उत्पन्न करायची?

**इच्छेवर विचाराने नियंत्रण :**

इच्छेवर इच्छेने नियंत्रण किंवा त्यामध्ये परिवर्तन होऊ शकत नाही, पण विचाराने हे परिवर्तन करणे शक्य असते. प्रत्येक क्रियेमध्ये तीन भाग असतात, इच्छा, विचार व कृती. आपल्याला असे आढळेल की, आपल्या काही इच्छापूर्तीमुळे परिणाम वाईट होतात. काही शारीरिक क्रियांचे परिणाम अवांछनीय होतात. खादाडपणा, शारीरिक सुख, अपेयपान, धूम्रपान, गर्द आदींवर सदिच्छेने व सद्निश्चयामुळे नियंत्रण होत नाही. पण त्यांच्या आहारी जाण्याने आपल्याला त्याचे दुष्परिणाम भोगावे लागतात. हे ध्यानात आल्यावर विचाराने या दुष्परिणामांचे व त्यापासून होणाऱ्या अडचणींचे थोडेसे भडक चित्र रंगवून ते नेहमी आपल्या मनःचक्षुपुढे ठेवायचे. यामुळे हळूहळू त्याच्याबद्दल नावड उत्पन्न व्हायला लागेल. असा काही काळ गेल्यावर त्याबद्दलची इच्छा कमजोर होईल. त्याबद्दलचे आकर्षण कमी होईल व मग आपल्याला या गोष्टी थांबवता येतील.

**बोध कसे काढायचे**

आपल्या जीवनाकडे दृष्टिक्षेप टाकल्यास कोणत्या इच्छा व भुका दुःखाचे कारण होतात हे समजेल. समजा खादाडपणा आपल्या स्वभावात आहे. आपल्याला चांगलेचुंगले पदार्थ खायला आवडतात व आपण ते प्रमाणाबाहेर खातो. खाताना नाही, पण नंतर शांत वेळी विचार करायचा की, मी असाच खात राहिलो तर काय परिणाम होईल? मी लठ्ठ होईन, पचन बिघडेल, पोटाचे आजार होतील. म्हणून खादाडपणाला वेळीच आळा घातला पाहिजे. मग या विचाराच्या पुनरावृत्तीमुळे हळूहळू खाण्याच्या वेळी जिभेवर नियंत्रण यायला लागेल.

वर म्हटल्याप्रमाणे दुष्परिणामांचे भडक चित्र नेहमी मनःचक्षूंसमोर आल्याने खादाडपणाबद्दल भीती व नावड उत्पन्न होईल व हळूहळू आपण या जिभेच्या गुलामगिरीतून मुक्त होऊ अशा समजून उमजून जाणीवपूर्वक जिभेच्या विचाराच्या उपयोगाने आपण एक एक करून आपल्या दोषांवर मात करू शकू. चमचमीत खाद्यांवर पैसा खर्च करण्याऐवजी चांगल्या आध्यात्मिक प्रेरणा देणाऱ्या वाङ्मयावर खर्च करता येईल. घशाखाली उतरल्यावर खाद्याची मौज संपते, पण ग्रंथांची सोबत आपल्याला फार काळपर्यंत होऊ शकेल. हळूहळू आपण विचारी बनू व भावनावशता कमी होईल. सद्भावनांची साथ आपल्याला नेहमीच हवी. मनुष्य, मानव, मन म्हणजे विचार करणे यापासून आला. मनन, निदिध्यासन या पायऱ्या चढून जाण्यासाठी प्रथम श्रवण- वाचन यांनी मननासाठी सामग्री जमवायला हवी. आपले आचरण निसर्गनियमांना धरून असायला हवे व त्यासाठी निसर्गनियम नीट समजून घ्यायला पाहिजेत. याप्रमाणे इच्छा, विचार, कृती यांचा विचार केला. जीवनात येणाऱ्या अडचणींबद्दल तक्रार व असमाधानाला जागा न देता आपल्याला काय साधायचे आहे, याचा स्पष्ट विचार करून ते साधण्यासाठी आवश्यक ते कार्य करायचे. अडचणीमागची कारणपरंपरा नीट समजून घेऊन ती बदलायचा किंवा तिला तोंड द्यायचा प्रयत्न करायचा. आपला आनंद किंवा दुःख आपल्याच हातात आहेत हे समजल्यावर विचाराने आपले चारित्र्य उत्तुंग करण्याचा जोराचा प्रयत्न करून आनंदभुवनाचे दार खुले करायचे. उत्तम विचार, उत्तम भावना व इच्छा व उत्तम आचरण यांनी सच्चरित्र बनेल व एका उज्ज्वल भविष्याची पहाट होईल. ती सुद्धा आपल्या कर्तबगारीने.

वैश्विक घडामोडींपासून आपल्या हाताच्या हालचालीपर्यंतच्या प्रत्येक कारणाची परिणती कार्यात होते. कर्म हा अदृश्य व अज्ञात नियम, शहाणपणाने, सज्ञानतेने व न्यायाने, प्रत्येक परिणामाची त्याच्या मागच्या कारणाशी सांगड घालतो व परिणामाला जबाबदार असलेल्या व्यक्तींपर्यंत त्याचे फलित पोचवतो.

**केशवचंद्र गंगाधर भडभडे**

# श्री उदंकाचार्य व एकश्लोकी

डॉ. बा. रा. अंतरकर

श्रीमदाद्य शंकराचार्यांची निरनिराळ्या लेखकांनी निरनिराळ्या वेळी संस्कृतमध्ये लिहिलेली १६/१७ चरित्रे आजमितीला उपलब्ध आहेत. शंकरविजय, संक्षेपशंकरजय, शंकरविजयविलास, आचार्यविजय अशासारख्या नावांनी ती ओळखली जातात. या चरित्रांशिवाय त्यांचे गुरुकुलांतील एक सहाध्यायी, पुढे त्यांचे शिष्य झालेले व म्हणून त्यांचे समकालीन असलेल्या चित्सुखाचार्यांनी लिहिलेला 'बृहच्छंकरविजय' नांवाचा एक चरित्रग्रंथ होता व त्याची एक त्रुटित (Mutilated) हस्तलिखित प्रत मद्रास हायकोर्टच्या श्री. टी. एस्. नारायणशास्त्री नांवाच्या एका ॲडव्होकेट असलेल्या, गृहस्थांकडे होती असे त्यांनी लिहिलेल्या Age of Sankara (सन १९१६) या ग्रंथात लिहिले आहे. त्यात त्यांनी श्रीशंकराचार्य व त्या वेळेचे प्रसिद्ध पूर्वमीमांसापंडित कुमारिलभट्ट यांच्या भेटीपर्यंत त्या ग्रंथाला धरून आचार्यांचे चरित्र दिले आहे. वर उल्लेखिलेल्या चरित्रकारांनी आचार्यांच्या १) सनन्दन / पद्मपाद २) मण्डनमिश्र / सुरेश्वराचार्य ३) तोटकाचार्य व ४) हस्तामलकाचार्य अशा चार प्रमुख शिष्यांची माहिती दिली आहे. परंतु याशिवाय चित्सुखाचार्यांनी उदंकाचार्य नांवाच्या एका अधिक शिष्याची माहिती दिली आहे. या सर्वच शिष्यांचे वृत्तान्त आपापल्या परीने वैशिष्ट्यपूर्ण आहेत. उदंकाचार्यांचा वृत्तान्तही तसाच मनोरम तर आहेच परंतु आचार्यांच्या वरीलपैकी इतर कोणत्याही चरित्रग्रंथांत उपलब्ध नाही व म्हणून श्री. नारायणशास्त्रींनीं आपल्या पुस्तकात तो जसा दिला आहे तसा पुढे देत आहे.

आपली माता आर्याम्बा व गुरु श्रीगोविन्दमुनी यांचे देहावसनानंतर आचार्यांनी प्रथम सनन्दनाला दीक्षा देऊन आपला शिष्य केले व लगेचच त्यांनी आपल्या दिग्विजययात्रेला प्रारंभ केला. सुरूवातीलाच ते प्रयागक्षेत्री आले व ती जागा त्यांना अतिशय आवडली. मग आसपासच्या तीर्थक्षेत्रांना भेट देऊन ते भारद्वाजाश्रमाचे ठिकाणी आले. काही दिवस तेथेच राहून आपल्या तत्त्वज्ञानाचा तेथील लोकांत प्रसार करण्याचे त्यांनी ठरविले. उपनिषदे, ब्रह्मसुत्रे व भगवद्गीता या प्रस्थानत्रयांवरील भाष्ये त्यांनी अगोदरच लिहून पूर्ण केली होती व आता त्यांचा आपल्या शिष्यांना पाठ देण्यास त्यांनी सुरूवात केली. अगदी सकाळी शिष्यांना घेऊन ते त्रिवेणीवर जात व तेथे आपले अनुष्ठान संपल्याबरोबर भारद्वाजाश्रमांत परत येत. त्यानंतर शिष्यांना भाष्याचा पाठ देत असत व अपराह्णकाली चर्चासत्र घेऊन शिष्यांच्या शंकांचे समाधान करीत.

एक दिवस (सायंकाळी) ते शिष्यांना घेऊन अक्षयवट पाहायला गेले असतांना तेथें एक तरुण ब्राह्मण त्या झाडाखाली आपले जीवन समाप्त करण्याच्या प्रयत्नांत असलेला दिसला. त्याचे सर्व शरीर महारोगाने ग्रासलेले होते. ते एखाद्या भोपळ्याप्रमाणे पांढरे फटक पडले (कूष्माण्डमिव पाण्डुरागम्) असून त्याच्या डोळ्यांची पाहाण्याची सर्व शक्ति नष्ट झाली होती. एखाद्या घुबडाप्रमाणे तो सूर्याकडे पाहू शकत नव्हता. (उलूक इव सूर्यावलोकनाक्षमम् ।). शरमेच्या पोटी व त्याच्या देशवासीयांची नजर टाळण्याकरतां म्हणून तो आत्महत्या करण्यास प्रवृत्त झाला होता. सुदैवाने त्याच वेळी त्याला आचार्य त्याच्या समोर दिसले व त्याने मोठ्या आर्तस्वराने आपल्यावर दया करण्याची व आपले रक्षण करण्याची त्यांचेजवळ याचना केली. आचार्यांना त्याचेबद्दल अत्यंत अनुकंपा उत्पन्न होऊन त्यांनी त्याला आपल्या हाताने स्पर्श केला व तो तत्काल पूर्णपणे रोगमुक्त झाला. (हा एक प्रकारचा



शक्तिपात transfer of energy असला पाहिजे. आचार्यांसारख्या महाब्रह्मज्ञानी पुरुषांना तो कितीही प्रमाणात करता येत असला पाहिजे.) त्याच्या शरीरावरील महारोगाची सर्व लक्षणे नाहीशी झाली आणि त्याला उत्तमपणे सर्व काही पाहाता येऊ लागले. किंबहुना त्याचे एका सुंदर तरुणांत रूपांतर झाले आणि तेथील लोक त्याला उद्देशून 'उदङ्क' (उद्गताः अङ्काः यस्य सः-उद्गत = नाहीशा झालेल्या; अङ्क = महारोगाच्या खुणा म्हणजेच महारोग) असे म्हणाले. ते झाल्यावर त्या तरुणाने आचार्यांना आपल्याला वेदान्ताचे रहस्य सांगून आपला शिष्य करून घेण्याची विनंती केली. तो त्याकरता अधिकारी असल्याचे आचार्यांच्या लक्षात आले व त्यांनी त्याला काही प्रश्न विचारले व त्याची योग्य ती उत्तरे त्याने दिली. ती प्रश्नोत्तरे पुढीलप्रमाणे आहेत.

आचार्य : 'कि ज्योतिस्तव' – तुला प्रकाश कोणता मिळतो?

उदङ्क : 'भानुमान् अहनि मे दिवसा मला सूर्य (प्रकाश) मिळतो – 'रात्री प्रदीपादिकम्' – आणि रात्री दिवा (चन्द्र) इत्यादि.

आचार्य : 'स्यादेवम्, रविदीपदर्शनविधौ किं ज्योतिराख्याहि' – ठीक आहे. (पण) सूर्य, दिवा इत्यादि पाहाण्यांकरता कोणता प्रकाश (मिळतो) ते मला सांग.

उदङ्क : 'चक्षुः' – डोळा (म्हणजे सूर्य इत्यादि डोळ्यांनी दिसतात).

आचार्य : 'तस्य निमीलनादिसमये किम्' – तो (डोळा) मिटतो तेव्हा कोणता (प्रकाश असतो)?

उदङ्क : 'धीः' – बुद्धी (म्हणजे डोळ्याला बुद्धीच्या प्रकाशाने दिसते).

आचार्य : 'धियो दर्शने किम्' – बुद्धीला कोणत्या प्रकाशाने दिसते किंवा बुद्धीचा प्रकाश कोणता?

उदङ्क : 'तत्र अहम्' – तेथे मी आहे म्हणजे बुद्धीचा प्रकाश (क) मी आहे.

आचार्य : 'अतो भवान् परमकं ज्योतिः' – म्हणून तू (स्वतः) सर्वश्रेष्ठ प्रकाश आहेस.

उदङ्क : 'तदस्मि प्रभो' – हे प्रभो, तो (सर्वश्रेष्ठ) प्रकाश मी (च) आहे. उदंकाने शेवटचे वाक्य उच्चारले आणि तो अपरोक्ष ज्ञानीच झाला असे चित्सुखाचार्य सांगतात. Psychology of Religion मध्ये याला 'Sudden Conversion' असे म्हणतात.

माणसाच्या अंतरंगात (म्हणजे जाणिवेत) बदल होणे – आज ते दृश्याने भरलेले आहे. ते पूर्णपणे रिकामे होऊन त्या ऐवजी संपूर्णपणे भगवंताने किंवा सद्वस्तूने भरून जाणे – हे अध्यात्माचे मर्म आहे. याला डॉ. राधाकृष्णन यांनी 'inner sea-change' असे म्हटले आहे. तो आतील बदल इतका आमूलाग्र व व्यापक असतो. यालाच 'conversion' असे म्हणतात. सामान्य माणसाचे बाबतीत तो पायरीपायरीने (gradual conversion) व हळूहळू होतो परंतु काही अगदी अपवादात्मक अशा माणसांमध्ये (त्यांना spritual geniuses असे म्हणतात.) तो एखाद्या क्षुल्लक वाटणाऱ्या निमित्ताने एकदम (sudden,conversion) होतो. उदंकाचा बदल दुसऱ्या प्रकारचा होता. त्याला वरील संवाद निमित्त झाला. श्रीरमणमहर्षींनी हीच गोष्ट पुढील शब्दांत सांगितली आहे. "Gun powder catches fire in an instant while much time is needed to set fire to the coal" ('Search in secret India' by Paul Brunton, 1970, P.138) आचार्यांच्यासारख्या ज्ञानी पुरूषांना समोर आलेल्या माणसाची आध्यात्मिक पातळी पाहाताक्षणींच कळते व काय करणे जरूर आहे तेही माहीत असते व त्याप्रमाणे ते योग्य ते करतात.

आचार्यांचा हा नवा शिष्य पुढे 'उदंकाचार्य' म्हणूनच प्रसिद्धी पावला आणि वरील प्रश्नोत्तरे एका श्लोकात घातलेली असून त्याला 'एकश्लोकी' असे म्हणतात. तो (एक) श्लोक पुढीलप्रमाणे आहे.

कि ज्योतिस्तव भानुमानहनि मे रात्री प्रदीपादिकम् ।<br>
स्यादेवं, रविदीपदर्शनविधौ किं ज्योतिराख्याहि मे ॥<br>
चक्षुस्तस्य निमीलनादिसमये किं, धीर्धियो दर्शने ।<br>
किं, तत्राहमतो भवान् परमकं ज्योतिस्तदस्मि प्रभो ॥

ए-३, तेजकरण सोसायटी,<br>
७९, राममंदिर रोड,<br>
विलेपार्ले पूर्व, मुंबई - ४०० ०५७.

प्राथमिक शाळा, हायस्कूल,
महाविद्यालये यामधील
शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या
सेवानिवृत्तीची कामे करून मिळतील.
तसेच
विमा पॉलिसी व मुदत बंद ठेवींची
कामे करून मिळतील.

● संपर्क ●

श्री. एस. एस. लेंभे
१२५, शुक्रवार पेठ,
मंडई गणपतीच्या मागे,
पुणे - ४११ ००२.

# श्रीज्ञानेश्वरमहाराजकृत श्रीविठ्ठलनाममहिमा

प्रा. योगेश्वर अभ्यंकर

श्रीसंतज्ञानेश्वर महाराज नाथसंप्रदायी. त्यामुळे त्यांनी सहजपणे अज्ञजनांना विविध चमत्कार करून दाखविले. अर्थात रेड्याच्या मुखातून वेदवाणी किंवा निर्जीव भिंत चालविणे अशा गोष्टी समाजाने आपले कौतुक करावे म्हणून त्यांनी केले नाही. त्यामागे निश्चित एकच हेतू होता. विद्वानांचा गर्व हरण करणे. असे जरी काही घडले तरी सामान्य माणसांना मुक्तीचा मार्ग साधा सोपा व्हावा म्हणून नामस्मरणाचा त्यांनी पुरस्कार केला. ते म्हणतात -

*विठ्ठल विठ्ठल न म्हणसी । पुनरपि पडसी गर्भवासी ॥१॥*
*अंतकाळी स्मरे । स्मरे विठ्ठल राणा ॥२॥*
*रखमादेवीवरू निर्धारी । पडो नेही चरावरी ॥३॥*

विठ्ठलनामस्मरणापासूनचा प्रमुख फायदा म्हणजे जन्ममृत्यूचा फेरा चुकणे. म्हणजेच पुन्हा गर्भवास नाही. शेवटच्या निरोपाच्या वेळी पंढरीचा राणा विठ्ठल त्याचे स्मरण महत्त्वाचे, तसा निर्धार हवा, अर्थात अंतःकाळी विठ्ठलाचे स्मरण होण्यासाठी जन्मभरच नामस्मरण करणे जास्त फायद्याचे.

मानवी जीवनात अनेक बाधांचे भूत माणसाच्या मानगुटीवर बसलेले असते. त्यातून सुटका होण्यासाठी रामबाण उपाय म्हणजे

*जन्म जरा दुःख बाधा । स्मरता नाही गोविंद ।*
*ऐसा जयासि नित्य धंदा । तोचि सदा सुखरूप ॥१॥*
*धन्य कुळ धन्य याती । धन्य जन्म पुढती पुढती ।*
*भक्तिवीण नाही गती । मुखी हरिनाम उच्चार ॥२॥*
*विश्वी विश्व जो व्यापकु । तोचि माझा हरि एकु ।*
*त्यासी भक्तिवीण साधकु । नोळखे पै दुर्बुद्धी ॥३॥*
*ज्ञानरजनी रंजला । ज्ञानबोधे उपजला ।*
*ज्ञानदेवी हरी सेविला । निरंतर सर्वकाळ ॥४॥*

पुन्हा जन्म घेतल्यामुळे माणसाला विविध अवस्थेत संसारातील विविध स्वरूपाचे दुःख भोगावे लागते. खरे म्हणजे मानवी जीवनात त्या मानाने सुखापेक्षा दुःखच जास्त. त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतल्यानंतर श्रीसंततुकाराम महाराजांसारखा सहजपणे म्हणतो - "सुख पहाता जवापाडे । दुःख पर्वताएवढे ।

त्याचा अनुभव थोड्याफार प्रमाणात सगळ्यांच्या वाट्याला येतो. मानवी जीवनात बालपण, यौवन आणि वृद्धपण अशा विविध अवस्था भोगताना ज्याला आपण सुख म्हणतो त्याचा स्वीकार करताना त्याच्या मागे दडलेल्या प्रचंड दुःखाचा स्वीकार सक्तीने करावा लागतो. माणूस विवाह करतो. त्या पाठीमागे विषयसुखाचा हव्यास असतो. पण विवाहानंतर काहीवेळा पत्नीनिधनाचे दुःख किंवा पुत्रनिधनाचे दुःख त्याला अनपेक्षितपणे भोगावे लागते. त्याचप्रमाणे अपेक्षाभंगातून निर्माण होणाऱ्या दुःखाचे तडाखे त्याला सहन करावे लागतात. वृद्धपणातील दुःख सर्वात जास्त चिंताजनक वाटते. कारण जन्मभर स्वतंत्रपणे वावरणारा माणूस परतंत्र होतो. विविध अवयवांची कार्यक्षमता संपते. डोळ्याने दिसत नाही किंवा कानाने ऐकायला येत नाही, तसेच चालताना पाय लटपटतात. त्यामुळे कोणाची तरी मदत घ्यावी लागते. त्यावेळी त्याचा तोल सुटतो. भ्रमिष्टपणामुळे काही आठवत नाही. नको हे जीवन अशी भावना निर्माण होते. इतकेच नाही, तर ज्यांच्यावर प्रेम केले, ज्यांचे संगोपन केले, लाड केले अशी भोवतालची माणसेही म्हाताऱ्याचे तऱ्हेवाईक वागणे पाहिल्यानंतर शिव्याशाप देतात. मृत्यूच्या वेळच्या यातना महाभयंकर असतात. त्या बोलता येत नाही असे हे मानवी जीवन. त्या जीवनातून सुटका व्हावी म्हणून संत ज्ञानेश्वर महाराज म्हणतात की त्यासाठी गोविंदाचे स्मरण अधूनमधून नाही, तर



"नित्य धंदा" म्हणून करावे. म्हणजेच भोजन जसे देहधारणेसाठी जरूरीचे तसेच देवाचे भजन परलोकासाठी बहुमोलाचे. नामस्मरण किंवा भजन करणारा भक्त त्याला देवाचे संरक्षण लाभते. म्हणजे त्याच्या आयुष्यात संकटे येत नाहीत किंवा भक्ताला दुःख भोगावे लागत नाही. असे काहीही घडत नाही. पण त्यातून सुखरूप सुटका देवकृपेमुळे होते. त्या दृष्टीने द्रौपदीवस्त्रहरणाचा प्रसंग महत्त्वाचा. द्रौपदीने श्रीकृष्णाचा धावा केला. देवाने भक्ताचा धावा ऐकून लाज राखली. अशी सुखरूपता पांडवांना जन्मभर लाभली. देवाच्या भक्तीशिवाय गती नाही. जो भक्त हरिनामाचे स्मरण करतो तो धन्य. श्रीहरीच्या भक्तीला जो ओळखत नाही, त्याला काही साधता येत नाही. गोविंदाच्या भक्तीमुळे खरेखुरे ज्ञान प्राप्त होते. नामस्मरण निरंतर आणि सर्वकाळ केले पाहिजे.

श्री हरीच्या स्मरणाचे काही फायदे.

*संपत्तिविपत्ति दुःख । हरेल अवघा शोक ।*
*वेगी करूनिया विवेक । हरिस्मरण करी ॥१॥*
*मंत्रयंत्र सूत्रधारी । सिद्ध साध्य तोचि हरी ।*
*नित्य जपोनि वैखरी । आपला करी हरिसी ॥२॥*
*ध्यानमन एक चित्त । अलक्ष लक्षी अच्युत ।*
*न सांगे हिताची मात । अखंड जपे हरिनाम ॥३॥*
*ज्ञानदेवे जप केला । मग समाधीस बैसला ।*
*नाम घेता बोध झाला । देव आला हृदयासी ॥४॥*

श्री हरीच्या स्मरणामध्ये अवघा शोक हरण करण्याची किमया आहे. म्हणूनच विवेकाने, निष्ठेने देवाचे स्मरण करून देवाशीच नाते जोडावे. देवाचे आणि भक्ताचे नाते माता आणि तिचे बाळ अशा स्वरूपाचे. म्हणजेच माता जशी डोळ्यात तेल घालून आपल्या बाळाचे संरक्षण करते त्याच पद्धतीने देव भक्ताचे रक्षण करतो. नामस्मरणात चित्त एकाग्र असावे आणि हरिनामाचा अखंड जप. श्री संत ज्ञानेश्वरांच्या जीवनात समाधिसाधन आणि जप त्यांनी केला म्हणूनच त्याला बोध झाला. त्याचा फायदा म्हणजे प्रत्यक्ष देवच हृदयमंदिरात येऊन राहिला.

जन्माला आलेल्या माणसाजवळ भ्रमाचा भरपूर साठा असतो. अनेक गोष्टींसंबंधीचा फाजील अभिमान त्या संबंधात इशारा.

*भ्रम धरिसी या देहाचा । विठ्ठल म्हणे कां रे वाचा ॥१॥*
*पडोन जाईल हे कलेवर । विठ्ठल उच्चारी पा सार ॥२॥*
*रखुमादेविवरू अभय करू । मस्तकी ठेविला हा निर्धारू ॥३॥*

जन्माला आलेल्या माणसाला देहासंबंधीचा भ्रम मोठ्या प्रमाणात असतो. खरे म्हणजे जन्माला आलेला प्रत्येक जण मृत्यू पावतो. हे उघड्या डोळ्यांनी दिसत असताना माणूस देहावर प्रेम करतो. देहाचे चोचले पुरवितो. तारुण्याच्या धुंदीत काही पापही त्याच्या हातून घडते. मी सुंदर गोरा गोरा पान, नाकी डोळी नीटस तसेच चाणाक्ष असा गर्व त्याला होतो. त्यामुळे कुरूप माणसाला जास्तीत जास्त नावं ठेवण्यात त्याला आनंद वाटतो. पण जे काही आपल्याला लाभले आहे. म्हणजे सौंदर्य किंवा ज्ञान आणि संपत्ती ते देवाच्या कृपेने लाभले आहे, असे त्याला कधी वाटतच नाही. तारूण्यात सुंदर दिसणारा माणूस वृद्धपणी कुरूप दिसतो, इतकेच नाही, तर तारूण्यात आरशापुढे उभे राहून नटणारी आणि मुरडणारी सुंदर रमणी तिला वृद्धपणी आरशात पाहावेसे वाटतच नाही. त्या वेळी भ्रमाचा भोपळा फुटतो आणि देवाची आठवण होते. त्यापेक्षा आपल्याला मृत्यू केव्हाही गाठणार आहे हे लक्षात ठेवून माणसाने श्रीविठ्ठलनामस्मरणाचा आश्रय घ्यावा.

श्री विठ्ठल – नामस्मरणाचे महत्त्व अज्ञ जनांवर ठसविण्यासाठी श्रीसंतज्ञानेश्वर म्हणतात,

*एक मूर्ख नेणती । नाम हरींचे न घेती ।*
*मुखे भलतेचि जल्पती । ते पावती अधःपंथा ॥१॥*
*नामेविण सुटका नाही । ऐसी वेदशास्त्री ग्वाही ।*
*जो वेद मस्तकी पाही । ब्रह्मयाने वंदिला ॥२॥*
*नित्य नामाची माळा । जिव्हे घे तूं गळाला ।*
*तो न कर्माविगळा । ऐसे बोलती पुराणे ॥३॥*
*नयनी श्रवणी हरी । आणिक काम न करी ।*
*तो साधु भक्त निर्धारी । हरिचा आवडता ॥४॥*
*ज्ञानदेवी पाहिले । हरिनाम साधुनी घेतले ।*
*ते समाधीस केले । पुष्पशयनी आसन ॥५॥*

जे महामूर्ख लोक श्रीहरीचे स्मरण करीत नाही ते जीवनातील परमानंदास मुकतात. नामस्मरण हे एकच तारणारे अशी ग्वाही वेद-शास्त्रांनी दिली आहे. पण अभक्त त्याकडे दुर्लक्ष करतो आणि देवाच्या नामस्मरणाऐवजी भलत्याच नामाकडे वळून स्वतःचे नुकसान करतो. मानवी जन्मातील नामस्मरणाचे महत्त्व वर्णन केले आहे. ध्यानी मनी स्वप्नी श्रीहरीचा ध्यास घेणारा साधूच श्रीहरीला आवडतो. श्रीसंतज्ञानेश्वरांनी त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतला आणि म्हणूनच श्रीहरिनाम घ्यावे असे अधिकारवाणीने ते सांगतात.

श्रीहरीचे नाम सर्व सुखाचे भांडार ते कसे आणि का-

*अनंत नामाचे पाठांतर । रामकृष्ण नाम निरंतर ।*
*सर्व सुखाचे भांडार । हरि श्रीधर नाम वाचे ॥१॥*
*हरिनाम गजर खरा । येणे तू तरसील तीरा ।*
*जन्मजुगाच्या येरझारा । खंडती एक्या हरिनामे ॥२॥*
*अनंत तीर्थाचे मेळ । साधलिया हरिनामकल्लोळ ।*
*पूर्वजांसहित अजामेळ । उद्धरिला सहपरिवारे ॥३॥*
*कोटिजन्मांचे दोष । हरतील पातके जातील निःशेष ।*
*अंती होईल वैकुंठवास । कोटि कुळांसी उद्धार ॥४॥*
*हे योगियांचे निजजीवन । रामकृष्ण नारायण ।*
*येणे जगत्रय होय पावन । हरिस्मरण जीवासी ॥५॥*

*ज्ञानदेवी घर केले । हरी ऐसे रत्न सांठविले ।*
***शेखी कोटिकुळा उद्धरिले । हरिहरि स्मरितें निशिदिनी ॥६॥***

श्रीरामकृष्णाचे निरंतर नामस्मरण हेच खरेखुरे सुखाचे भांडार आहे. श्रीहरिनामाच्या गजरात तल्लीन झालेला भक्त त्याच्या जन्ममरणाच्या खेपा चुकतात. श्रीहरिच्या नामस्मरणात अनंत तीर्थांचे पावित्र्य आहे. अजामेळासारखा पापी माणूस त्याला श्रीहरीची कृपा लाभली. त्यामुळे पूर्वजांसहित त्याचा उद्धार झाला. श्रीहरीचे नाम एक रत्न असून त्याची तुलना कोणत्याही रत्नाशी करता येत नाही. बहुमोलाचे रत्न परलोकात जास्त उपयुक्त ठरते. त्यासाठीच रात्रंदिवस श्रीरामकृष्णाचे स्मरण करावे.

*श्री संत ज्ञानेश्वरांचा एक लोकप्रिय अभंग पाहा ।*
*सोनियाचा दिवस आजि अमृते पाहिला ।*
*नाम आठविता रूपी प्रगट पै झाला ॥१॥*
*गोपाळा रे तुझे ध्यान लागो मना ।*
*आनु न विसंबे हरि जगत्रय जीवना ॥२॥*
*तनुमन विनटलो शरण तुझ्यापायीं ।*
*एक विठ्ठला वांचूनि आनु नेणे काही ॥३॥*

नामस्मरण करणाऱ्या भक्ताला देवाचे दर्शन घडते. अर्थात हे भाग्य सर्वांच्याच वाट्याला येत नाही. श्रेष्ठ कोटीतील साधुसंत यांच्या मनाला गोपाळाचे ध्यान लागते. भक्तिभावाने विनम्रपणे देवाला शरण गेल्यानंतरच संतांचे भाग्य उजळते.

श्रीहरिच्या नामस्मरणामुळे अनेक भक्तांचा उद्धार झाला. त्यासंबंधी श्रीसंतज्ञानेश्वर महाराजांनी वर्णन केलेली श्रेष्ठ भक्तांची नामावळी पहा -

*नाम प्रल्हाद उच्चारी । तया सोडवी नरहरी ।*
*उचलुनि घेतला कडियेवरी । भक्तसुखे निवाला ॥१॥*
*नाम बरवया बरवंट । नाम पवित्र आणि चोखट ।*
*नाम स्मरे नीळकंठ । निजसुखे निवाला ॥२॥*
*जे धुरूसी आठवले । तेचि उपमन्ये घोकिले ।*
*तेचि गजेंद्रा लाधले । हित जाले तयांचे ॥३॥*
*नाम स्मरे अजामेळ । महापातकी चांडाळ ।*
*नामे जाला सोज्वळ । आपल्यासहित निवाला ॥४॥*
*वाटपाडा कोळिकु । नाम स्मरे तो वाल्मिकु ।*
*नाम उद्धरिले तिन्ही लोकु । आपणासहित निवाला ॥५॥*
*ऐसे अनंत अपार । नामे तरले चराचर ।*
*नाम पवित्र आणि परिकर । रखुमादेविवराचे ॥६॥*

बालभक्त प्रल्हाद आणि ध्रुव यांना नामस्मरणानेच तारले. अर्थात त्यांची नामावर संपूर्ण श्रद्धा होती. त्यामुळेच कोणत्याही संकटावर मात करण्याचे विलक्षण सामर्थ्य त्यांना देवकृपेने लाभले. एका चांडाळ अजामेळाचे रूपांतर सोज्वळ माणसात झाले. ते सारे नामस्मरणामुळे घडले. चोऱ्यामाऱ्या करणारा वाल्याकोळी नामस्मरणाने महर्षि वाल्मिकी झाला. श्रीहरीचा नाममहिमा असा विलक्षण आहे.

वारकरी पंथामध्ये श्रीरामकृष्णाच्या भजनाबरोबरच त्यांच्या कथाकीर्तनाला महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे. त्यासंबंधी श्रीसंत ज्ञानेश्वर महाराज अभिमानाने म्हणतात-

*प्रेम जयाचे कथेवरी । तोचि धन्य ये चराचरी ।*
*रामकृष्ण निरंतरी । मुखी आवडी जपतसे ॥१॥*
*धन्य धन्य तोची वंशी । धन्य धन्य माता कुशी ।*
*धन्य धन्य काळ तयासी । रामकृष्ण म्हणतांची ॥२॥*
*ऐसे धन्य जन्म तयाचे । धन्य धन्य पुण्य साचे ।*
*त्यासी भय कळिकाळाचे । नाही जन्म घेतलिया ॥३॥*
*एवढा महिमा नामाचा । धन्य जो राम उच्चारी वाचा ।*
*धन्य जन्म तयाचा । ज्ञानदेव म्हणे ॥४॥*

श्रीरामकृष्णांचे जीवन अवतारी महापुरुषांचे. त्यामुळे त्यांचा आदर्श समाजापुढे ठेवला तर समाजाचा तोल सावरला जातो. श्रीरामकृष्णांच्या चरित्राने अनेकांचे जीवन घडविले आहे. आपल्या महाराष्ट्राचे लाडके दैवत श्रीशिवाजीराजे यांच्यावर जिजामातेने बालपणीच रामकृष्णांच्या कथेचे संस्कार केले होते. त्यामुळेच जगावेगळे पराक्रम शिवाजीराजांनी सहजपणे केले. श्रीरामकृष्णांच्या जीवनात अनेक नाट्यमय प्रसंग तसेच पराक्रमाचे आणि धाडसाचे प्रसंग विपुल प्रमाणात. श्रीकृष्णाची गीता म्हणजे आदर्श ग्रंथराजच. अशा सर्व गोष्टींनी नटलेली कथा जो आवडीने करतो आणि जो भक्त आवडीने ऐकतो त्यांचा वंश धन्य होतो. त्याचा स्पष्ट अर्थ असा की रामकृष्णांचे जीवन डोळ्यापुढे ठेवून भक्त स्वतःच्या जीवनाचे रंगरूप बदलतो. देवकृपेने दैवाला वाचवून यशस्वी होतो.

श्रीहरिच्या नामस्मरणाने आणि कीर्तनाने संतजनांना कोणत्या गोष्टी साध्य होतात त्याचे वर्णन -

*सकळ धर्माचे कारण । नामस्मरण हरिकीर्तन ।*
*दया क्षमा समाधान । संतजन साधिती ॥१॥*
*निजधर्म हा चोखडा । नाम उच्चारू घडघडा ।*
*भुक्तिमुक्तीचा संगवडा । हा भवसिंधुतारक ॥२॥*
*लावण्य मान्यता विद्यावंत । सखे स्वजन पुत्रकलत्र ।*
*विषयभोग वयसा व्यर्थ । देहासहित मरणांती ॥३॥*
*जे जे देखणे सकळ । ते हे स्वप्नीचे मृगजळ ।*
*म्हणोनि चिंती चरणकमळ । रखुमादेविवर विठ्ठलाचे ॥४॥*

दया, क्षमा आणि समाधान असे दुर्लभ गुण संतांपाशी असतात. सामान्य माणूस असमाधानी किंवा अतृप्तच असतो. धनसंपत्ती किंवा विषयभोग किंवा लौकिक यांसंबंधी सामान्य माणसाचे समाधान कधीच होत नाही. पण संतांनी नामस्मरण आणि हरिकीर्तनाच्या साहाय्याने जीवनातील रागलोभावर विजय संपादन केलेला असतो. कारण विश्व खरे नसून खोटे मृगजळ आहे, याची

कल्पना त्यांना असते.

जळी स्थळी काष्ठीं पाषाणी श्रीहरिचे दर्शन घडल्यानंतर श्री संत ज्ञानेश्वरांची अवस्था पहा -

*हरि आला रे हरि आला रे । संतसंगे ब्रह्मानंदु जाला रे ॥१॥*
*हरि येथें रे हरि तेथे रे । हरिवांचूनि न दिसे रिते रे ॥२॥*
*हरि पाही रे हरी ध्याई रे । हरिवांचूनि दुजे नाही रे ॥३॥*
*हरि वाचे रे हरि नाचे रे । हरि पाहतां आनंदु साचे रे ॥४॥*
*हरि आदी रे हरि अंती रे । हरि व्यापकु सर्वाभूती रे ॥५॥*
*हरि जाणारे हरि वाना रे । बापरखुमादेविवरू राणा रे ॥६॥*

श्रीहरिच्या दर्शनाने झालेला आनंद अवर्णनीय. श्रीहरिचे स्वरूप चोहीकडे. श्रीहरि भक्तांबरोबर आनंदाने नाचतो. त्याची व्यापकता सर्वांमध्ये म्हणजेच सर्व प्राणिमात्रांत श्रीहरिच्याच रूपाचे दर्शन. श्रीसंतज्ञानेश्वर महाराजांनी श्रीहरिच्या दर्शनासंबंधीचे केलेलें वर्णन लक्षात राहण्यासारखे. श्रीहरिचे नामस्मरण केले आणि कथाकीर्तन आवडीने ऐकले की भक्ताचा उद्धार होतो.


प्रा. योगेश्वर वि. अभ्यंकर
४२२, दातार अपार्टमेंटस्,
वकील वाडी,
नाशिक - ४२२ ००१.



*With Best Compliments From*



**PATIL - JAGTAP ASSOCIATES**

**PROMOTERS & BUILDERS**
Dhankawadi,
Pune.

*With Best Compliments From*

*Madhav Capacitors Pvt. Ltd.*

*B-5-2, M.I.D.C. Industrical Estate,*
*Bhosari, Pune - 411 026.*

*Products*
*L. T. Capacitors, Capacitors upto*
*36 K.V. Protection / Energy Storage Capacitors,*
*Automatic P.F. Control Panels, Series Reactors.*

# पुढे चाले ज्ञानेश्वर

बि. रा. करंदीकर



काही काही कल्पना स्वतःच्याच मनात सहज फुलविताना भान हरपून जाते, आपण प्रयत्न न करताही डोळ्यापुढं तशी चित्रं तरळू लागतात, त्या कल्पनाचित्रांत आपले आपणच दंग होऊन जातो, रंगून जातो. एखादा लेखक असतो, तो त्यांना शब्दरूप देतो. एखादा चित्रकार असतो, त्याच्याही मनांत तशीच एखादी कल्पना तरंगते. तो ती चित्रबद्ध करतो. आपल्या कल्पनेला असे शब्दरूप किंवा चित्ररूप मिळालेले पाहून, आपल्याला एरवी खूप आनंद होतो.

पण असा आनंद मला तरी "त्या" चित्राने झाला नाही. ते बटबटीत वाटले, आपली मूळ कल्पनाच कितीतरी रम्य होती! त्या मूळ कल्पनेतच मी रमतो, तरंगतो.

आपण ज्ञानेश्वरांना ज्ञानेश्वर म्हणतच नाही, आपण तर माऊली म्हणतो. आपणच नव्हे, तर आपल्या आधीच्या कित्येक पिढ्या माऊलीच म्हणत होत्या. आपण सतत चुकतो, माकतो पण माऊली आहे, ती आपल्याला पदराखाली घेणारच, हा अढळ विश्वास त्यामागे असतो.

आपण ज्ञानेश्वरांना माऊली म्हणतो, पण माऊलीने हे माऊली संबोधन प्रथम त्यांच्या गुरूमाऊलीला, निवृत्तिनाथांना लावले होते. ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायाच्या मंगलचरणात त्यांनी निवृत्तिनाथांना हे विशेषण लावले. त्यांची माऊली कशी? तर "सोहंसिद्धीचे लळे" पुरविणारी, "आधारशक्तीचा अंक" देणारी, "रिद्धीसिद्धीची बाळलेणी" घालणारी, "सतरावियेचे स्तन्य" देणारी, अशी ती गुरुमाऊली.

माऊली हे सहज लिहून जाते, आणि अर्थ लावता लावता आपण भांबावून जातो, आपली दमछाक होते. "सोहंसिद्धी" म्हणजे काय ते (अगम्य असले तरी) आपण वाचलेलं असतं, पण त्या सोहंसिद्धीचे लळे पुरविणे, म्हणजे काय? रिद्धीसिद्धीची बाळलेणी, म्हणजे नक्की काय? या सांगरूपकाचा नेमका व सरळ अर्थ कळणे अशक्य असते. आपण कमी पडतो, खूप कमी पडतो. किती कमी आहोत, ते आपले आपल्याला जाणवतं. पण आपण हुशारही असतो.

"हे आपल्या समजण्यापलीकडचे आहे" असे म्हणत पारायणाला पुढे सुरुवात करतो. पूर्वावतारांत अर्जुनाला संस्कृतमधून व या अवतारात आपल्याला मराठीमधून गीताज्ञानेश्वरी सांगितली, भगवान श्रीकृष्ण व ज्ञानेश्वर एकच, असा निर्णय देऊन आपण मोकळे होतो. दोघांची जन्मतिथीही एकच, हा जणू त्याचा काही सज्जड पुरावा म्हणून पुढे सारतो. आपल्यापैकी काहीजण "ज्ञानेशो भगवान् विष्णुः" असं खुद्द श्रीकृष्णांनाच सांगू लागतात. काहीजण गीतेचाच अवतार ज्ञानेश्वरी कशी आहे, ते पटवून देऊ लागतात. तर काही विद्वान वेदाप्रमाणेच गीता (ही) कृपण कशी होती, व माऊलीने (वत्सलेने) उदार कशी केली, हे स्वतःच्या पांडित्याचे

प्रदर्शन करीत उकलून दाखवतात. पण एखादे विनोबा लिहून जातात,

"गीताई माऊली माझी । तिचा मी बाळ नेणता ।।
पडतां रडतां घेई । उचलूनी कडेवरी ।।"

हा त्या नितळ व पारदर्शी कल्पनेच्या मोहात आपण पडतो. डोळ्यापुढे सहजपणे तशी चित्रं वावरू लागतात, आपण पडलों, रडलों तरी प्रेमानं उचलून कडेवर घेणारी ही गीता ज्ञानेश्वरी आपली आई आहे.

ज्ञानेश्वरांचं जणू काय पर्यायी नांव, इतक्या सहजपणे आपण माऊली म्हणतो. त्यांनी शब्द वापरला म्हणून सद्गुरूंना आपणही माऊली म्हणू लागतो. मग पूर्वसूरींनी - आधीच्या - संतमंडळींनी विठ्ठलाला विठाईमाऊली कसं समर्पकपणे म्हटले ते सांगून, मातृशक्तीचाच आपण गौरव करीत असतो......आणि या संदर्भात एक अफलातून उदाहरण आठवतं ते संत जनाबाईंचं, तिनं विठ्ठलाला नुसतं माऊली नाही म्हटलं, तर चक्क लेकुरवाळा (लेकुरवाळी नव्हे) करून टाकलं.

तसं पाहिलं गेलं तर कोण कुठली पोर – ना आईबापाचा, ना गांवाचा ठावठिकाणा, हरविलेली किंवा आईबापांनी टाकलेली पोर, नामदेवांना सापडते काय व ते तिला सांभाळतात काय! आधीच नामदेवांचे खटले भरपूर मोठे, अशा घरात या पोरीला आसरा मिळतो. "नामयाची दासी जनी" असे म्हणवून घेतांना तिला धन्यता वाटते, तर तिच्याच म्हणण्यानुसार दळतांना, कांडतांना, धुणी धुतांना, इतकंच काय पण गवऱ्या लावतांना स्वतः पांडुरंग तिला मदत करीत असतो.

आईबापांनी टाकलेली पोर केवढी उंची गाठते, हे पाहून अचंबीत व्हायला होते. दळतांना, कांडतांना, गोवऱ्या लावतांना (आजच्या भाषेत) ही खिचखिच करीत नाहीच, उलट त्या रबडधबडग्यात नामदेवांच्या कार्याची व साधनेची ती साक्षी बनते. नुसतीच साक्षी नाही, तर तशी ती घडतही जाते. समाजाने चार हात दूर ठेवलेल्या समाजाला, चोखामेळ्याला नामदेवानं आपलं मानलं, शिष्यत्वही दिलं, हे पाहून त्यावेळी पंढरपुरात किती हलकल्लोळ माजला असेल, याची आज आपण कल्पनाही करू शकत नाही. गावाच्या वेशीबाहेर ढकललेल्याला घरात, घरच्या पडवीवर येऊ देणं हे त्याकाळी केवढं बंडखोर ठरलं असेल!

– आणि तो चोखा तरी कसा? तुमचा आमचा महार नव्हे, तर आपल्या महाराचाही महार. इतक्या खालच्या पायरीला जाऊन, दीनवाणा होऊन, जोहार घालीत मागतो काय, तर आपल्या उष्ट्याची भाकर! अशा चोख्याला नामदेवांनी आपल्या पंगतीला बसवलं, बरोबरीचं स्थान दिलं, सुंभाच्या कडदोऱ्याची व रकट्याच्या पितांना, चंद्रभागेच्या वाळवंटात कीर्तन करताना, नामदेवाने आपल्या अंतरंगीच्या शिष्यांत चोखामेळ्याला स्थान दिलं होतं.

– या सर्वांची जनाबाई साक्षी आहे -

– तिकडं आळंदीनं वाळीत टाकलेली, पैठणनं न्याय न दिलेली ही चार भावंडं, (नेवाश्याला ज्ञानेश्वरी लिहून झाल्यावर) प्रथमच पंढरपूरला आलेली आहेत. विठ्ठलपंतांनी व रुक्मिणीमातेनं लग्नानंतर पंढरीची वारी केली होती म्हणून, आणि सर्वत्र पसरलेल्या नामदेवांचं नांव ऐकून पंढरपूरला आलेली आहेत. पांडुरंगाशिवाय नामदेव व नामदेवाशिवाय पांडुरंग राहूच शकत नाही. नामदेव वाळवंटात कीर्तन करतो तर तिकडे विटेवर पांडुरंग नाचतो, हेही दूरवरच्या भक्तांना माहिती आहे, अशा नामदेवांच्या भेटीसाठी ही चार भावंडं पंढरपूरला आलेली आहेत, हे जनाबाईनं पाहिलेलं आहे.

चंद्रभागेच्या वाळवंटात, निवृत्तिनाथांच्या उपस्थितीत नामदेव व माऊली चर्चा करीत आहेत. अनुभवांची देवाणघेवाण करीत रात्रीच्या रात्री घालवीत आहेत. नामदेव भाविक आहे पण आपण समजतो तसा भोळाभाबडा नाही. ज्ञानेश्वरीची एकतरी नव्हे, तर प्रत्येक ओवी त्याने सर्वार्थाने "अनुभवली" आहे. भावार्थदीपिकेचं ज्ञानेश्वरी हे नावही कदाचित् नामदेवानंच दिलं असावे, हें जनाबाईला माहिती आहे.

"माळिये जेंउते नेले । तेंउते निवांत चि गेले ।।
तेयां पाणिया ऐसे जाले । नाठवें हे ।।

हे ऐकता ऐकता आपण एकदाच "ताटी उघडा ज्ञानेश्वरा" म्हणून आर्ततेने धावा कसा व कां केला होता, त्याची मुक्ताईला आठवण झालेली असेल व ते तिने जनाबाईला सांगितलं असेल. जनाबाई त्याचीही साक्षी आहे.

चोखामेळा, बंका वगैरे पंढरपुरातच आहेत. हे सारे आणि चार भावंडं आलेली पाहून गोरोबाकाकांनी तेरला परतायचं लांबवले आहे, असा सारा भक्तांचा मेळा जमला आहे. ज्ञानदेवांची गुरूमाऊली व नामदेवाची विठाईमाऊली, निर्गुण निराकार परब्रह्म या भक्तांच्या मेळाव्यात सगुण साकार होताना जनाबाई साक्षी आहे.

– आणि ती एकदम म्हणून जाते "विठो माझा लेकुरवाळा । संगे गोपाळांचा मेळा....."

"म्हण पुढं", "पूर्ण कर" असा मग विठ्ठलाच्या त्या लेकरांनी जनीकडे आग्रह केला आहे. जनी थोडीशी भांबावली पण तिचा अधिकार ज्ञानदेव व नामदेव या दोघांनी ओळखला आहे, आणि या दोघांच्या पाठिंब्यावर एरवी निवड-टीपण करणारी ही दासी जनी बोलून जाते,

'निवृत्ती हा खांद्यावरी । सोपानाचा हात धरी ।।
पुढे चाले ज्ञानेश्वर । मागे मुक्ताई सुंदर ।।
गोरा कुंभार मांडीवी । चोखा जीवा बरोबरी ।।
बंका कडीयेवरी । नामा करांगुळी धरी ।।

यांतली खोंच त्या सर्वांनी ओळखली आहे. गोरा कुंभाराच्या आधी जनाबाईने परीक्षा घेऊन लहानमोठं ठरविलं आहे. ती ज्याची दासी म्हणून म्हणवून घेत होती, तो नामदेव अजून छोट्या (व म्हणून निरागस) बाळासारखा आहे. आईला सोडून अजून तो चालत नाही, आईची करंगळी सोडत नाही, तर ज्ञानदेव वयाने त्याच्याहून कितीतरी लहान असूनही, त्याच्यापुढे स्वतंत्रपणे चालत आहेत. हा फरक जनीने नेमका दाखवला आहे. आपण "आद्यशक्ती" म्हणतो, "चित्कला" म्हणतो ती मुक्ताईही स्वतंत्रपणे, पण मागून चालते आहे. चोखामेळा, जीवा विठाईबरोबर आहेत तर बंकाला तो दमल्यामुळे कडेवर घेतले आहे आणि शंकरांनी भाळी चंद्रकोर मिरवावी तसे निवृत्तीनाथांना खांद्यावर घेऊन लेकुरवाळा विठोबा त्यांचा आदर करतो आहे.

– कां असं झालं असेल?

श्रावणांत आपण जीवतीची पूजा करतो. आपण नव्हे पण आपली आई, आजी, पणजी स्वतः भिंत सारवून तीवर गेरूने जीवती काढत होत्या. आपण आजच्या काळात बाजारात आयता मिळणारा छापील कागद वापरतो. ही चार भावंडं आषाढीला आलेली, श्रावणांतही पंढरपुरीच असावीत. जनीने भिंत सारवून जीवतीचे चित्र काढलं आहे व ते चित्र काढताकाढता तिला ही कल्पना सुचली असेल, जीवतीच्या ठिकाणी तिला पांडुरंग भासला आणि तिच्या तोंडून उत्स्फूर्तपणे ओळी बाहेर पडल्या असतील,

"विठो माझा लेकुरवाळा । संगे गोपाळांचा मेळा ।।"

अशीही शक्यता आहे. नक्की आपणांस काहीच माहीत नाही. मग त्या गोपाळांच्या मेळ्याने विचारलं असेल, जीवती म्हणजे जर पांडुरंग, तर या मुलातलं कुठलं कोण? जनीने मग आधी इतके दिवस केलेल्या परीक्षेप्रमाणे या लेकरांना नांवे दिली असतील, हा पुढे पुढे चाललेला ज्ञानेश्वर, मांडीवर असलेले गोरोबाकाका, करंगळी धरलेला नामा, कडेवर असलेला बंका, बरोबर चालणारा चोखा, मागून सुटी चालणारी मुक्ता.

वीटेवरचे परब्रह्म नुसतेच सगुण साकार नाही, तर लेकुरवाळे झालेलेही जनीने पाहिले. आईबापांचा, गावाचा ठावठिकाणा नसलेल्या जनीने पाहिलं, दासी असलेल्या जनीने पाहिले....

– जनीने पाहिले पण आपण पाहू शकत नाही. सर्वार्थाने आपण कमी पडतो.

– मग कुणीतरी, कुठलातरी चित्रकार उठतो, जनाबाईच्या या काव्याला चित्ररूप देतो. पण ते चित्र बटबटीत होते, माऊली माऊली वाटत नाहीत, नामदेव नामदेव वाटत नाही. मला तरी ते चित्र भावत नाही, त्यापेक्षा जनीला भावलेल्या चित्राचंच आकर्षण जास्त वाटतं. जनीला भावलेल्या त्या चित्रांत आपण आणखी एक आकृती रेखतो. मुक्ताईबरोबरच जनाईची स्थापना करतो, दळणकांडण करणाऱ्या दासीला आदिशक्तीच्या बरोबरीचे स्थान देतो. बरोबरीचं स्थान देतो म्हणजे जनीवर उपकार नाही करत. तिने ते कर्तृत्वाच्या बळावर मिळवलेले असते.

– आणि मग पुढं चालणाऱ्या ज्ञानेश्वरांनाच नव्हे, तर त्यांच्यामुळे भक्तांच्या सोहोळ्याला वंदन करतो. त्यांच्या पायीची धूळ मस्तकी धारण करतो.


वि. रा. करंदीकर
पत्रकार नगर,
सेनापती बापट मार्ग,
पुणे - ४११ ०५३.
दूरध्वनी : ३३४९७५



।। श्री स्वामी समर्थ ।।

मनोहर सुगंधी आणि कंपनी

सुप्रसिद्ध उदबत्तीचे कारखानदार व विक्रेते

*आमचे येथे श्रीसत्यनारायण पुजा साहित्य, वास्तुशांतीचे संपुर्ण साहित्य मिळेल.*

११११, बुधवार पेठ,
टिळक पुतळ्याजवळ,
पुणे - ४११ ००२.
फोन : ४७७९०५

# ज्ञानेश्वरीतील सोऽहं साधना अर्थात् पूर्णत्वयोग

मकरंद माधव वझे

ज्ञानेश्वर महाराज आणि त्यांची ज्ञानेश्वरी यांना मराठी भाविकांनी आपल्या हृदयांत बसविले आहे. अबालवृद्ध, जाणते-नेणते, स्त्री-पुरूष, गरीब-श्रीमंत अशा सर्वांच्या अंतर्यामी ज्ञानोबांना अनन्यसाधारण असे स्थान आहे. श्री ज्ञानेश्वर विशेषांकाच्या निमित्ताने संतश्रेष्ठ, श्रद्धेय महापुरूषाची सेवाच घडत आहे. या सेवेस हातभार लागावा हे माझे परमभाग्य आहे.

ज्ञानेश्वर महाराजांचे दिव्य जीवन व पवित्र कार्य मेरू पर्वताहून उत्तुंग आहे. त्याचे सौंदर्य कोठूनही पाहिले तरी शोभायमानच आहे. स्वभावतः बोलणाऱ्या श्रुतीसारखे किंवा काजेवीण प्रवास करणाऱ्या गंगेसारखे पवित्र, पावन व कल्याणप्रद अशा या चरित्रात अवगाहन करायला या निमित्ताने मिळत आहे हे मी उपकार समजतो. माझे सद्गुरू परमहंस स्वामी माधवनाथांनी ज्ञानेश्वरीचे प्रेम माझ्या अंतःकरणात निर्माण केले. त्यातील बोधाचे अमृतपान करविले. त्यांच्या कृपेचे बळ घेऊन मी ही सेवा करावयास प्रवृत्त झालो आहे.

**'ज्ञानदेवांची सद्गुरूंपुढे नम्रता'**

ज्ञानेश्वरीसारखा अद्वितीय ग्रंथ लिहूनही त्यांनी स्वतःकडे धाकुटेपणा घेतला आहे, त्यामुळे हा ग्रंथ वंदनीय झाला.

थोरपण पऱ्हा सांडिजे । व्युत्पत्ती आघवी विसरिजे ।
जै जगा धाकुटे होईजे । तै जवळीक माझी ॥ (९/३७८)

हे विलक्षण तत्त्व त्यांनी अंगी मुरवलं होतं. वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणे स्वामींची । ऐसिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे ॥ १८/१७६४ असं ते नम्रतेने म्हणतात हाच त्यांचा मोठेपणा आहे. आपण लिहिलेला ग्रंथ हे सद्गुरूकृपेचे वैभव आहे असे ते निःसंदिग्धपणे सांगतात.

ऐसे श्रीनिवृत्तीनाथांचे । गौरव आहे जी साचे ।
ग्रंथ नव्हे, कृपेचे । वैभव तिये ॥ (१८/१७५०)

**'स्वरूपबोध भक्तीप्रेमानेच शोभायमान'**

ज्ञानाची परिपूर्णावस्था गाठल्यानंतर त्याच स्थितीमध्ये पूर्णोद्गाराच्या बरोबरीने नम्रता, प्रेम हे भाव त्याहीपेक्षा अधिक ताकदीने ते सर्वांपुढे मांडतात आणि हेच या महापुरूषाने सर्व विश्वजनांना दाखवून दिलेले खरे वैभव आहे.

'हे विश्वचि माझे घर । ऐसी मति जयाची स्थिर ।
किंबहुना चराचर । आपणचि झाला ॥' (१२/२१३)

असा बोध ज्याला झाला त्याने जे मिळवावयाचे ते सर्व मिळवले आहे हे स्पष्ट दिसते. पण इतकं झाल्यावर पुढे,

'याहीवरी पार्था । माझिया भजनी आस्था ।
तरी तयाते मी माथा । मुकुट करी ॥ (१२/२१४) असे ते म्हणतात.

**'सगुणाच्या आधाराने व्यापक आत्मभाव'**

वस्तुतः ज्ञानोबांना सांगायचं होतं ते सर्व भगवद्गीतेचा आधार न घेताही सांगणं त्यांना सहज शक्य होतं. पण भगवद्शरणता पत्करण्यात असलेली गोडी सांभाळून त्यांनी भगवद्प्रणित ज्ञानही सांगितलं.

'कैसे चहूं भुजांचे सांवळे । पाहतां वोल्हावती मन डोळे ।
खेंव देऊ जाईजे तरी आकले । दोहीचि बाही ॥ (११/२९०)

तो भजजनवत्सलु । प्रेमळजन प्रांजळु ।
सत्यसेतु सकळु । कलानिधी ॥ (१२/२४३)
तो श्रीकृष्ण वैकुंठीचा । चक्रवर्ती निजांचा ।
सांगे येरू दैवाचा । आईकत असे ॥ (१२/२४४)

मानवी भावनांना सुलभ असं सगुणावरील प्रेम सांभाळत त्यांनी भगवंताच्या मुखानेच ज्ञानही प्रतिपादन केले.

**सोऽहं ध्यान**

आदिनाथांपासून गहिनीनाथ व निवृत्तीनाथांपर्यंत चालत आलेल्या नाथ संप्रदायाचे ते अध्वर्यु होते. सहाजिकच भगवान शंकरांपासून चालत आलेल्या सोऽहं ध्यानाचे परिपूर्ण वर्णन त्यांनी ज्ञानेश्वरीत ठायी ठायी केले आहे. सोऽहं ध्यान म्हणजे ज्या ध्यानाने तो विश्वव्यापक, सच्चिदानंद परमात्माच मी आहे असा जीवाला बोध होतो ते ध्यान!

**'ध्यानाची पूर्वतयारी'**

ध्यानाला बसण्यापूर्वी विषय मनांतून दूर करून बसावे. संतांनी अथवा सद्गुरूंनी जिथे आश्रय केला आहे अशा ठिकाणी बसावे. अर्थात् आपले घरही ध्यानासाठी आदर्श असू शकते व ते तसे राखण्याची साधकाची जबाबदारीही आहे. अशा पवित्र ठिकाणी बसण्यामुळे मनाला सहजच संतोष वाटेल.

बसल्यावर 'मग तेथ आपण । एकाग्र अंतःकरण ।
करूनि सद्गुरूस्मरण । अनुभविजे ॥ (६/१८६)

सद्गुरूंचे स्मरण झाल्याबरोबर अष्टसात्विक भावाने मन भरून यावे. अहंकार मोडून पडावा. इंद्रियांची कसमस मोडून जावी.

सहजच 'मनाची घडी घडे हृदयामाजी ॥' असे व्हावे.

हे हृदय म्हणजे योगाच्या परिभाषेत हृदयाकाश, चिदाकाश, मस्तकाकाश, व्योमाकाश किंवा मध्नीकाश या सर्व शब्दांचा अर्थ एकच, आपल्या कापाळापाशी ज्या ठिकाणी दोन भुवया व नासिकाचे वरील टोक मिळते ते ठिकाण.

**'आपल्याच श्वासांवर सोऽहंचे अनुसंधान'**

ध्यानाला बसताना सुरूवातीला प्राण व अपान सम म्हणजे सारखे करून थोडा काळ दिर्घश्वसन करावे. त्यावेळी चित्तात विषय नसावेत.

'तैसे चित्त राहिलिया पांडवा । प्राणांचा प्रणवूचि करावा ।
मग अनुवृत्तिपंथे आणावा । मूर्ध्निवरी ॥ (८/११४)

प्राणांचा प्रणव करणे म्हणजे प्राणापानाबरोबर सोऽहंरूपी - ॐकाराचा जप करणे. श्वास घेताना 'सो' व सोडताना 'हं' या सहज ध्वनिचे अनुसंधान राखणे. मात्र श्वास घेतल्यानंतर क्षणभर थांबण्याची सूचना, ते देतात.

'तेथ आकाशी मिळे न मिळे । तैसा धरावा धारणाबळे ॥'
(८/११५)

**'चित्ताकडे साक्षित्वाने पाहण्याचा अभ्यास'**

अशा प्रकारे सोऽहं सहित श्वासाबरोबर चित्त एकरूप करावे व हळूहळू हे चिदाकाशात किंवा मूर्ध्नाकाशांत स्थिर करावे. सोप्या शब्दात सांगायचे तर आपल्या भालप्रदेशांत स्थिर करावे. या ठिकाणी चित्त ठेवून त्याकडे अलिप्तपणे पहात राहावे. 'सहजे तिही संधी भेटी । जेथ भ्रूपल्लवां पडे गांठी । तेथ पाठीमोरी दिठी । पारखोनिया ॥ (५/१५२)

असं ज्ञानेश्वर महाराजांनी याच स्थितीला उद्देशून म्हटले आहे.

**'चित्ताच्या लयापाठोपाठ स्वरूपबोध'**

असंच चित्ताकडे साक्षीभावाने पाहाता पाहाता ज्या चित्तामध्ये सर्व संसार भरलेला आहे तो चित्तरूपी पडदा फाटून जातो. असे सरोवरांतील पाणी आटले की त्या पाण्यात पडलेले प्रतिबिंब आपोआपच नाहीसे होते, तसे चित्त नाहीसे झाल्याने चित्तात प्रतिबिंबित झालेला संसारही संपून जातो.

'जेथ हे संसारचित्र उमटे । तो मनोरूप पटुं फाटे ।
जैसे सरोवर आटे । मग प्रतिमा नाही' ॥ (५/१५६)

चित्त नाहीसे झाल्यावर जो चित्ताकडे साक्षित्वाने पहात होता त्याला म्हणजे आपणा स्वतःला स्वरूप बोध होतो.

तैसे चित्त लया जाये । आणि चैतन्यचि आघवे होये ।
ऐसी प्राप्ती सुखोपाये । आहे येणे ॥ (६/३८६)

**'ध्यानाचे फलित आत्मदर्शन'**

नित्यशः ध्यानाने स्वरूपसुख क्षण दोन क्षण अनुभवणारा जो जीव, तो मी सच्चिदानंद परमात्मा या बोधात या प्रक्रियेने सहजासहजी येतो. आत्मरूप होऊन जातो. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

'तेथ ध्येय ध्यान ध्याता । या तिही एकरूपता ।
होय तंव पंडुसुता । किजे जे गा ॥'(१८/१०३४)

**'ध्यान हि गुरूपदिष्ठ साधना'**

ज्ञानेश्वर महाराजांकडून अशा प्रकारे ध्यानाविषयी समजावून घेतले तरी हे ध्यान तज्ञ व अनुभवसंपन्न अशा सद्‌गुरूंकडूनच शिकले पाहिजे. जो कोणी सद्‌गुरूच्या कृपा अनुग्रहानंतर त्यांच्या मार्गदर्शनाखाली पाच पंचवीस वर्ष ध्यानाचा अभ्यास करील तो ज्ञानेश्वर महाराजांच्या शब्दातच सांगायचे तर ब्रह्मभाव योग्यतेचा होईलच होईल, यात शंकाच नाही. सद्‌गुरूंच्या स्नेहप्रसादानेच सेवक शिष्य सोऽहंसिद्ध व्हावयाचा.

''योगसुखाचे सोहळे । सेवका तुझेनि स्नेहाळे ।
सोऽहं सिद्धिचे लळे । पाळिसी तूं ॥' (१२/४)

**'कर्म करतानाही आत्मबोध'**

एकदा एखादा साधक साधनेने आत्माच मी या बोधात येऊन राहिला की यच्चयावत् कर्मे करीत असतानाही तो त्यापासून अत्यंत अलिप्त व आत्मबोधातच राहतो.

'दिपाचेनि प्रकाशे । गृहींचे व्यापार जैसे ।
देहीं कर्मजात तैसे । योगमुक्ता ॥' (५/४९)
'तो कर्मे करी सकळे । परी कर्मबंधा नाकळे ।
जैसे न सिंपे जळींजळे । पद्मपत्र ॥' (५/५०)

तसेच त्याला कोणत्याही कर्मांचा, गृहादिकांचा त्याग करण्याचीही आवश्यकता नाही. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात 'आता गृहादिक आघवे । ते काही न लगे त्यजावे । जे घेते जाहले स्वभावे । निःसंगु म्हणौनि ॥' (५/२२)

**'सोऽहं हंसारूढच भक्त'**

असा हा महात्मा आपण स्वतः जगत् व परमात्मा यामध्ये भेदबुद्धीने पहातच नाही.

म्हणौनि विश्वपण जावे । मग तै माते घेयावे ।
तैसा नव्हे आघवे । सकटचि मी ॥ (१४/३८०)
ऐसेनि माते जाणिजे । ते अव्यभिचारी भक्ती म्हणिजे ।
येथ भेद काही देखिजे । तरी व्यभिचारू तो ॥ (१४/३८१)

अखंड, व्यापक, अविनाशी, सच्चिदानंद परमात्म्याशी एकरूपता हीच ज्ञानेश्वर महाराजांची भक्ती.

हो कांतरंगु लहानु । परि सिंधुसि नाही भिन्नु ।
तैसा इश्वरी मी आनु । नोहेचि मा ॥ (१४/३८६)
ऐसेनि समरसे । दृष्टि जै उल्हासे ।
तै भक्ति ऐसे । आम्ही म्हणो ॥ (१४/३८७)

**'योग, कर्म, भक्ती व ज्ञान एकरूप'**

आपल्या जीवनाचे ध्यानमार्गी, कर्ममार्गी, भक्तीमार्गी, ज्ञानमार्गी असे स्वतंत्र भाग न पाडता एकाच जीवनात ध्यानाच्या, कर्माच्या, भक्तीच्या, ज्ञानाच्या अंगाने परमात्म्याशी एकरूपता साधावी. सः अहम् परमात्माच मी असा बोध झाला की काम झालं. असा बोध होणं यातच मानवी जीवनाची इतिकर्तव्यता आहे.

ज्ञानेश्वर महाराज हे माझे परात्परगुरू. ज्ञानेश्वरीचे सांप्रत काळातील अंतरंग अधिकारी तसेच माझेच सद्गुरू परमहंस स्वामी माधवनाथांकडून ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरीच्या प्रेमाचा अपूर्व वारसा माझ्यासारख्या शेकडो यःकश्चित जीवांना लाभला. ही मी साक्षात् ज्ञानदेवांची कृपाच समजतो. माझ्या सद्गुरूंनी शिकविलेले जसे माझ्या शक्ती बुद्धीप्रमाणे मला ग्रहण झाले ते सर्व आपणां सद्गुरूस्वरूप प्रेमळ जनांसमोर ठेविले आहे. म्हणूनच त्यातील,

न्यून ते पुरते । अधिक ते सरते ।
करूनि घेयावे हे तुमते । विनवितु असे ॥
॥ हरि ॐ तत्सत् ॥


मकरंद माधव वझे
१९०, शुक्रवार पेठ,
फ्लॅट नं. अ-७,
पुणे - ४११ ००२.



हार्दिक शुभेच्छा

**रंगत डायनिंग हॉल**

● शुद्ध शाकाहारी भोजन ●
● गुजराथी थाळी ●
● सर्व प्रकारच्या पार्टी ऑर्डर्स स्वीकारतो. ●

११७९, बुधवार पेठ,
पहिला मजला, तुळशीबाग,
डायमंडल वॉच कंपनीच्यावर, पुणे ४११ ००२.
फोन : ४५२१५२



*With Best Compliments From*

**FOODS AND INNS LIMITED**

***Government Recognised Export House***

*Queens Mansion*
*3rd Floor,*
*A. K. Naik Marg,*
*Fort, Bombay - 400 001.*
*Tel. Nos. 2873857, 2851297*
*Fax Nos. 2021950, 2041097*

# आश्चर्यकारक शिवाम्बु उपचार

**बाळकृष्ण लक्ष्मण नलावडे**

**शिवाम्बूचा परिचय**

विश्वातील अनेक आश्चर्यांपैकी शिवाम्बु (शिव म्हणजे कल्याणकारी व अम्बू म्हणजे पाणी) अर्थात स्वमूत्र होय. ज्या वेळी मानव व प्राणी निर्माण झाले त्याच वेळी त्यांचे आरोग्य नैसर्गिकरीत्या व सहजपणे सुस्थितीत राहावे म्हणून त्यांच्याजवळ हे दिव्यौषधही दिले गेले. बालकाचे पोषण व संगोपन या साठी निसर्गाने मातेजवळ ज्या प्रमाणे दुधाचे अमूल्य साधन दिले आहे, त्याचप्रमाणे प्राणिमात्रांमध्ये शिवाम्बुची योजना केली आहे.

शिवाम्बू चिकित्सा ही अत्यंत प्रभावी, सुरक्षित, स्वयंभू, सुलभ, शास्त्रीय, विनाऔषधी, विनाखर्च, गुंतागुंतविरहित व विनासायास स्वास्थ्य रक्षण करणारी व रोगमुक्ती करणारी नैसर्गिक उपाययोजना आहे. शिवाम्बु हा प्रत्येक प्राणिमात्राचा विश्वासू "फॅमिली डॉक्टर" आहे!

या चिकित्सेचे वैशिष्ट्य असे की रोग कोणताही असो, त्याची अवस्था कोणतीही असो, त्याचे कारण काहीही असो, रोगनिदान होवो न होवो त्यावर या चिकित्सेचा उपयोग केव्हांही करता येतो. म्हणजेच अत्यंत गुंतागुंतीच्या व महागड्या रोगपरीक्षांची आवश्यकता पडत नाही. शिवाम्बुने कधीही अपाय होत नाही, झाला तर उपायच. कृत्रिम औषधांप्रमाणे कोणतीही वाईट प्रतिक्रिया व दुष्ट परिणाम होत नसल्याने लहान बालकांपासून ते वृद्धांपर्यंत तसेच गरोदर व बाळंत मातांनाही त्याचा बिनधोकपणे उपयोग करता येतो. त्यासाठी तज्ज्ञांच्या मदतीची जरूरी पडत नाही, एका पैशाचाही खर्च नाही, भेसळ होण्याची भीती नाही, तसेच टंचाई निर्माण होऊन औषध बाजारातून अचानक गडप होण्याचा धोका नाही.

शिवाम्बु सर्व-धर्म-सम्मत आहे. सर्व प्रमुख धार्मिक ग्रंथात या चिकित्सेस पुष्टी देणारे संदर्भ उपलब्ध आहेत. अमेरिका, जर्मनी, जपान आदी प्रगत देशात शिवाम्बुवर शास्त्रीय संशोधन झाले असून त्यानुसार शिवाम्बुत कॅन्सर, हृदयविकार, क्षय, मधुमेह इत्यादी घातक विकारांवर प्रभावीपणे कार्य करणारी घटक द्रव्ये असल्याचे सिद्ध झाले आहे. अमेरिकेतील शिकागोच्या एजवॉटर हॉस्पिटलचे विख्यात वैद्यकीय शास्त्रज्ञ डॉ. मॉरिस मेझेल यांनी मानव मूत्रापासून तयार केलेले युरोकायनेस हे औषध हृदय विकारावर अत्यंत प्रभावी असल्याचे सिद्ध केले आहे. (१००० लिटर्स मूत्रापासून १० मि.ली. एक इंजेक्शन तयार होते) हे औषध अत्यंत महाग असून ते मोठ्या प्रमाणात तयार होत नाही. शिवाय त्याचे काही दुष्परिणाम आहेत. डॉ. साहेबांचे म्हणणे असे की मानवमूत्र हा अत्यंत प्रभावी उपचार आहे.

सत्यार्थाने निसर्गोपचार असणाऱ्या या चिकित्सेचा उपयोग अति प्राचीन काळापासून जगातील सर्व देशांत गुप्तपणे केला जात असल्याचे आढळले आहे.

**शिवाम्बुचे घटक व गुणधर्म** : शिवाम्बुमध्ये सोडियम, पोटॅशियम, कॅलशियम, मॅग्नेशियम इत्यादी क्षार तसेच एन्झाईम्स, हार्मोन्स, युरिया, ॲंटिबॉडीज, ॲंटिजेन्स इत्यादी अत्यंत बहुमोल व गुणकारी दिव्य द्रव्ये आहेत.

आपण खाल्लेल्या अन्न व पाण्यापासून शरीरात रक्त तयार होते. या साठी त्या वेळी जरूर असलेले क्षार वगैरे घटक द्रव्ये रक्तात शोषली जाऊन जादा राहिलेली द्रव्ये मूत्रातून बाहेर टाकली जातात. म्हणजेच शरीरातील समतोल राखण्यासाठी मूत्रपिंडे शरीरातील जादा पाणी व इतर द्रव्ये यांचा वेळोवेळी निचरा करतात. याचा सरळ अर्थच असा की हे बाहेर टाकले जाणारे मूत्र टाकाऊ पदार्थ किंवा विष नव्हे. शरीराच्या वाढीसाठी व संरक्षणासाठी लागणारी द्रव्ये मूत्रात सूक्ष्म कणांत विरघळलेल्या स्थितीत असल्याने ती पुन्हा पोटात घेतल्यास त्यांचे शोषण सत्वर व सुलभतेने होते. जर मूत्रातून मोठ्या प्रमाणात विषद्रव्ये बाहेर पडली असती तर आपणांस वारंवार आजारी पडण्याचे प्रसंग आले नसते.

**गुणधर्म** : १) शिवाम्बु हे सर्व रोगातून मुक्त करणारे (Panocea) सजीव रसायन (Live Solution) आहे. २) ते प्रतिकारशक्ती (Resitance Power) वाढवून प्रकृती निरोगी ठेवणारे म्हणजेच शरीरस्वास्थ्य टिकवून आयुष्य वाढविणारे (Elixir) व टॉनिक आहे. ३) ते रोगजंतूनाशक (disintectant) आहे. ४) ते शरीर व रक्त शुद्ध करणारे (Purifier) आहे. ५) ते सडणे व किडे पडणे यास मुळातच प्रतिबंध करणारे (antiseptic) आहे. ६) ते विषहारक म्हणजे शरीरातील विषे व प्रतिकूल द्रव्ये (Toxins) नाहिशी करून बाहेरील विषापासून बचाव करणारे आहे. ७) ते अद्वितीय व निर्दोष रेचक (Cleanser) आहे.

वरील गुणधर्म विचारात घेतले तर शिवाम्बु हे सध्या अस्तित्वात असलेल्या सोयीस्कर गैरसमजुतीप्रमाणे मृत किंवा निर्जीव पदार्थ (Deadmatter) नसून ते खरोखरीच दिव्य रसायन किंवा

संजीवनी (Line Solution) आहे.

**रोगमुक्तीचे कार्य :** शरीराला पुरेसे पोषण न मिळणे, व्यायामाचा अभाव, वाईट सवयी व शरीरात विषे व विजातीय द्रव्ये यांचे प्रमाण वाढणे यामुळे प्रामुख्याने विकार उद्भवतात.

मूत्रपान व मूत्रमर्दन याद्वारे शरीरात जाणारी पोषक द्रव्ये (क्षार, एन्झाईम्स, हार्मोन्स वगैरे) ताकद, शक्ती व चैतन्य वाढवतात. त्याचप्रमाणे विकृत द्रव्ये (अँटिबॉडीज व अँटिजेन्स) शरीरात जाऊन होमिओपाथिक किंवा व्हॅक्सिनेशनच्या सिद्धांतानुसार अँटिबॉडीजच्या स्वरूपात कार्य करून रोगांचा नाश करतात.

शिवाम्बु सजीव रसायन असल्याने ते ज्या शरीरात निर्माण होते, त्याविषयी त्यास संपूर्ण ज्ञान असते. ते शरीरात गेल्यावर रोगव्याप्त अवयवाकडे प्रथम धाव घेते व त्याची नैसर्गिकरित्या प्रतिकारशक्ती व चैतन्य वाढवून रोगमुक्ती करते. हे रोगमुक्तीचे कार्य होताना संपूर्ण शरीर, मन व चैतन्य यांचा एकत्रित विचार होतो. शिवाम्बु शरीरात गेल्यावर ते स्वतः शुद्ध व स्वच्छ *(filter)* बनते व शरीरशुद्धीची क्रिया सुरू करते. शरीरशुद्धीची क्रिया करताना शरीरातील विषारी व विजातीय द्रव्यांचा निचरा करून शरीरात तयार झालेले अडथळे नाहीसे करून निरनिराळे मार्ग साफ व मोकळे करते. तसेच निरनिराळे पिंड, स्नायू, मज्जातंतू, इंद्रिये वगैरे भागांतील विषांचा निचरा करून त्यांना कार्यक्षम व शक्तिशाली बनविते.

या क्रिया होताना सुरूवातीस काही रूग्णांना रोज, जोरदार पातळ शौचास होणे, वांती होणे, नाक वाहणे, अंगावर पुरळ उठून त्यातून स्त्राव झिरपणे, डोके, पोट अगर अन्य ठिकाणी वेदना होणे, आजाराची लक्षणे तात्पुरती वाढणे, हृदयाचे कंपन तात्पुरते वाढणे, गरगरणे इत्यादी प्रतिक्रिया (दुष्परिणाम नव्हे) होण्याचा संभव असतो. ही रोगमुक्तीची लढाई असून शरीरशुद्धीसाठी शिवाम्बु योग्य दिशेने कार्य करीत असल्याचे निदर्शक असल्याने त्याबद्दल निष्कारण धास्तावण्याचे कारण नाही. यामुळे काहीही अपाय होत नाही. थोड्या अवधीत या प्रतिक्रिया आपोआप शांत होतात.

**शिवाम्बु उपवास :** जुनाट विकारात सत्वर गुण येण्यासाठी रुग्णाने प्रकृतीस झेपेल इतका पूर्ण उपवास (सुमारे ७ ते ३० दिवस) करणे आवश्यक आहे. ६० किलोपेक्षा अधिक वजन असणाऱ्या रुग्णांना ३० दिवसांपर्यंत पूर्ण उपवास करणे शक्य होते. हृदयाची क्रिया नियमबद्ध असल्यासच पूर्ण व दीर्घ उपवास करावा. येणारे सर्व शिवाम्बु पिणे व पुरेसे पाणी पिणे आवश्यक असते.

दीर्घ उपवासाचे काळात शरीरास मूत्रपान व मूत्रमर्दन याद्वारे पौष्टिक द्रव्यांचा सतत पुरवठा झाल्याने भुकेची भावना तीव्र होत नाही व अशक्तपणा वाटत नाही. उपवासाचे काळात अन्नाबरोबर शरीरात होणारी विषारी व विजातीय द्रव्यांची आवक पूर्णपणे थांबून मूत्रपान व मूत्रमर्दन यामुळे शरीरात साठलेली विषद्रव्ये नाहीशी होऊन प्रकृती दुरूस्तीचा वेग झपाट्याने वाढतो. अन्नपचन व दैनंदिन कामे करण्यासाठी लागणाऱ्या शक्तीची बचत झाल्याने ही शक्ती रोगमुक्तीच्या कार्यास उपलब्ध होऊन लवकर बरे वाटते.

ज्यांना पूर्ण उपवास झेपणार नाही त्यांनी अंशतः उपवास करावा. अशावेळी भाज्यांचे सूप, गोड फळांचे रस, मुगाचे कळण, भाताची पेज, भिजवलेल्या खजुराचे सरबत, कोवळ्या नारळाचे पाणी यांचा उपयोग करावा.

दीर्घ उपवासांत शरीरशुद्धीची गती वाढल्याने नाडीगती व हृदयाचे कंपन वाढून अस्वस्थता वाटण्याचा संभव असतो. ही प्रतिक्रिया टाळण्यासाठी दररोज किमान एक तास ४ ते ७ दिवसांच्या शिळ्या मूत्राने सर्व शरीरास हलक्या हाताने मर्दन करणे आवश्यक आहे. मर्दन करताना मूत्र थोडे कोमट करून घ्यावे. शिळ्या मूत्राऐवजी ताजे मूत्र स्टेनलेस स्टील भांड्यात २-३ मिनिटे उकळून कोमट झाल्यावर वापरता येते. मर्दन झाल्यावर दोन तासांनी स्नान करता येईल. साबण वापरू नये. त्या ऐवजी त्रिफळा चूर्ण अथवा शिकेकाई वापरावी.

त्वचेवर व्रण, फोड, पुरळ, जखम व सूज असल्यास त्या भागावर मर्दन करू नये. स्वच्छ कापडाची चार पदरी घडी मूत्रात भिजवून तासभर ठेवावी.

हृदयविकार, क्षय, अलसर, मधुमेह, रक्तदाब, ६० कि. पेक्षा कमी वजन असणारे अशक्त रुग्ण, ज्यांची अगोदरच उपासमार झाली आहे असे रुग्ण, सतत औषधे घेणारे रुग्ण व ज्यांना झेपणार नाही त्यांनी दीर्घ व पूर्ण उपवास करू नये. त्यांनी एकभुक्त राहून किंवा अंशतः उपवास करावा. उपवास काळात जरूर पडल्यास कोमट पाणी व शिवाम्बु मिसळून एनिमा घ्यावा. निसर्गोपचार शास्त्राप्रमाणे २१ दिवस पूर्ण उपवास केल्यास जेवढा लाभ होतो तेवढा लाभ शिवाम्बु उपवासात सुमारे ७ ते ९ दिवसांत होतो.

दीर्घ उपवास सोडताना फक्त लिंबू, मोसंबी रस किंवा दोन चमचे मध, पाव कप कोमट पाण्यातून घ्यावा. कोवळ्या नारळाचे पाणीही घेता येईल. २-३ दिवस हळूहळू फळांच्या रसाचे प्रमाण वाढवल्यावर नंतर पातळ आहार घ्यावा. पचेल त्यानुसार आहार वाढवावा. एकदम पूर्ण आहार घेणे धोक्याचे असते. किरकोळ आजारात मूत्रमर्दन अधूनमधून केल्यास पुरेसे होते.

रोगमुक्तीनंतर शिवाम्बुपान चालू ठेवावे, त्यामुळे पुन्हा आजारी पडण्याची पाळी येणार नाही.

**शिवाम्बुपान :** ताजे शिवाम्बु प्राशन करावे. पहिली चमचाभर धार टाकून द्यावी. घृणा नाहीशी होण्यासाठी चेहऱ्यास व ओठास मर्दन करणे, हिरड्यांना लावणे, गुळण्या करणे अशी सुरूवात करता येईल. मोठ्या माणसांसाठी एका वेळचे प्रमाण १ ते २ कपभर.

हळूहळू प्रमाण वाढवावे. ३ वर्षांपर्यंतची मुले १ ते ८ चमचे (१ चमचा = ५ मि.लि.), ९ वर्षांपर्यंतची मोठी मुले पाव ते अर्धाकप (१ कप = १२० मि.लि.), किरकोळ आजारात दिवसातून (२४ तास) २-३वेळा प्राशन करावे. जुनाट आजारात ४ ते ८ वेळा घ्यावे. स्त्रियांनी मासिक पाळीचे सुमारे ४ दिवस सोडून शिवाम्बुपान करावे. प्रमाण कमीजास्त झाल्यास अपाय होत नाही. शिवाम्बुने नस्य केल्यास सर्दी, पडसे, खोकला, दमा आदी विकारांत लवकर गुण येतो.

कोणत्याही विकारात शिवाम्बु आहे तसेच ताजे घ्यावे. ते गाळून घेणे किंवा त्यात मध, पाणी किंवा इतर बाह्य द्रव्य मिसळण्याची जरूरी नाही. औषधे चालू असतानाही शिवाम्बु उपचार करता येतात. मध्यंतर भोजनानंतर एक तासाने, तत्पूर्वी १/२ तास. ॲलोपाथिक औषधानंतर ३ तासांनी, होमिओ, आयुर्वेदिक औषधानंतर २ तास. कोणत्याही औषधापूर्वी एक तास. रात्री झोपमोड झाल्यास घेता येते. मधुमेह, दमा, अल्सर, हृदय विकार, रक्तदाब इत्यादी विकारांत आवश्यक औषधे चालू ठेवावीत.

**वैद्यकीय तज्ज्ञांचे आक्षेप :** इतर औषधोपचार निष्फळ झाल्यावर सुमारे ९० टक्के रुग्णांना शिवाम्बु चिकित्सेने गुण येतो. असे अनुभवास आले आहे. भर तारूण्यात सुमारे १५ वर्षे मला अनेक जुनाट विकारांनी ग्रासले होते. माझे शरीर अनेक विकारांचे 'म्युझियम' झाले होते. मी जगणार नाही असा निर्वाळा एका परदेशी जाऊन आलेल्या तज्ज्ञ डॉक्टरांनी दिला होता. तरीही मी शिवाम्बुने २५ वर्षांपूर्वी पूर्ण रोगमुक्त झालो. अशी अनेक उदाहरणे आहेत. शिवाम्बु चिकित्सा निर्दोष अनुभवांच्या भक्कम पायावर ठामपणे उभी आहे. ही चिकित्सा घातक आहे असे शास्त्रीय कसोटी लावून आजपर्यंत कोणीही सिद्ध करू शकले नाही. यावरून शिवाम्बु निसत्व, टाकाऊ व विषारी आहे हा निव्वळ दिशाभूल करणारा प्रचार आहे हे स्पष्ट होत आहे.

रुग्णांना उपचार करण्याचा हक्क व अधिकार फक्त आपलाच आहे. या मक्तेदारीच्या मनोवृत्तीमधून तज्ज्ञांचे आक्षेप निर्माण झाले आहेत. या सर्व पूर्वग्रहदूषित आक्षेपांना एका वाक्यातच समर्पक उत्तर द्यायचे झाल्यास असे म्हणता येईल की एक ग्रॅम अनुभव कित्येक किलोग्रॅम उपपत्ती, अनुमाने, मते, शाब्दिक युक्तिवाद, तत्त्वज्ञान यापेक्षा अधिक मोलाचा असतो.

**शिवाम्बुचा प्रचार व पुरस्कार :** रुग्णांच्या आग्रहावरून मी १९७४ मध्ये प्रथम शिवाम्बुवर मराठी ग्रंथ लिहिला. प्रकाशक मिळेना म्हणून कर्ज काढून प्रकाशक झालो. विक्रेता मिळेनात म्हणून स्वतःच प्रती खपविल्या. हजारो प्रतींची विक्री झाली. आता पाचव्या सुधारित आवृत्तीची छपाई चालू आहे. सुरुवातीस हितसंबंधितांकडून प्रखर विरोध व उपद्रवही झाला.

या ग्रंथास महाराष्ट्र राज्य सरकारचा पुरस्कार व पारितोषिक मिळाले. महाराष्ट्र राज्य ग्रंथालय, संचालनालय यांचा पुरस्कार मिळाला. युनायटेड स्टेटस्, लायब्ररी ऑफ काँग्रेस अमेरिका यांनी न मागता पुरस्कार दिला. अनेक नामवंत तज्ज्ञ डॉक्टर्स व वैद्यांनी पुरस्कार दिला.

दी वर्ल्ड काँग्रेस ऑफ नॅचरल मेडिसिन्स या जागतिक संस्थेच्या निमंत्रणावरून मद्रास येथे संस्थेच्या अधिवेशनात १९९१ मध्ये या चिकित्सेवर निबंध वाचला. अनेक शिवाम्बु चिकित्सा सम्मेलने भरविली. १९६९ पासून गेली २५ वर्षे पुण्यात सल्ला केंद्र चालवून गरजू रुग्णांना पोस्टाने व समक्ष विनामूल्य मार्गदर्शन केले. अनेक ठिकाणी व्याख्याने दिली. जानेवारी १९८७ मध्ये पुणे म्युनिसिपल कॉर्पोरेशनमधून डेप्यु. सिटी इंजिनिअर म्हणून निवृत्त झाल्यानंतर हे कार्य पूर्ण वेळ करीत आहे.

रोगमुक्त झालेल्या रुग्णांमध्ये मंत्री, खासदार, आमदार, पुढारी, अधिकारी, वैद्यकीय तज्ज्ञ, वैद्यकीय विद्यार्थी, शास्त्रज्ञ, न्यायमूर्ती, प्राध्यापक, सिनेनट-नटी, उद्योजक, कामगार इत्यादींचा समावेश आहे.

इंडियन बोर्ड ऑफ अल्टरनेटिव्ह मेडिसिन्स, कलकत्ता या मान्यवर संस्थेने माझ्या कार्याचे परस्पर मूल्यमापन करून कलकत्ता येथे डिसेंबर १९९३ मध्ये भरलेल्या जागतिक आरोग्य परिषदेत मला सुवर्ण पदक प्रदान केले व सदर संस्थेचे ऑनररी ॲडव्हायझर म्हणून नियुक्त केले. हा सर्वोच्च सन्मान आहे. परंतु मी निमित्तमात्र आहे.

सर्व भारतभर फिरून शिवाम्बुचा प्रसार केला. त्याचप्रमाणे अमेरिका, कॅनडा, इंग्लंड (दोनदा), सिंगापूर, ऑस्ट्रेलिया, जर्मनी, फ्रान्स, इटली, हॉलंड व स्वित्झर्लंड या दहा देशांमध्ये प्रचारदौरे केले. प्रत्येक प्रवासात पत्नीचा सहभाग होता.

जय शिवाम्बु!


सल्ला केंद्र :

बा. ल. नलावडे

३ राखी अपार्टमेंटस्, प्लॉ. नं. ३१, रामबाग कॉलनी,

आनंद नगर समोर, कॅनरा बँकेशेजारी, पौड रोड,

कोथरूड, पुणे - ३८.

फोन : ३६३००४

गुरूवार व रविवार सोडून दु. ३ ते ५

# प्रिय बाई पुन्हा आठवतात

**सौ. प्राची जावडेकर**

काही पुस्तकच मोठी वेधक असतात. "एक होता कार्व्हर" वाचला आणि मनाची भावुकता पार टोकला गेली. अन्याय, धिड यापेक्षा अधिक मनात रेंगाळले, "कार्व्हर"ची चिकाटी. प्रतिकूल परिस्थितीवर मात करण्याचे असीम धैर्य आणि नंतर ध्येयाच्या वाटेवरचा त्याचा प्रवास. सुजनशीलता, साधेपणा, मायेचं पांघरूण घालणारा कार्व्हर. गरिबी, दारिद्य यावर कार्व्हरच्या हुशारीने मात केली. त्याची असामान्य बुद्धीमत्ता, प्रगतीत अडथळा बनूच शकली नाही. पण असे सारेच नसतात. दारिद्य गरिबी याबरोबर सुमार बुद्धीमत्ता असणारेच जास्त आहेत. त्यांच्या व्यथेला नेमकं टिपणारी स्पंदने "लेटर टू अ टीचर" या छोटेखानी पुस्तकात आहेत. खरं तर हे पुस्तक फार पूर्वी १९६९ साली प्रकाशित झाले आहे. २० वर्षांचा कालावधी उलटला. पण या पुस्तकाचे आठ चिमुकले लेखक जे विद्यार्थीच आहेत त्यांनी उपस्थित केलेले प्रश्न सुटले नाहीत. या पुस्तकाचा अनुवाद १९७० साली सुधा कुलकर्णी यांनी केला आहे. ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत पु. ल. देशपांडे म्हणतात "हा काही कविता संग्रह नव्हे तरी देखील गेल्या वर्षात हे मी पुन्हा वाचलं". या चिमुकल्या पुस्तकाने माझी झोप उडविली, असे अत्यंत प्रत्यंकारी असे हे पुस्तक आहे.

काय आहे या पुस्तकात? तुस्कानी मधल्या मुगेल्लो विभागातल्या डोंगराळ भागात राहणाऱ्या शेतमजूरांची वस्ती छोटेखानी वसाहत म्हणजे बार्बीयाना. या बार्बीयानातल्या कैक मुलांनी परीक्षेत नापास होऊन शाळा सोडून दिली. या मुलांना डॉन लोरंझो मिलाबी या फादरने एकत्रित आणून शाळा सुरू केली. ही शाळा, ह्या शाळेचा अभ्यासक्रम आयुष्याशी निगडीत होता. याच शाळेतील मुलांनी शाळा, अभ्यासक्रम, परीक्षापद्धती गरीब मुलांसाठी किती अन्यायकारक आहे, चुकीची आहे हे निदर्शनास आणून देणारे एक दीर्घ पत्र आपल्या बाईंना लिहिले. "प्रिय बाई", त्यांना मुलांनी सांगितले नेमकंपणाने. कोणता बदल अपेक्षित आहे ते साध्या शब्दात. अचूकपणे सामाजिक व शैक्षणिक क्षेत्रातल्या नाजूक वर्मावर बोट ठेवणारे हे पुस्तक इटलीत तर गाजलेच पण पुढे जगभर याचे अनुवाद विविध भाषांत झाले. या पुस्तकाने मांडलेली व्यथा देश, प्रांत भाषा या साऱ्या सीमारेषा ओलांडून सार्वत्रिक आहे. ही व्यथा आहे, सर्वसामान्य विद्यार्थ्यांची, कोवळ्या वयात असमानतेचे चटके दाहकपणे जाणवणाऱ्या तुमच्या आमच्या प्रतिनिधिक वर्गाची.

आजही २० वर्षानंतर हा प्रश्न तितकाच ज्वाल्य आहे. किंबहुना भारतात तर अधिक तीव्र झालेला 'आढळतो. मुलांच्या गळतीचे प्रमाण वाढतच आहे. याला प्रतिबंध कोणता? म्हणून विचार करण्याची वेळ आली आहे. शैक्षणिक आकृतीबंधात सर्वाधिक महत्त्वाच्या घटकांने, विद्यार्थ्यांनी लिहिलेले पुस्तक आजही नुसते वाचनीय आहे नव्हे तर चिंतनीय आहे.

पुस्तकात या मुलांनी दोन प्रतिनिधी गटांचा विचार केला. एक गट आहे शेतमजूर, कामगार याचे प्रतिनिधीत्व करणारा "गियानी." तर दुसरा मध्यम, उच्चमध्यम वर्गीय गटाचा प्रतिनिधी. त्याला "पिएरिनो" हे नांव ठेवलं. (या पुस्तकात गियानींनी बारंवार उदाहरणादाखल दाखविले.) पिएरिनोला शिक्षण हा सहजप्राप्त अधिकार आहे. नापास होण्याचे भय त्याला नाही. पण गियानी एकदा का नापास झाला की शिक्षणाला पूर्णविरामच मिळणार. गियानीच्या घरी आईला वाचता येत नाही. कारण पिएरिनोच्या आईला घरात मदत करण्यासाठी, ती आपल्या मुलांची हेळसांड करते. असामान्य हक्क उपभोगणारे सामान्यांचे शोषण करून तर ते उपभोगतात. मग "उदाहरणादाखल ते म्हणतात, एका एम.डी. मागे गरीब ४५,८६०/- रू. मोजतो व त्याचा वापर ४४०/- रू. पण ज्या गरीबाने ही पदवी त्याला बहाल केली त्याला १५ मिनिटांच्या व्हिजीटसाठी १५ रू. चे बील तो लावेल. विमा योजनेविरूद्ध संपावर जाईल" हे सारे शोषण केवळ दोन ध्रुवासारखे असणारच. आर्थिक फरक असेपर्यंत होतच राहणार आणि प्रगती करून विकास साधण्यासाठी जर शिक्षण घ्यायचे ठरले तर अनंत अडचणींना तोंड द्यावे लागते.

या पुस्तकात पूर्वार्धात मुले सुधारणा सुचवतात. ह्या सुधारणा खालीलप्रमाणे आहेत.

१) विद्यार्थ्यांना नापास करू नका.

२) निर्बुद्ध वाटणाऱ्या मुलांसाठी दिवसभराची शाळा ठेवा.

३) आळशासमोर काही उद्दिष्ट ठेवा.

या प्रत्येक उपायांचा साधक बाधक विचार करून त्यांनी हे मांडले आहे. या पद्धतीत गियानी शाळेच्या वाटा चालू शकेल. तो सतत नवेनवे शिकत राहील. आम्हा साऱ्यांना बोलण्याची ताकद येईल आणि सत्ताधाऱ्यांना हे समजेल. उत्तरार्धात या पुस्तकात अनेक विषयांच्या अभ्यासक्रमात फेरबदल सुचवलेले आहेत. विशिष्ट पठडीतून विशिष्ठ कोनातूनच शिकवण्याचे मूल्यमापन करण्याचे कळकळीचे आवाहन केले आहे. संस्कृती, धर्म, तत्त्वज्ञान, कलाकौशल्य याचे सामाजिक संदर्भ

लक्षात घ्या. इतका व्यापक दृष्टीकोन हे पुस्तक सांगते.

प्रश्न निर्माण करून मनाला अस्वस्थता आणणाऱ्या पुस्तकांच्यापेक्षा म्हणूनच हे पुस्तक आगळेवेगळे आहे. विचार करायला लावणारे, मार्ग दाखविणारे, असे हे "प्रिय बाई" आजही आकर्षित करते.

आज भारतातही गियानी, पिएरिनो यासारखे "इंडियन" "भारतीय" असे गट आहेत. भारताच्या विशाल (देशात) क्षेत्रात खेडोपी दूरवर शिकत असणारे, शिकण्याची धडपड करणारे आमचे "भारतीय विद्यार्थी" हे आमच्या अभ्यासक्रमात विचारत घेतलेच नाही असे वाटावे अशी सद्यस्थिती आहे. गणित, इंग्रजी, इतिहास, भूगोल या अभ्यासक्रमांचा पुनर्विचार केला पाहिजे. खरं तर "शाळा" शालेय साधने, शाळांच्या वेळा इथपासून ते गणवेश स्पर्धा, परीक्षा पद्धती या साऱ्यांचा साकल्याने उहापोह केला पाहिजे.

शैक्षणिक बदलांविषयक ध्येय धोरणे ठरविताना, महाविद्यालयीन शिक्षण उच्च शिक्षण यामधील बदल विचारात घेण्यापूर्वी प्राथमिक शिक्षण माध्यमिक शिक्षण याचा प्रसार, त्याची उपयुक्तता, याचा नेमकेपणे विचार केला पाहिजे. दररोज वर्तमानपत्रात शाळांच्या अनास्थाविषयक बातम्या येतात. शाळा आहेत, शिक्षक नाहीत, शिक्षक आहेत फळा, खडू नाही तर कुठे मुलेच नाहीत. ही प्रगतीशील भारताची क्रूर थट्टा नाही का? शिक्षणावर भारत सरकारच्या आठव्या वार्षिक अंदाजपत्रकानुसार १९६,००० कोटी रूपये खर्च होतो. त्यामधील ९२,०१० कोटी खर्च हा प्राथमिक शिक्षणासाठी तर उर्वरित खर्च माध्यमिक व उच्च तांत्रिक शिक्षणावर खर्च होतो. खरा प्रश्न आहे यामधला किती खर्च उत्पादक आहे? किती अनुशेष? हा योग्य पद्धतीने वापरला जातो? ही अनुत्पादकता प्राथमिक शाळांमधून असणाऱ्या गळतीमुळे लक्षात येईल. (निरक्षरतेच्या टक्केवारीवरून जाणवते) पण हे दूर करण्यासाठी उपाय कोणते? अनेक प्रौढ शिक्षण योजनासुद्धा अयशस्वी होताना दिसतात. अपेक्षित दराने साक्षरता वाढत नाही. याची दखल घेणे आता क्रमप्राप्त झाले आहे. कोठारी आयोगाने आपल्या देशातील शिक्षणाविषयी लिहिताना म्हटले आहे की, "सध्याच्या शिक्षणाचा विकास प्रयत्नाशी कुठेही संबंध नाही. अतएव ते कुचकामी आहे." आता नेमकं काय सुधारायचे आहे? या तपासणीचा पहिला टप्पा प्राथमिक, पूर्व प्राथमिक शाळांचा आहे. "शाळेत मुले येऊ शकत नाहीत तर शाळा त्यांच्या घरी न्या." ताराबाई मोडकांनी कोसबाडच्या परिसरात ही कल्पना पहिल्यांदा रूजवली. त्यातून अंगणवाड्यांचा विकास झाला. बालवाड्या अंगणवाड्यात मुले, मुली येतील याची खातरजमा करून घेणे पहिला टप्पा आहे. मग प्रवास सुरू होतो पहिली, दुसरी, एकापाठोपाठ एक टप्पा आखलेला, नेमलेला असतो. पहिली पासून मुलांना भाषा, शास्त्र, गणित अशा नेमून दिलेल्या विषयांचा अभ्यासक्रम पूर्ण करावयाचा आहे. आता हे क्रमिक अभ्यासक्रम सर्व भौगोलिक क्षेत्रासाठी समान आहेत. उदा. महाराष्ट्रात "गणिताचे पुस्तक", पुणे, मुंबई ते धडगाव किंवा माळजेवाडी इथपर्यंत साऱ्यांना सारखेच. गणिताच्या पुस्तकांत, बालभारतीत असणाऱ्या उदाहरणांना, धड्यांना गंध शहरीकरणाचा आहे. "रोज गवळ्याकडून १ लिटर दूध घेतल्यास आठवड्यात किती दूध लागेल?" उदाहरण सोडवण्यापूर्वी माळजेवाडी शिकणाऱ्या धोंडूला रोज १ लिटर दूध हेच आश्चर्य होते. कारण दूधाशिवाय काळा गुळाचा चहाही चैनीची कल्पना आहे किंवा शास्त्रात लहान पानाची झाडे, मोठ्या पानाची झाडे, ग्रामीण भागातला मुलगा त्याच्या परिचीत झाडांची नांवे लिहील. सुबाभूळ त्याच्या जाती, याची माहिती त्याला गुलाब, कलमी गुलाब यापेक्षा जास्त आहे. असे कित्येक विरोधाभास या अभ्यासक्रमात आहेत. समान अभ्यासक्रम म्हणूनच शिक्षणाच्या प्रगतीतील खिळ आहे.

अभ्यासक्रम ग्रामीण अविकसित भागाशी सुसंगत असला पाहिजे. भाषा, शुद्धलेखन, भाषेची शुद्धता, व्याकरण याचा पराकोटीचा आग्रह मुलांना शिकण्याच्या प्रेरणेपासून परावृत्त करतो. मैलागणिक, भाषा उच्चारण बदलते. मग सर्व ठिकाणच्या मुलांना काटेकोर नियम लावून "भाषेचा" पेपर काढला व तपासला तर मुले नापासच होणार आणि मूळ साध्यापासून दूर जाणार. याचसाठी साधनामध्ये बदल करण्याचा पर्याय विचारात आणायला हवा.

गणित शिकवताना मूळ आकडेमोड व्यावहारिक हिशेब, तोंडी गणित येणे हे ध्येय ठरविले तर "गणितात हातचा कुठे लिहीला" हा वादाचा मुद्दा ठरणार नाही. वस्तुस्थितीत गणितात आकड्यापेक्षा आकडेमोडीच्या पद्धतीला अधिक महत्त्व दिले गेले आहे असे आढळते. असे अनेक तपशील विसंगत आहेत. प्रश्न आहे ही विसंगती आहे हे लक्षात आल्यावर आम्ही काय करणार?

खरं तर ग्रामीण भागातील शाळा, त्यांचा अभ्यासक्रम विचारात घेताना त्याचबरोबर अनेक मुदयांचा विचार करावा लागेल. उदाहरणार्थ "पावसाळा" शेतकऱ्यांचा कामाचा ऋतू आहे. शेतीच्या या कामासाठी घरदार खपत असते. या काळात घरातल्या मुलाला शाळेत पाठवून, मजुरीला पैसे देणे गरीब शेतकऱ्यांना परवडत नाही. मग सोपा पर्याय काय. "मुलांची शाळा बुडवा, नाहीतरी तू मोठा मास्तर होणार" याचे परिणाम मुलांना शाळेत उपभोगावे लागतात. अभ्यास बुडतो, पाठीमागे राहतो, तो बुट्ट्या मारतो म्हणून शिक्षकसुद्धा नाराज राहतात. अंतिमतः नापास होऊन शाळा सोडून देणे हेच घडते. मग आपल्या शाळांचे वेळापत्रक बनविताना हे लक्षात घ्यायला नको का? मुलांनी याहीउपर शाळेत यायचे ठरविले तरी पावसाळ्यात रस्त्यांची काय दुर्दशा असते? नाले भरून वाहू लागले की तो मुलगा शाळेपर्यंत वाहतुकीच्या साधनाशिवाय कसा पोहोचणार? असे असंख्य प्रश्न आहेत. शाळांची संख्या वाढवून

केवळ हे प्रश्न सुटणार नाहीत. शाळांचे वेळापत्रक कार्यानुभव, शारीरिक शिक्षण साऱ्यात बदल करावा लागेल. शाळेचे गणवेश, शाळांची शिस्त इ. अनेक घटकांचे पुर्नमूल्यांकन गरजेचे आहे.

अस्तित्वात असणारी शिक्षण पद्धतील केवळ उच्चवर्गीयांचा विचार करून अंमलात आणली आहे हे वारंवार जाणवते. परीक्षा पद्धती, मूल्यांकन पद्धती हा विषय अजूनच गहन आहे. या परीक्षा पद्धतीत "स्मरणशक्ती" ची चाचणी घेतली जाते. लिहिण्याचा वेग, अचूकता यावर श्रेणी अवलंबनू असते. ज्याला हे तंत्र जमेल तो हुशार ठरतो. पाटी आहे पण पेन्सिल नाही अशा विद्यार्थ्यांनी वेगाने उत्तरे कशी लिहावीत? ज्याला कविता पाठ करायला आवडेल पण ओळ चुकली, तो अडखळला, तर घरी सांगायला कुणी नाही, त्यांनाही तेच होण्यासाठी तेच नियम, मग लाल पेनाची एक अधोरेखित रेघ सारे संपवते. शिक्षण कधीच संपते. कारण नापास होण्याची भीती, दडपण, नाविन्याची जाणिवा बंद करून टाकते.

या साऱ्यांचा एकत्रित विचार करणे गरजेचे आहे. या साऱ्या प्रश्नांना "प्रिय बाई" बार्बीयानाची शाळा यामुळे पुन्हा एकदा उचल खाली. "गियानी"चे प्रश्न सोडविण्यासाठी "शिक्षक" या नात्याने आमचे उत्तरदायित्व आहे. समाज म्हणून आमचे उत्तरदायित्व.

या विषयावर अनेक तज्ज्ञ व्यक्तींशी चर्चा करून सुधारणाच्या दिशेने जाण्याची गरज आहे. म्हणूनच गियानीनी सुचविलेल्या सुधारणा उपाय योजना आहेतच. आपण ही विसंगती लक्षात ठेवून सुसंगतीकडे जाऊ.

१) आम्ही विचार करू आमच्या मुलांचा, त्यांच्या भाषेचा, त्यांच्या विकासाचा.

२) आम्हाला आस पाहिजे खऱ्याखुऱ्या ज्ञानदानाची.

३) आमच्या शाळा आम्ही बिनभिंतीच्या करू आणि मुक्त शिक्षणाकडे नेऊ.

४) आम्ही भारतीय आणि इंडियन झगडू. ही दरी दूर करण्यासाठी सारे भारतीय असण्याचा आग्रह आम्ही धरू. त्यालाच प्रतिष्ठा देऊ.

५) आम्ही कात टाकू पाश्चात्यांच्या अंधानुकरणाची आणि घडवू आमचे अभ्यासक्रम. शिकवू या मातीचा भूगोल, इतिहास.

६) आम्ही आमच्या मुलांना शिकवू असे शिक्षण ज्यामुळे त्यांना माणूस कळेल ते जागविल माणुसकीला. आमची नाळ समाजापासून तोडणार नाही.

७) आम्ही सारे मिळून वसा घेऊन "समाज घडविण्याचा" विकृतीकडून संस्कृतीकडे जाण्याचा हा प्रवास असेल.

आम्ही आमचे शिक्षण जीवनोपयोगी, समाजभिमुख असेल जे आम्हाला शिकवेल.

सौ. प्राची जावडेकर
८, "शरावती", पत्रकारनगर, पुणे - ४११ ०१६.

खऱ्या अर्थाने अर्थ सार्थ करणारी विश्वेश्वराचा अर्थदिप

**दि विश्वेश्वर सहकारी बँक लि. पुणे**

● मुख्य कचेरी ●
४७१/४७२ मार्केटयार्ड, गुलटेकडी, पुणे - ३७. फोन नं. : ६५१७५५, ६५२७४५

**विविध बचत योजनांतुन अर्थपूर्ण अर्थ बचतीसाठी**
**समृद्धीच्या वाटेने रौप्य महोत्सवाकडे वाटचाल करणारी बँक**
**सर्व शाखांमध्ये लॉकर्स सुविधा उपलब्ध**
**नजीकच्या शाखेस अधिक माहितीसाठी अवश्य भेट द्या.**

१) मार्केटयार्ड शाखा : ४७१/४७२, गुलटेकडी, मार्केटयार्ड, पुणे - ३७.
२) गणेश पेठ शाखा : ४५/४६, रविवार पेठ, कस्तुरे चौक, पुणे - २.
३) धनकवडी शाखा : सर्व्हे नं. २०/१, पुण्याई, सातारा रोड, पुणे - ४३
४) फुरसुंगी शाखा : स. नं. १६९, सत्यपुरम सासवड रोड, फुरसुंगी, जि. पुणे.
५) बाणेर रोड शाखा : स. नं. ८५/८६ गणेशखिंड रोड, औंध, पुणे - ७.
६) यमुनानगर, तळवडे रोड शाखा : ४५/१/अ, जाधव चेंबर्स, आकुर्डी, पुणे - ३५.

के. के. गाभणे — सरव्यवस्थापक
टि. आर. आटोळे — उपाध्यक्ष
एस. डी. होनराव — अध्यक्ष

# अमृतानुभव (एक परिचय)

माधव देव

अध्यात्मांत आस्था असणाऱ्या लोकांपुढे मी मुक्त कसा होईन, ही एक ज्वलंत समस्या असते. समर्थ रामदासांनी, त्यावेळच्या राजकीय व सामाजिक पार्श्वभूमीत, आपला दासबोध हा प्रसिद्ध ग्रंथ लिहिला. त्यांत परमार्थाबरोबरच इतर दुसरे व्यावहारिक विषयही हाताळले गेले असल्यामुळे, मानवमुक्ती हा मुख्य विषय असणे शक्य नव्हते. म्हणून दासबोध हा ग्रंथ वाचूनही आपल्या शिष्यास मुक्तीचे रहस्य कळले नाही, हे समर्थांच्या ध्यानात येताच 'मी' निर्मूलन करण्यास त्यांनी 'आत्माराम' हा एकशे त्र्यांशी ओव्यांचा छोटा ग्रंथ लिहिला. (पाहा आत्माराम १/२०/२१) दासबोधींचे समासीं । निर्मूळ केले मीपणासी । तया निरूपणेही वृत्तीसी । पालट दिसेना ।। म्हणोनि न पुसतां सांगणे । पढले शिष्या तुजकारणे ।। अगदी हीच्या हीच गोष्ट संत ज्ञानेश्वरांच्या "अमृतानुभव ह्या ग्रंथाची पण आहे. एवढा ज्ञानेश्वरी हा विस्तृत ग्रंथ लिहूनही आपल्या मुक्तीचा अनुभव लोकांपुढे ठेवण्याकरिता, त्यांनी आपले वडील बंधू व गुरू निवृत्तीनाथ, ह्यांचा सांगण्यानुसार, अमृतानुभव हा ग्रंथ लिहिला.

आता, ज्या ह्या 'मी' पणापासून आपली सुटका करून, मनुष्य मुक्तानंद भोगू शकतो, तो 'मी' म्हणजे काय? अमृतानुभव ह्या आपल्या पुस्तकात, संत ज्ञानेश्वरांनी ह्या 'मी' चा उदय, त्याचे अस्तित्व आणि त्याचा विलय ह्याचे विश्लेषण करून, आपल्या अनुभवावरून मुक्त मनुष्य, आनंदमय जीवन कसे जगत असतो, ह्याचे बहारदार वर्णन केले आहे. आपल्या ह्या अनुभवाचा, वाचकांनी पण लाभ घ्यावा, हाच ह्या ग्रंथरचनेचा हेतू आहे. पहा अमृतानुभव अध्याय १०/१९ ।। ज्ञानदेव म्हणे श्रीमंत । हे अनुभवामृत । सेवुनि जीवन्मुक्त । हेचि होतु ।।

ग्रंथारंभापूर्वी मंगलाचरणाचे संस्कृतमध्ये पाच श्लोक लिहून, संत ज्ञानदेवांनी पुढील आपल्या सर्वांकरिता मराठी भाषेत लिहिलेल्या ह्या पुस्तकाचा पाया घातला आहे. ह्या पाच श्लोकांत मानवी जीवनाचे तथ्य सांगून, ज्ञानदेवांनी आपल्या ह्या ग्रंथाच्या पुढील दहा अध्यायांत, त्याचा आविष्कार केला आहे. त्यांचे म्हणणे आहे की आनंदमय, सृजनशील, कधीही न झिरपून जाणारी शिवस्वरूप विश्वव्यापी ऊर्जा, हीच मानवाच्या उदयाचे कारण आहे. ती निवृत्तस्वरूप असल्यामुळे, ज्ञानदेव त्या ऊर्जेस निवृत्तिनाथ म्हणून संबोधितात. हिचे दोन भागात विभाजन झाल्याकारणाने, पृथ्वीवर मानवाची उत्पत्ती होते. आणि ह्या दोन भागांचा आपसातील खेळ आजन्म चालत असतो. संसार पसरत असतो आणि मानव आपले मूळ स्वरूप विसरतो. ह्या विभाजन झालेल्या दोन भागांचा, परत आपसात विलय झाल्याशिवाय मनुष्य मुक्त होणे शक्य नाही. ते भाग एकत्र झाले, म्हणजे मानवातील ऊर्जा परत आपल्या शिवस्वरूपात विरून जाते, मग मात्र मुक्त झालेल्या मनुष्यास, केवळ आनंदमय जीवन जगता येणे शक्य होते.

आता आपण मूळ ग्रंथाकडे वळू. स्वभावतःच निवृत्त असणारी ही विश्वव्यापी ऊर्जा, विभाजित झाल्याकारणाने मानवी मनाच्या उदयास व त्याच्यामधील 'मी' किंवा अहंपणास कारणीभूत होते. विभाजित झालेल्या ह्या दोन भागांपैकी एका भागास, ज्ञानदेव, शिव, देव, किंवा पुरुष अशी संज्ञा देतात, तर दुसऱ्या भागास, शक्ती, देवी, किंवा स्त्री म्हणून संबोधितात. ह्या स्त्री-पुरुषातील म्हणजे ह्या दोन भागांमधील खेळ, आपणा सर्वांस विदितच आहे. हा खेळच संसाराच्या निर्मितीस व त्याच्या विस्तारास कारणीभूत होतो. द्विधा अवस्थेत असलेल्या मानवी मनाचे अस्तित्व, आत चालणाऱ्या विचारांमुळे व आत पडणाऱ्या रूपांमुळे किंवा प्रतिबिंबामुळे टिकून राहते. मनुष्य हा मनाच्या म्हणजे आतील 'मी'च्या किंवा "अहमूच्या माध्यमाने जगत असतो. परंतु हा 'मी' केवळ भ्रम आहे व त्या 'मी' ला क्रियाशील करणारी विश्वऊर्जा किंवा शिव हे तथ्य आहे, ह्या गोष्टीचे मनुष्यास आकलनच होत नाही. (पाहा अध्याय १-१७) स्त्री-पुरुष नामभेदे । शिवपण एकले नांदे । जग सगळें अर्ध्वार्ध्वें । पणे जिहीं ।। म्हणून मनांत चाललेले विचार व पडणारी रूपे ही विरणे आवश्यक आहे जर त्याला संसारबंधनांतून मुक्त व्हायचें असेल तर ! प्रकृतीची माघार म्हणजे त्या जागी शिवतत्त्वाचा उदय. पाहा ।। हे असो नामरूपांचा भेद शिरा । गिळित एकार्थाचा उजिरा । नमो तया शिव बोहरा । ज्ञानदेवो म्हणे ।। अमृतानुभव १/४५. ह्याप्रमाणे मुक्तावस्था प्राप्त करण्यास मनुष्यांतील "मी" चा संपूर्ण विलय होणे आवश्यक आहे. अमृतानुभव १/६३ ।। सांडूनी मीपणाचा लोभु । मिठे सिंधुत्वाचा घेतला लाभु । तेवि अहं देऊनि शंभु । शांभवी झालो ।। शेवटी "मी" च्या विलयामुळे विश्वऊर्जेत नाहीसा झालो आणि त्या नाही होण्याच्या मुक्तावस्थेतच, ह्या विश्वउर्जेला नमन केले. अमृतानुभव १/६४ ।। शिवशक्तिसमावेशे । नमन म्या केले एसे ।। रम्भागर्भ आकाशे । रिगाला जैसा ।। म्हणूनी भूतेशु आणि भवानी । न करूनी सिनानी । मी रिघालो नमनी । ते हे ऐसे ।। अमृतानुभव १/६०

मनुष्यास मुक्त होण्याची इच्छा आहे, पण ते व्हावयाचे कसे, ह्या प्रश्नाचे उत्तर आपणास ह्या ग्रंथाच्या दुसऱ्या अध्यायात सापडते. मूळ शिवस्वरूपातून निघालेला जीव, प्रकृतीच्या म्हणजे वासनेच्या खेळामुळे, संसारात अडकतो. पण विचारांनी आणि विकारांनी व्याप्त असलेल्या 'मी' मुळे आपल्या मूळस्वरूपाचें त्याला विस्मरण होते. अशा ह्या अवस्थेत, त्याच्याच आत असलेली निवृत्तीची अंतर्दृष्टी त्याच्या साहाय्यास धावून येते. प्रत्येक विचार उठताच त्याकडे लक्ष देऊन, निवृत्त होता होता, निवृत्त होण्यास एकही विचार शिल्लक न राहिल्याकरणाने, मानवी जीव आपल्या मूळ शिवस्वरूपात विलीन होतो. आपले वडीलबंधू श्रीनिवृत्तीनाथ ह्यांच्या नावाचा गुरु म्हणून कृतज्ञतेने सुंदर उपयोग केलेला आहे.

अध्याय तिसरा व सहावा हे मनुष्याच्या आत उठणारे विचार (वाणी) व शब्द ह्यासंबंधी आहेत, अमृतानुभव हा ग्रंथ ज्ञानदेवांनी स्वतःच्या मनाचे केलेले विश्लेषण आहे, हे आधीच सांगितले आहे. ह्या अध्यायात मनुष्याच्या मनांत एकसारखे विचार (वाणी) चालत असतात व आतून शब्द उठत असतात, त्यासंबंधी आहे. अविद्येमुळे हे विचार व शब्द उठतात. तिकडे एकसारखे लक्ष दिल्याकारणाने ते विरतात. परा, पश्यन्ती, मध्यमा, वैखरी अशा ह्या चार वाणी आत सूक्ष्मापासून ओठातून शब्द फुटण्यापर्यंत आहेत. पण ह्या कामात पुस्तकी ज्ञानाचा उपयोग होत नाही. कारण जे ज्ञान स्वयें बुडे । म्हणोनी भारी नावडे । ज्ञानें मोक्ष घडे - ते निमाले - नि ॥ अमृतानुभव ३/२४. मग आत राहतो तो बोध किंवा अंतर्दृष्टी ॥ आपुलेपणे उरे । बोधु जो कां ॥३/३१॥ हीच्या हीच गोष्ट आतून उठणाऱ्या शब्दांची पण आहे. आत विसृत होणाऱ्या अंतर्दृष्टीनेच हा शब्द पण विरतो ॥ या शब्दाचा निमाला । महा प्रळयो हो सरला । अभ्रासवे गेला दुर्दिन जैसा ॥ अमृतानुभव अध्याय ६/१०३. चौथा अध्याय ज्या बोधामुळे, आपले मन, विचार आटल्यामुळे शून्यावस्थेंत जाते, त्यावर आहे. (पहा अमृतानुभव अध्याय ४/१०) तैसे पिकनी अज्ञान । तंववरी वाढे ज्ञान । जव आपले निधन । निःशेष साधे ॥ मग मानवी मन निःशून्यावस्थेत जाते (पहा अध्याय ४/३१) म्हणोनी काही नाहीपण । देखता नाही आपण । न होनि असणेवीण । असणे जे ॥ ज्याप्रमाणे कांद्याची साले, एक एक करून सोलता सोलता काहीच शिल्लक उरत नाही ह्याप्रमाणे आत उठत जाणाऱ्या विचारांपासून निवृत्त होता होता, मन उन्मन होते व मनुष्याची अवस्था न होओनि असणेवीण असणे जो ॥ अशी होते.

ह्या सकारात्मक शून्यावस्थेचे वर्णन, ह्या ग्रथांच्या पाचव्या अध्यायांत आले आहे. ही इंद्रियजन्य नसल्यामुळे हिचे वर्णन 'नेति, नेति' ह्या शब्दांनीच करावे लागते. ज्ञानदेव ह्या अवस्थेस 'सच्चिदानंद' ही संज्ञा देतात. जेथे सत् आहे तेथे चित्, आणि जेथे चित् आहे, तेथे आनंद असणे अनिवार्य असल्यामुळे, ह्या तीन पदांचे विभाजन करता येणे शक्य नाही. असत्, जाड्य व दुःख ह्याचा अभाव म्हणजेच सच्चिदानंद!

अध्याय सातव्यामध्ये काही आश्चर्यकारक विधाने केली आहेत. ज्या ज्ञानाला आपण महत्त्व देतो. ते मुक्त होण्याच्या मार्गात एक अडथळाच असून, केवळ अज्ञान आहे, असे ज्ञानदेव ह्या अध्यायात सांगतात ॥ आणि ज्ञान हे जे म्हणिजे । ते अज्ञानचि पां दुजे । एकलपवून दाविजे । एक नव्हे ॥ अध्याय ७/६. आपल्यापासून जग काही अलग आहे हा समज कसा चुकीचा आहे ह्याचे विस्तारपूर्वक वर्णन, ह्या अध्यायात आले आहे. द्रष्ट्यापासून दृश्य अलग नाही, ही एक अंतर्दृष्टी जागृत होते. मागील आठवणी समाप्त होतात. काही पाहिले किंवा ऐकले, तरी त्याची प्रतिक्रिया आत उठत नाही. प्रत्येक क्षणाला नव्या नव्या दृष्टीने जगाकडे पाहता येते. सारी गात्रे स्फूर्तिमय होतात ॥ क्षणी क्षणी नीच नवी । दृश्याची चोख मादसी ॥ दिठी करवी वेठवी । उदार जे ॥ मागिलिये क्षणीची अंगे । पारिसी म्हणोनि वेगे । सांडोनी दृष्टी रिघे नविया रूपा अमृतानुभव ७/१२६-१२७.

मागील सर्व अध्यायांत मानवी मनाच्या घडणावे हळूहळू निरीक्षण केलेले आपण पाहिले. हे घडण मानवी मनाचा निव्वळ एक खेळ, म्हणून केवळ भ्रम आहे, ह्या गोष्टीचे आकलन झाल्यामुळे, आता त्याचे अस्तित्वच राहिले नाही. आठव्या अध्यायांत ज्ञानदेव म्हणतात की आम्ही मुक्त झालो. आमच्यात अज्ञानाचा लवलेशही उरला नाही, आता आम्ही आमच्यातच मावत नाही. तर ह्या स्थितीचे वर्णन तरी कसे करणार? अध्याय ८/२ व ३ पर आम्ही आम्ही आहो । ते कैसे पाहो जावो । तव काय कीजे ठावो । लाजिजे ऐसा ॥ जे आम्ही न समाये । आम्हा माजी ॥ आता ज्ञान-अज्ञान ही दोन्हीही नाहीशी करून, आमच्यात चैतन्यसूर्य उदयास आला. अध्याय ८/१९ आता ज्ञानाज्ञाने दोन्ही । पोटी सूनि अहनी । उदेला चिद्‌गगनी । चिदादित्यु हा ॥

मुक्तावस्थेनंतर, आपल्या दैनंदिन अमृततुल्य जीवनाचे वर्णन ज्ञानदेव ह्या ग्रंथाच्या दहाव्या अध्यायांत करतात. ते म्हणतात मन निर्विकल्प व निर्विकार अवस्थेत आहे. सारी चैतन्यशक्ती इंद्रियांमध्ये केंद्रित झाली आहे ही सर्व इंद्रिये उत्स्फूर्त काम करीत आहेत. इंद्रियांमधील व बाहेरील भोग्य वस्तूचे अंतर आधीच नाहीसे झाले आहे. नाक म्हणजे बाहेरून येणारा सुगंध, डोळे म्हणजे निव्वळ आरसा – बाह्य जगाचे प्रतिबिंब पडत असता, आत काहीच प्रतिक्रिया होत नाही. कितीही काम केले, तरी ज्ञानदेव अक्रियच राहतात. मन समाधिस्थ असले तरी जीवन स्वयंस्फूर्त झाले आहे. आपणच देव व आपणच भक्त. सर्व विश्व एकांत झाले आहे त्या आनंदभूमीवर एकटे आपणच आपणाशी खेळत आहोत ॥ आंगे

कीर झाली एक । परि नामरूपाचे मासले । तेही आटले हरिहर ॥ अध्याय ९/६१. ह्या कामांत निवृत्तीचेच साहाय्य झाले ॥ जाला स्वेच्छावि विधी । स्वैर जाली समाधी ॥ ९/३३ ॥ झाला देवोचि भक्तु । ठावोचि झाला पंथु । होऊनि ठेला एकांत विश्वचि हे ॥

अमृतानुभवाचा शेवटचा अध्याय दहा हा ग्रंथ लिहिण्याच्या हेतूसंबंधी आहे. संत ज्ञानेश्वरांचा 'अहं' विरून ते विश्वव्यापी जीवन जगत आहेत ॥ जनाते जन देखता द्रष्टा दृश्य तत्त्वतः ॥ द्रष्टा दृश्यच झाले विश्व एकांत होऊन ठेले; स्वतःमधील वाणी व शब्द आटल्यामुळें, माझी वैखरी "मौनाचेही मौन करी" अशा अवस्थेत असलेल्या संत ज्ञानेश्वरांनी, हा ग्रंथ कशाकरिता व कोणा करिता लिहिला, हा प्रश्न उद्‌भवणे अगदी उचित आहे. ह्या प्रश्नास स्वतःच उत्तर देताना, ज्ञानदेव म्हणतात, आम्ही तरी काय करणार? आमच्या हाती चैतन्य जीवनाने जी प्रकाशज्योत दिली आहे, त्याचाच आपोआप प्रकाश पसरत आहे, हे शब्दसुद्धा माझ्या जीवनातील अगाध शांततेतून बाहेर पडत आहेत. हे माझे निरूपणसुद्धा जसे मी, मलाच करीत आहे. हा ग्रंथ लिहिण्याचा हेतू हाच की मनुष्याच्या मनाचे विचारतरंग, पूर्णपणे विरून, तो माझ्या अनुभवाचे अमृत पिऊन पूर्णपणे जीवनमुक्त व्हावा, शेवटी ज्ञानदेव हीच प्रार्थना करतात :-

म्हणोनि ज्ञानदेवो म्हणे । अनुभवामृते येणे
सणु भोगिजे सणे । विश्वाचेनि ॥

ह्या अमृतानुभवाच्या रसास्वादाने वाचकांनी विश्वमय होऊन, अगदी आनंदी जीवन जगावे. काय संत ज्ञानदेवासारखे आपणासही मनापासून 'मी' पासून मुक्त होणे शक्य आहे?

माधव देव
सी-१९ यशोधन सोसायटी,
आपटे रोड, पुणे - ४११ ००४.

*With Best Compliments From*

**Grace Communiations**

***Authorised Dealers of***
***Larsen & Toubro Ltd.***
***Epabx - Systems***
***Ideal for small and Medium size organisations***
***New advanced Business FAX***

*Ravi–Kiran, 37/9–B, Erandavana,*
*Prabhat Road, Lane No. 6, Pune - 411 004.*
*Tel. : 368665*

# "श्री ज्ञानेश्वर, ज्ञानेश्वरी व माझे सद्गुरू स्वामी स्वरूपानंद"

अ. र. करंदीकर

पावसचे श्रीमत् सच्चिदानंद सद्गुरू स्वामी स्वरूपानंद हे माझे सद्गुरू. श्री ज्ञानेश्वर महाराज हे त्यांचे आराध्यदैवत. श्री ज्ञानेश्वरांपासून देवचूडामणी गुंडारव्य यांचेकडून आलेला नाथसंप्रदायाचा वारसा स्वामींचे सद्गुरू पू. बाबा महाराज वैद्य, पुणे त्यांचेकडे सोपवला. त्याचमुळे स्वामी म्हणतात, "स्वामी म्हणे माझा नाथ संप्रदाय । अवघे हरिमय योगबळे".

श्री ज्ञानेश्वर व श्री ज्ञानेश्वरी ही दोन आराध्यदैवते आहेत या सांप्रदायाची.

मी रोज श्री ज्ञानेश्वरी वाचतो, नित्य श्री ज्ञानेश्वरीच्या श्रवणाला जातो असे समजतांच त्यांना जो आनंद झाला त्या आनंदाचा अविष्कार त्यांच्या प्रफुल्ल, निर्मळ, शांत अशा चेहऱ्यावर उमटलेला मी अनुभवलेला आहे. त्याचमुळे त्यांनी मला सांप्रदायिक दीक्षा देऊन अनुग्रह दिला.

स्वामी स्वरूपानंद श्री ज्ञानेश्वरीमध्ये पूर्णपणे एकरूप झाले होते. श्री ज्ञानेश्वरी त्यांचे रोमारोमात भिनली होती. या भावार्थदीपिकेविषयी त्यांचा आदर खालील त्यांच्या ओव्या वाचून प्रत्ययाला येईलच.

श्री ज्ञानेश्वरी अमृतगंगा ।
बहुत सुकृते लाभली जगा ।
पावन करी अंतरंगा ।
अंगप्रत्यंगा जीवाचिया ।।१।।
भक्तिभावे करिता स्नान ।
निर्मल होय अंतःकरण ।
जीवासी परम समाधान ।
साक्षात दर्शन श्रीशिवाचे ।।२।।
जीवा शिवाची होता भेटी ।
मावळोनि ज्ञाताज्ञेयादि त्रिपुटी ।
प्रकटे सोऽहंभाव प्रतीति ।
उरे शेवटी ज्ञप्तिमात्र ।।३।।

श्री ज्ञानेश्वरी हा ग्रंथ जुन्या सातशे वर्षांपूर्वीच्या मराठी भाषेमुळे थोडा गहन वाटतो. त्यामुळे तो समजेल की नाही असा भ्रम होणे शक्य आहे. पण श्री स्वामी म्हणतात,

श्री ज्ञानेश्वरी ग्रंथ गहन ।
गुरुपुत्रांशी सुगम सोपान ।
भावे घडता श्रवण मनन ।
लाभे समाधान अखंडित ।।१।।
उपासना मार्ग सापडे ।
योगसार हाता चढे ।
उघडती ज्ञानाची कवाडे ।
सहज घडे निष्काम कर्म ।।२।।
होऊनी अंतरंग अधिकारी ।
भावे अवलोकिता ज्ञानेश्वरी ।
साक्षात प्रकटे भगवान श्रीहरी ।
स्वये उद्धरी निजभक्ता ।।३।।
नित्य अंतरी ज्ञानदेव ।
सर्वा भूती भगवद्भाव ।
देवभक्ता एकचि ठाव ।
अपूर्व नवलाव अनुभवावा ।।४।।

श्री ज्ञानेश्वर महाराज हे तर त्यांचे अंतःकरणात सदैव होते. श्री ज्ञानेश्वर महाराजांनी दिलेल्या आदेशानुसारंच त्यांनी सोप्या भाषेत "अभंग ज्ञानेश्वरी" लिहिली व आज आमचे साधक बंधु भगिनींना तो अत्यंत प्रिय असा मौलिक ठेवा मिळाला आहे.

श्री ज्ञानेश्वरीप्रमाणेच त्यांनी श्री अमृतानुभव, श्री चांगदेव पासष्टी यांचे पण सुलभ, रसाळ भाषेत, काव्यात निरूपण केले आहे. हे तीनही ग्रंथ लिहिताना त्यांनी कोठेही मूळ तत्त्वज्ञान, भाव, भक्ती यांचा रसभंग होणार नाही याची कटाक्षाने काळजी घेतली. आपण कोणीतरी श्रेष्ठ आहोत हा अहंभाव तर कोठेच आढळत नाही.

मूळ ज्ञानेश्वरी रोजचे वाचण्यास कांही लोकांना सवड होत नाही किंवा कालानुरूप जागेच्या अडचणींमुळे व या धकाधकीच्या जीवनात शक्य नाही अशी समजूत करून घेतलेल्यांसाठी मूळ ज्ञानेश्वरीतील निवडक पण समर्पक अशा एकशे आठ ओव्या निवडून काढून "श्री ज्ञानेश्वरी नित्यपाठ" संपादित करून त्यांनी फार मोठे उपकार सामान्य जीवांवर केले आहेत. श्री ज्ञानेश्वर महाराजांचे यथार्थ वर्णन त्यांचे खालील ओव्यांतून आपल्या निदर्शनास येईलच.

नमितो योगी थोर विरागी तत्त्वज्ञानी संत ।
तो सत्कविवर परात्पर गुरू ज्ञानदेव भगवंत ।।१।।
स्मरण तयाचे होता साचे चित्ती हर्ष न मावे ।
म्हणूनि वाटते पुनः पुनः ते पावन चरण नमावे ।।२।।

अनन्यभावे शरण रिघावे अहंकार सांडून ।
आणि टाकावी तयावरूनिया काया कुरवंडून ॥३॥
आणि पहावे नितांत सुंदर तेजोमय ते रूप ।
सहज साधनी नित्य रंगूनी व्हावे मग तद्रुप ॥४॥
ज्ञानेशाला नमिता झाला श्रीसद्गुरुला तोष ।
वरदहस्त मस्तकी ठेवुनि देई मज आदेश ॥५॥

श्री ज्ञानेश्वरी, श्री ज्ञानेश्वर महाराज व नाथ संप्रदाय यांचे मधुर मीलन माझे सद्गुरू स्वामी स्वरूपानंद.

स्वामी स्वरूपानंदांनी परमार्थ सांगितला. ते तसा परमार्थ जगले. परमार्थाविषयी स्पष्ट कल्पना त्यांनी मांडलेली आहे. ती अशी "खरा परमार्थ परिस्थितीत बदल घडवून सुखाची प्राप्ती करून देत नसून प्रत्येक प्राप्त परिस्थिती सुखाने भोगण्याची कला शिकवीत असतो."

असे सद्गुरू, अशी श्री ज्ञानेश्वरी व साक्षात् भगवान् विष्णु श्री ज्ञानेश्वर महाराज यांचा त्रिवार जयजयकार.

अ. र. करंदीकर
कृतार्थ सोसायटी,
पुणे - ४११ ०३७.

हार्दिक शुभेच्छा

ढेरे कॉंक्रीट प्रॉडक्टस् कंपनी
अमीत पाईप इंडस्ट्रीज

★ कारखाना ★
सासवड रोड रेल्वे स्टेशनजवळ,
फुरसुंगी ता. हवेली, जि. पुणे.
दुरध्वनी : ६७२१०७, ६७२३३९
★ कार्यालय ★
७३१, बुधवार पेठ, लक्ष्मी रोड,
सिटी पोस्टाजवळ, पुणे ४११ ००२.
दुरध्वनी : ४७३०८४, ४७५८९१

दर्जेदार व मजबूत आय्. एस्. आय्. मार्कचे
आर्. सी. सी. स्पन पाईप्स् व स्पिगॉट एण्डस् सॉकेट
टाईप पाईप्स-१०० एम्.एम्. ते १८०० एम्.एम्.
डायमीटरपर्यंत, पाण्याच्या टाक्या,
सेप्टीक टँक व इतर उत्पादनांसाठी

झाडे लावा झाडे जगवा

मॉडर्न पेपर स्टोअर्स

२५, बुधवार पेठ, अप्पा बळवंत चौक,
पुणे ४११ ०२०.
फोन : ऑफिस : ४५९४५७, ४५८९५७
घर : ६२७८५७

कॉम्प्युटर स्टेशनरी जनरल पेपर व बोर्ड व्यापारी

हार्दिक शुभेच्छा

अभिजीत एंटरप्रायझेस

५६७, नारायण पेठ, केसरी कार्याजवळ,
पुणे ४११ ०३०.
शोरूम फोन : ४५४६७६
निवास : ४५०१९१

प्रोप्रा. : प्रकाश जगन्नाथ वाणी (निजामपूरकर)

*रबर फोम, कॉयरफोम, यू-फोम, रेक्झीन,
टेपेस्ट्री व पडद्यांचे कापड, सोफा कुशन व कार कुशनचे
सर्व साहित्यांसाठी तसेच कॉयर फोमच्या
तयार गाद्या, रबर फोमच्या गाद्या व
सोफा कुशनचा सेट ऑर्डरनुसार तयार करून मिळेल.*

# जरूरी नेत्र शिबिराची

डॉ. पारस शहा

"घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचे ॥
तुम्ही डोळे घ्या रे सुख । पहा विठोबाचे मुख ॥"
सकल संत गाथा २१५६

विश्वरूप विठ्ठला । सृष्टीरूप पाहून नयन सुख घेण्यासाठी जरूरी आहे, सक्षम दृष्टीची म्हणजेच नजरेची.

जर नजर नसेल तर हे सर्वच अशक्य! आंतरिक दृष्टीने जरी विठ्ठल दर्शन शक्य असले तरीही बाह्य दृष्टीचीही तितकीच गरज आहे. त्याची प्रचिती मला आली – एका नेत्र शिबिरात.

ह. भ. पू. श्री. बाबामहाराज सातारकर यांनी वारीमध्ये आयोजित केलेल्या एका नेत्र-शिबिरात नेत्रतज्ज्ञ म्हणून जाण्याचे भाग्य मला लाभले. त्या शिबिरावेळची गोष्ट – एक म्हातारे बाबा एका हाताने काठी टेकीत व दुसऱ्या हाताने म्हातारीचा हात धरून तपासण्यासाठी गर्दीतून वाट काढण्याचा प्रयत्न करीत होते. त्यांना दुरूनच बघता त्यांची ती धडपड मनाला चटका लावून गेली. मी स्वतः माझ्या जागेवरून उठलो व हातात टॉर्च घेऊन वारकऱ्यांच्या घोळक्यातून वाट काढीत त्यांचेपर्यंत पोहोचलो. मी जवळ जाताच आजोबा माझे पाय पडू लागले. मी त्यांना थांबवले व आपुलकीने आजीची चौकशी केली. आजोबा म्हणाले, "५ वर्षे झालीत म्हातारीला दिसत नाही, सारखी डोळ्यांच्या डॉ. कडे घेऊन जा म्हणते. मी पडलो गरीब, डॉ. पर्यंत घेऊन जायलाही पैसे नाहीत तर त्यांचेकडे फी देऊन तपासणे तर दूरच राहिले. आज कळाले की, डोळ्यांचे डॉ. वारकऱ्यांचे डोळे मोफत तपासायला येणार आहेत म्हणून घेऊन आलो म्हातारीला. कसेही करून म्हातारीला थोडीशी नजर द्या. पंढरीला नेऊन विठोबाचे मुख दाखवितो तिजला पुष्कळ दिसापासून तिची इच्छा आहे विठोबाला पाहण्याची."

या आजीबाईप्रमाणेच हजारो आजी-आजोबा विठ्ठलाचे रूप पाहण्यासाठी आपल्या अंध डोळ्यांना नजर येण्याची आतुरतेने वाट पाहत आहेत. ह्यासाठी जरूरी आहे, डोळ्याच्या डॉ. ना त्यांच्याकडे घेऊन जाण्याची – म्हणजेच नेत्र शिबिराची.

ओंकार ट्रस्ट तर्फे मोहिनीतारा हॉस्पिटलच्या सौजन्याने गुजरवाडी येथील प्रथम शिबिराला मिळालेला प्रचंड प्रतिसाद पाहून शिबिराची खेड्यापाड्यांतून किती जरूरी आहे हे त्या कार्यक्रमाला उपस्थित असलेल्या निमंत्रितांच्या लक्षात आले तेव्हा अशीच अजून शिबिरे घेण्याचे त्यांनी ठरविले. त्याच शिबिरात दोन्ही डोळ्यांनी मोतीबिंदुमुळे अंध झालेल्या दोन म्हाताऱ्या आजींवर मोफत शस्त्रक्रिया करण्यात आल्या. प्रथम दिवशी पट्टी सोडताच समोर डॉ. चे तोंड पाहून आजीस दृष्टीबरोबरच सृष्टी मिळाल्याचा आनंद झाला. त्या आजींनी गावात जाऊन इतर आजी-आजोबांना आपणास नजर आल्याचे सांगताच शिबिरात डोळे जाण्याच्या भीतीने ऑपरेशनला न आलेले रुग्ण शिबिर-संयोजकांच्या मागे लागून आपलेही शस्त्रकर्म करण्याची मागणी करू लागले. शिबिर यशस्वी झाल्याची हीच खरी पावती होती. परंतु असे एखादे शिबिर घेऊन भागणार नाही. अशा हजारो शिबिरांचे खेड्यापाड्यातून आयोजन करण्याची गरज आहे. समाजात विविध सेवाभावी संस्था जरी अस्तित्वात असल्या तरी बहुतेक संस्थांची कार्ये शहरांपुरतीच मर्यादित आहेत. या संस्थांनी खेड्यापाड्यातून ग्रामपंचायतीचे सहाय्याने नेत्रशिबिरे आयोजित करणे गरजेचे आहे. वरवर खर्चाची वाटणारी ही शिबिरे योग्य संयोजन व समाजातील दानशूर व्यक्तिंचे सहकार्य यामुळे विशेष खर्चिक न होता गोरगरीबांसाठी नक्कीच लाभप्रद होतात. केवळ नेत्रतज्ज्ञांवरतीच सर्व कार्यभार न सोपविता सामाजातील प्रत्येक व्यक्तीने एक नैतिक बंधन समजून या कार्यासाठी हातभार लावला पाहीजे.

एका अनुभवी नेत्रतज्ज्ञांनी व्यक्तिगत योगदाना-संदर्भात मांडलेले आपले विचार लक्षात घेण्यासारखे आहेत. एका नेत्रशिबिरात उपस्थितांकडे बघून ते म्हणाले, "आपण सर्व गावकरी स्वतःचे नेत्र तपासून घेण्यासाठी मोठ्या संख्येने उपस्थित आहात हे पाहून मला आनंद होत आहे पण याबरोबरच मला एका गोष्टीचे दुःख आहे. ज्यांना पुण्यापर्यंत पोहचता येत नाही अशा अंधांचे अंधत्व निवारण करण्यासाठी आम्ही पुण्याहून येथे आलो आहोत, पण आजच्या या शिबिरात असे अंध फारच कमी दिसत आहेत. याचे कारण ते अंध आपापल्या झोपड्यात बसून अंधाराकडून प्रकाशाकडे जाण्याची वाट पाहत आहेत. त्यांना या शिबिरासाठी

घेऊन येण्याची जास्त जरूरी आहे. पुढील वर्षी शिबिरात आपल्यापैकी प्रत्येक व्यक्तिने अशी एक जरी अंध व्यक्ती स्वतःबरोबर तपासण्यासाठी आणली तरच माझी साधना सफल झाली, असे मला वाटेल." गावकऱ्यांना उद्देशून केलेले हे वक्तव्य समाजातील प्रत्येक व्यक्तीस लागू पडणारे आहे एका नेत्रतज्ज्ञास हजारो अंधांकडे जाणे शक्य नाही. परंतु प्रत्येक व्यक्तीने नैतिक जबाबदारी मानून अशा अंध व्यक्तींना नेत्रतज्ज्ञाकडे आणण्याचे कार्य केल्यास अंधत्व निवारणाचा राष्ट्रीय कार्यक्रम खऱ्या अर्थाने यशस्वी होईल, असे मला वाटते.


डॉ. पारस शहा
४५६ सोमवार पेठ,
पुणे - ४११ ०११.



हार्दिक शुभेच्छा

**मे. राजेन्द्र इंडस्ट्रीज**

१२५, शुक्रवार पेठ, मंडई गणपतीमागे,
पुणे ४११ ००२.
फोन : वर्कशॉप : ४७४२२०
निवास : ६६६५७०

**टर्नींग मिलींग, शेपींग इ. मशीनवर**
**प्रिसीजन कामे केली जातील.**
**शीट मेटलसाठी डी डाइज स्पेशालिस्ट**



हार्दिक शुभेच्छा

**आपले आवडते ठिकाण**




१०५३ शुक्रवार पेठ,
टिळक रोड, अभिनव कला महाविद्यालयाजवळ,
पुणे - ४११ ०३०.



*With Best Compliments From*

**RAMESH CABLE CORPORATION**

**Head Office** : 461, Budhwar Peth,
Near Pasodya Vithoba Mandir,
Pune 411 002.
**Branch Office** : Lohar Chawl,
Bombay 400 002.

**Dealers in Every type of Cales Armoured & Unarmoured Cables, Welding Cables**
**Authorised Dealers of**
**C.C.I. Tropodur Cables**
**Polycab Cables I.S.I.**
**Philco Wires & Cables**
**Retco Wires & Cables**

**Approved Suppliers to Industries in & around Pune / Bombay, Govt. & Semi Govt. Concerns.**

# समर्थांचा विदर्भातील सहवास

– श्रीपाद के. चितळे

३००-३५० वर्षांपूर्वी "जय जय रघुवीर समर्थ" या धीरगंभीर वाणीने अवघा महाराष्ट्र दुमदुमून गेला होता. या मंत्रात शुचिता होती, पावित्र्य होते व श्रद्धाही होती. आजही कुणी रामदासी प्रवेशद्वारावर वरील मंत्र उच्चारू लागले की वातावरण प्रसन्न होते. ह्या मंत्राचे प्रणेते होते श्री समर्थ रामदास स्वामी! त्यांचे नांव उच्चारताच आपल्या दृष्टीसमोर त्यांची तेजस्वी, कणखर, प्रयत्नांवर अत्यंत भर देणारी, पारमार्थिक कौशल्याबरोबरच ऐहीक दक्षता व चातुर्य शिकविणारी अशी विरागशील व अत्यंत निस्पृह मुर्ती उभी राहते. समर्थांच्या संपूर्ण वाङ्मयात त्यांच्या व्यक्तीमत्वाचे विविध पैलू दडलेले आहेत. समर्थांनी संपूर्ण भारताचा प्रवास केला होता असा एक समज आहे आणि दिवसेंदिवस या समजाला बळकटी देणारी पत्रे मधून मधून उजेडात येत आहेत. प्रस्तुत लेखात असाच काहीसा अप्रकाशित पुरावा जो त्यांच्या विदर्भाच्या सहवासाबद्दल पुढे येत आहे; तो मांडण्याचा माझा विचार आहे. मी एक पुरातत्ववेत्ता असल्याने कुठल्याही व्यक्तीबद्दल पूर्वग्रहदोष न ठेवता जे दिसते ते विद्वानांच्या समोर ठेवणे हे आम्हा मंडळीचे आद्य कर्तव्य ठरते. भावनेला त्यात महत्वच नसते आणि म्हणूनच पुरातत्ववेत्यांना जगभर मान्यता असते. श्रद्धा हा विषय त्यांना थोडा वेगळाच ठेवावा लागतो. अस्सल पुरावा, अस्सल पत्रे व तत्कालिन इतर उद्बोधक पुरावा ह्यांचा आधार आम्ही घेत असतो. या सगळ्या लेखप्रपंचातून असे लक्षात येते, कि समर्थ इ.स. १६३६ साली ३-३।। महिने विदर्भात वास्तव्य करून होते हे मात्र निश्चित.

बालपणापासूनच एकांतप्रिय असलेले समर्थ नाशिकजवळील टाकळी येथील तपश्चरणानंतर इ.स. १६३२-१६४४ साली अनेक आपत्तींना तोंड देत देत धैर्याने व चिकाटीने (जवळजवळ १२-१३ वर्षे) देशस्थितीचे अवलोकन करीत जवळ जवळ संपूर्ण भारतभर पायी तिर्थयात्रा करीत हिंडले. मात्र केवळ तिर्थयात्रा हाच त्यांचा हेतू नव्हता असे उपलब्ध पुराव्यावरून म्हणता येते. देशातील सांप्रत परिस्थिती, त्याही भिषण परिस्थितीत नंदादीपासारखे जळणारे पराक्रमी व कर्तृत्ववान पुरूष, राष्ट्राचा स्वाभिमान व दिल्लीश्वराचे कच्चे दुवे ह्याचे नीट अवलोकन हे त्याचे प्रवासाचे ध्येय होते. सर्वप्रथम ते तळ कोकणातून दक्षिणेत गेले तद्नंतर कर्नाटक, मिनाक्षी, मलबार व शैल क्षेत्रातून ते इ. स. १६३६ च्या सुमारास सातपुड्याचे दक्षिणेस व आंध्रच्या उत्तरेस असलेल्या व दक्षिणपथाचा व उत्तरापथाचा दुवा असलेल्या आपल्या विदर्भ प्रांतात आले. कारण त्यावेळेला अकोला जिल्ह्यात त्यांच्या तीन शिष्यांची नावे तत्कालीन कागदपत्रात आढळतात. त्यांची श्रीनांवे अनुक्रमे रोकडाराम, भोळाराम व देवळाराम अशी आढळतात. स्वाभाविकच त्यांच्या भ्रमणाआधी त्यांनी अशी काही काही शिष्य मंडळी सर्वत्र पेरून ठेवली होती असे दिसते. समर्थांना ओढ मात्र श्रीक्षेत्र रामटेकची असावी, कारण त्यांचे आराध्य दैवत येथे होते. (पुरातत्वाच्या आरस्यात रामटेकची प्राचीनता इ.स. च्या ३ऱ्या ४थ्या शतकापर्यंत मागे नेता येते, म्हणजेच ती आजपासून १५०० वर्षे मागे नेता येते. रामटेक येथे असलेले केवलानृसिंह मंदिर देशातील आज सर्वात प्राचीन मंदिर ठरू पाहत आहे. मंदिराच्या गर्भगृहावरील ११ ओळींचा नागरी लेख मी स्वतः संपादीत केला तर देवळाच्या भिंतीवर डावीकडे इ.स. च्या ४ थ्या शतकातील पेटीकाशिर्षक लिपीतील (Box headed Brhami of 4th century A. D.) वाकाटक कालीन शिलालेख आजही दिसतो.) विदर्भात समर्थ आले



तेंव्हा विशेषतः वऱ्हाडात इतमादशाहीचे प्राबल्य असून पूर्व विदर्भ (नागपूर, भंडारा, वर्धा, व चंद्रपूर (गडचिरोलीसहित) मध्य प्रदेशाला (झाडी मंडळ) गोंड नृपतींच्या राज्याशी जोडला होता. पण गोंड राजे स्वतः हिंदू असल्याने हिंदू साधु-संन्यास्यांना त्रास देत नसत. समर्थ रामटेकला आले होते, याचा पुरावा मला अम्बाळ्याच्या एक पुरोहितांकडे मिळाला. तत्कालीन एका नोंदपत्रात असे म्हंटले आहे (लीपी मोडी) की कुणी एक बलदंड स्वामी, रामभक्त स्वामी दर्शनासाठी रामटेक क्षेत्रे येऊ पावला. दर्शनासी इच्छुक असोन रामकार्य करीतो असे म्हणू पाहतो मज श्रीरामांशी हितगुज करावयाचे आहे ऐसे मनोगत वदू लागला. समर्थ स्वतःचे नांव रामसेवक सांगत असत. आमचा स्वामी तो राम! असे सतत म्हणत. तेजःपूंज, मुखमंडल, लालबुंद श्रीमुख, बलदंड देहयष्टी, कुरळी व काळी दाढी, भव्य भालप्रदेश त्रिशीर स्नायूंनी युक्त मांड्या, जटा, व भगवी छाटी हा त्यांचा वेष ज्या पंड्याकडे हे मोडी पत्र मला वाचावयास मिळाले ते पंडीत त्यांच्या मुलाला (बहुधा जबलपूरची व्हिकल फॅक्टरी) तिकडे नोकरी लागल्याने स्थानांतरीत होण्याच्या विचारात बेतात होते. मला इतिहासाचे वेड असल्याने मी त्यातील काही भाग वाचला (१९८४) व मला असे लक्षात आले की शके १५५८ साली म्हणजेच इ.स. १६३६ सालातील ही घटना होय. ते पंडे रामटेक येथील अथवा रामटेकच्या पंचक्रोशीतील पिढीजात ब्राह्मण असल्याने त्यांचेकडे खूप जुन्या नोंदी होत्या. त्यांत हेही लिहीले होते, की हा संन्यासी तासनूतास (तेंव्हा रामदासी म्हणजे समर्थांचा शिष्य या अर्थाने रामदासी शब्द रूढ झालेला नव्हता.) श्रीराम नामाचा जप करीत असे. मला असे वाटते की हीव्यक्ती दुसरी तिसरी कुणीही नसून प्रत्यक्ष समर्थच होते. कालनिर्णय, देहयष्टी व व्यक्तीमत्व हे वर्णन श्री समर्थांनाच लागू पडते व श्री क्षेत्र रामटेकचे महत्त्व सुमारे १००० ते १५०० वर्षापासून तिर्थक्षेत्र व श्रीरामप्रभूंचे वास्तव्यासाठी प्रसिद्ध होते. आजही रामटेक भारतभर सुविख्यात आहेच. (दण्डकारण्य प्रस्थान) श्री समर्थ आपल्या विदर्भात आले तेव्हा इत्मादशाहीचे राज्य होते. त्यांच्या प्रवासात त्यांना अनेक ठाण्यावर (चौक्यांवर) त्रास झाला व त्यांना निक्षुन सांगितले असावे की आपण ह्या राज्यातून कोसलात (मध्यप्रदेश आजचा छत्तीसगड) त्वरीत निघा. पण समर्थांनी हा आदेश पार धुडकावून लावून आपल्या काही शिष्यांची १) रोकडाराम, २) भोळाराम, ३) देवळाराम, ४) पैकूराम, ५) दासोबाराम यांची एक बैठक घेऊन त्यांना आपल्या पवित्र हिंदूधर्माच्या अंर्तरचनेसाठी व पूर्ण प्रेरणेसाठी आपण भारतभर ठिकठिकाणी श्रीमारुतीरायांची स्थापना करीत आहोत असे निक्षून सांगितले. (अर्थात शिवछत्रपती तेंव्हा केवळ सहा वर्षांचे होते व त्यांच्या पुढील कार्याची उत्तम पार्श्वभूमी समर्थांनी आधीच तयार करून ठेवली होती. ही त्यांची दूरदृष्टी होती असे म्हणायचे? की ते स्वप्रतिभप्रज्ञतेने विधिलिखित जाणत होते! पण समर्थ होते मात्र अवतार पुरुष!) ही बैठक त्यांनी बाळापूर (जिल्हा अकोला, तालुका आकोट) या गावी अत्यंत गुप्तरितीने मनकर्णिका व मह्रिषा या उभय नद्यांच्या संगमावर असलेल्या बलदेवी त्रिपुरसुंदरीच्या देवळात झाली. अर्थात मुस्लीम शासकांना ह्या गुप्तवार्तेचा पत्ता लागलाच! पण समर्थ कदाचित (?) पुढे चंद्रपूर मार्गे ओरिसा (उत्कल) किंवा बस्तरला गेले असावेत पुढे एक मठ त्यांनी गिरडला (वर्धा जिल्हा) स्थापिला. स्वामींचे गिरड मठाधिपती श्री अनंतदास रामदासी यांनी श्री दासायन हा ग्रंथ लिहीला व हे गृहस्थ अगदी आता आता पर्यंत नागपूरच्या महालास्थित झेंडा चौकात रहात असत. हा मठ आधापीही सुरू आहे. तसेच मी त्या रामटेकच्या जबलपूर स्थित पंड्याशी खूप पत्रव्यवहार केला, पण दुर्दैवाने यश आले नाही पण मी अजूनही नाद सोडलेला नाही कारण ती मोडी पत्रे मी माझ्या डोळ्याने पाहिली होती.

असाच एक पुरावा आडगाव स्थित मिळतो. (श्री. देशपांडे यांचे दप्तर-ऐतिहासिक रुमाल क्र. ३४ म्हणजे जुन्या पत्राच्या - प्रति - पांडुलिपी या आडगावला (जि. अकोला - तालूका अकोट) बाळापूरजवळ एका ठिकाणी मला काही माहिती मिळाली. इ.स. १८०३ साली येथे इंग्रज-मराठा युद्ध झाले होते. याच ठिकाणी एका कपारीत एक मारुतीरायांचे देऊळ (भव्य प्रतिमा) आहे त्या मारुतीला डोंगऱ्या मारुती म्हणत असून याचे मुख उत्तरेस आहे. वास्तविक हनुमंताचे मुख नेहमीच दक्षिणाभिमुखच असते. (किंबहूना प्राचीन काळी ही प्रतिमावर्णन-मुर्तीशास्त्राच्या निकषानुसार दिशादर्शक ठोकताळे असत. जसे शिवलिंगाचे शांळुकेचे वारीमार्ग उत्तराभिमुखच असते तसेच) गावातील वृद्ध व जाणकार मंडळी असे म्हणतात की पूर्वी मुर्तीचे तोंड दक्षिणभिमुखच होते, पण जेव्हा समर्थ रामदास स्वामी अकोटवरून तिर्थवारीस जात होते तेव्हा मारुतीरायांनी आपली दिशा उत्तरेस वळविली. आणि समर्थ येथून पलिकडे सातपुडापल्याड (उत्तरागमन) जात आहेत हे दाखविण्यासाठीच जणु असे झाले! त्यातील अतिशयोक्तीचा भाव सोडला तरी समर्थ ह्या भागात इ.स. १६३६ साली ह्या सुमारास साधारण पावसाळ्यात (कारण या दिवसात वाहूल कमी असते.) हिंडत होते, सामाजिक परिस्थितीचे सुक्ष्म अवलोकन करीत होते एवढे तर या भाकड कथेतून-लोकस्मृतीतून सिद्ध होते. पुढे याच मुक्कामात समर्थांना आडगावकर देशपांडेंनी घरी वाड्यावर बोलाविले, (हा भव्य वाडा ७ वर्षापूर्वी पाडण्यात आला. ह्यातून ७० ट्रक माती निघाली म्हणतात) व त्यांचा सत्कार केला व पाद्यपूजा केली. तेथून समर्थ परतत असतांना एका सोवळ्या - म्हाताऱ्या स्त्रीने काहीतरी स्मृतीचिन्ह देण्याबाबत समर्थांना विनंती केली,

आर्जव केला, "वृद्धा बहुत श्रद्धावान दिसतेय" असे पुटपुटत समर्थांनी उजव्या हाताचा पंजा शेंदूरात भिजवून त्याचा ठसा ह्या वाड्याच्या दिवाणखान्याच्या एका खांबावरील, बोपल्याचे (फुलीचा खांब) खालील आधाराचे आडवे लहान लाकडावर (तुळई) घाडेनाटीवर उमटविला. आजही ही घाडेनांट (लाकडीफळी) सदर देशपांडेचे वाड्याचे आवारात ठेवली असून मोठ्या श्रद्धेने स्थानिक भक्त समर्थांचे स्मृती चिन्ह म्हणून पूजा करतात. असाच ठसा (उजव्या पायाचा व डाव्या हाताचा) छत्रपती शिवरायांनी सिंधुदुर्गाच्या तटबंदीवरील घुमटीत स्मृति चिन्ह म्हणून उठविला होता.

रामदास स्वामींनी वारी-भैरवगड या गावी सातपुड्याच्या कुशीत हनुमंताची (६ फूट उंच) भव्य मुर्ती स्थापन केली होती. ह्या मंदिरास वारीच्या मारुतीचे मंदिर म्हणून ओळखतात व ह्या जोडावर अमरावती, बुलढाणा व अकोला जिल्ह्याच्या सीमा मिळतात. समर्थ स्थापित मारुती मग ते कोठेही असोत, ओळखण्याची नजरेत भरणारी खूण म्हणजे भव्य मुर्ती व पायाखाली राक्षस तुडवितांनाची मुद्रा अशी असते. समर्थ स्थापित ११ हनुमंत मुर्तीशी वारीच्या मुर्तीचे कमालीचे साम्य आहे. असाच एक मारुती मी श्री गणेश मंदिर आदासा (जि. नागपूर) व मेंढा भृशुंडी गणपती मंदिर (जि. भंडारा) या दोन ठिकाणी प्रत्यक्ष जावून बघितले. दोन्हीही प्रतिमा राक्षसनिर्दालिन मुद्रेत असून भव्य व विशाल व धिप्पाड आहेत. समर्थ वाङ्मयाचे गाढे अभ्यासक कै श्री. श. श्री. देव यांनीच हे ठोकताळ कथीत केलेले आहेत. दास मारुती हात जोडून तर वीर मारुती प्रतिमा आक्रमक पवित्र्यात असून सशस्त्र (जंबिया कमरेला अधरोमुख लटकलेला असतो.) असतात. आपल्या विदर्भात असे राक्षस निर्दालन मुद्रेत असणारे किती हनुमंत आहेत याचा कसून शोध घ्यायला हवा. मी माझ्या एका विद्यार्थ्यास ह्या माहितीचे संकलन करण्यासच सांगितले आहे. मी स्वतः तर विदर्भाचे पुरातत्वीय समन्वेषणच करीत आहे. वरील निर्देशीत बाळापूर मुक्कामात मात्र समर्थांच्या या राष्ट्रीय प्रचोदनेबद्दल. प्रोत्साहानाबद्दल संशय आल्याने तद्‌नंतर इमादशाही शासकांनी त्यांचे मागे ससेमिरा लावला असावा त्यांनी सातपुडा न ओलांडता यवतमाळ, वर्धा, चंद्रपूर, नागपूर, मूल-चामोर्शी मार्गे मार्कण्डा तीरी उर्ध्व दिशेस गाढवी - खोब्रागडी नदी ओलांडून बस्तरमध्ये (मध्यप्रदेश) प्रवेश केला असावा. त्याही इलाख्याचा समर्थ संदर्भात अभ्यास व्हायला हवा. नागपूरच्या महाल विभागातील (कोठी रोड) श्री लक्ष्मी नारायण मंदिरात (नागपूरातील भोसले पूर्व कालीन गोसाव्याचे मंदिर) स्वामी समर्थ आल्याचे स्थानिक समर्थभक्त श्री. सालोडकर सांगतात व आपल्या म्हणण्याच्या सिद्धांतास बळकटी आणण्यास जांबियासह एक हनुमंत प्रतिमा दाखवितात. त्यावेळी मुकुंद गोसावी हा केंद्राचा प्रमुख होता. विदर्भात गोसावी-पूरी गोपालाचे खूप हिंदू पूजा अड्डे होते. त्याही संदर्भात कुण्या संशोधकाला समर्थ चरित्र (देशप्रवास) तपासायला हवे. ते काहीही असो पण संपूर्ण भारत भ्रमणाच्या वेळा समर्थ इ.स. १६३६ साली ३-३॥ महिने विदर्भात वास्तव्य करून होते. हे मात्र निश्चित! संशोधन विदर्भापूरते का होईना अजून सुरू आहे. कदाचित या लेखामुळे या विषयाला जागृती येवून पुढेही काही संशोधक नवनवीन माहिती उजेडात आणतीलच अशी आशा करण्यास हरकत नाही.

विदर्भात २४ ठिकाणी समर्थ स्थापित किंवा त्यांचे शिष्य स्थापित मठ-मंदिरे होती अशी अस्सल माहिती मिळते. फक्त मारुतीरायांचे राक्षस निर्दालन मुद्रेतील व सशस्त्र जंबीया खड्ग शुळ अशा प्रतिमा जंगला जंगलात, गिरी कंदरात, डोंगर-दऱ्यात कोठे कोठे आहेत ह्याचा शोध घेणे अगत्याचे आहे. स्वामींचे मठ वाशिम मुसेवाडी (नागपूर जिल्हा) गिरड (वर्धा जिल्हा) बाळापूर (अकोले) हिंगणघाट (वर्धा) मार्कण्डा (चंद्रपूर) गर्गाश्रय (गडचिरोली - आरमोरी) आदासा लाड कारंजे चिटणीसपुरा (महाल नागपूर) येथे होते. पुढे शिव पराक्रमात छत्रपतींनी उत्तरायुष्यात विदर्भातील लाडाचे कारंजे लुटले होते. त्या घटनेस स्वामींच्या विदर्भ-दर्शन संदर्भात अभ्यासणे आवश्यक आहे. शिवरायांनी विदर्भात केवळ लाड कारंजेच लुटले होते हे विशेष! आजचा काळ गतिमानतेचा व सुविद्य विज्ञानाधिष्टीत तथाकथित विद्वानांचा असल्याने प्राचीन भारतीय संस्कृतीच्या सर्वच पैलूंकडे टवाळकी-टिंगलीच्या दृष्टीकोनातून पाहणे अशी एक टूमच निघाली आहे. अर्ध्या हळकुंडातच पिवळे होतात (संशोधक). एखाद्या विषयाच्या मुळाशी गेल्याशिवाय त्या विषयाचा प्रफुल्लीत वृक्ष अभ्यासणे कठीण जाते. सर्व संदर्भ पैलू व इतर उद्बोधक पुराव्याचा आधार घेऊन, वैज्ञानिक पुरातत्व या विषयाच्या जागतिक संदर्भ चौकटीत भारतीय संस्कृती श्रेष्ठच होती असे मी डंके की चोट पर म्हणू इच्छितो. कारण मी प्रत्यक्ष जंगला जंगलात हिंडून प्रत्यक्ष दर्शनाने माहिती मिळवितो.

– श्रीपाद के. चितळे,
'सत्य निवास', नागपूर.
सहसचिव – भारतीय इतिहास संकलन योजना (विदर्भ)

# दिशा

श्रीकांत काशीकर

जे. कृष्णमूर्तींनी लग्नाच्या पहिल्याच रात्री आपल्या पत्नीला सांगितले, "का घातलेस तू हे दागिने? काढून टाक, कशाला घालायचे ते मंगळसूत्र? काढून टाक." हे ऐकल्यावर त्यांच्या पत्नी आश्चर्यचकीत होऊन बघत राहिल्या, की हा तडफदार तरूण असा का बोलतोय?

त्यानंतर कृष्णमूर्ती अमेरिकेला शिक्षणासाठी निघून गेले. ते परत येताच त्यांच्या पत्नीने महात्मा गांधींजवळ आशीर्वाद मागितला. त्या म्हणाल्या, "बापू, आशीर्वाद द्या मला." बापू म्हणाले, "अग, माझा आशीर्वाद आहेच तुला". त्यावर त्या म्हणाल्या, "नाही, आज काहीतरी वेगळा आशीर्वाद हवा आहे." बापूंनी त्यांच्या डोक्यावर हात ठेवला.

त्यावर त्या म्हणाल्या, "मी माझ्या पतीला सोडण्याचा निर्णय घेतला आहे." बापू म्हणाले, "अगं, पण त्याला विचारलंस का?" त्यावर त्या म्हणाल्या, "मी निर्णय घेतला आहे, तो पार पाडण्याची जबाबदारी माझी." कृष्णमूर्तींना ते कळले, पण ते गप्प बसले व कोणालाही असे वाटू दिले नाही, की आपण व आपली पत्नी वेगळे राहतो आहे.

हे सगळे घडले त्या तरूण वयात, स्वातंत्र्यापूर्वी, जेव्हा समाजाच्या रूढी व परंपरा झुगारून देणं म्हणजे खरोखरच एक आव्हान होते. या उदाहरणावरून असे वाटते की, आम्हाला असे काही करता येईल का? करता आल्यास ती क्रांती होईल.

समाजाच्या अनिष्ट रूढी व परंपरा झुगारून देता आल्या पाहिजेत हे फक्त आम्हीच करू शकतो. त्यासाठी मात्र अर्जुनाची एकाग्रता आणि टिळकांसारखे बंड करण्याचे सामर्थ्य हवे. हे सगळे कशामुळे शक्य होईल तर केवळ चांगल्या संस्कारांमुळे, चांगल्या आचारांमुळे, चांगल्या विचारांमुळे आपल्या नीतीमूल्यांचा ऱ्हास होतो आहे, त्या तुडविल्या जात आहेत, त्यांना जोपासायला हवे, नाहीतर, त्या नाहीशा होतील. ही भावना केव्हा येणार आम्हा लोकांमध्ये? जबाबदारीची जाणीव यायला हवी. फक्त एकट्याची किंवा आई-वडिलांची जबाबदारी न घेता पूर्ण समाजाची जबाबदारी घेण्याची क्षमता हवी. आम्हा तरूणांमध्ये फक्त अभ्यास, शिक्षण आणि संसार करून कर्तव्यपूर्ण होऊ शकत नाही. त्याला हवी आहे बंड करण्याची तलवार, सामर्थ्याने कुठल्याही संकटाला सामोरे जाण्याची शक्ति आणि शेवटी विनम्रतेची झालर. हे सगळं जर आम्हा जवळ असेल तर किंवा निर्माण करू शकलो तर क्रांती दूर नाही. मग समाजातल्या अनिष्ट परंपरा व रूढी उपटून फेकायला वेळ लागणार नाही. दलदलीमध्ये अडकलेल्या या समाजाला मग आम्ही योग्य मार्गावर आणू शकू. पण ..... त्यासाठी,

सामर्थ्य आहे चळवळीचे । जो जे करील तयाचे ।<br>
परंतु तेथे भगवंताचे । अधिष्ठान पाहिजे ।।

आम्ही जर अशी आत्तापासून एखादी चळवळ मोठ्या प्रमाणावर सुरू केली, तर तो दिवस दूर नाही. तेव्हा हा समाज खरोखरच योग्य मार्गाने, युक्त मार्गाने वाटचाल करू लागेल.

पण आजच्या तरूण पिढीला म्हणजेच आम्हाला जीवघेण्या स्पर्धेला तोंड द्यावे लागत आहे. सध्या कुठल्याही क्षेत्रात नुसते परिश्रम घेऊन चालत नाही, त्या परिश्रमांना शिफारसींचा थोडा तरी हातभार लागतोच. नाहीतर कदाचित् ते परिश्रम वाया जातात.

भारतीय संस्कृती ही सर्वात श्रेष्ठ व जगाच्या सुरूवातीपासून चालत आलेली आहे. ही संस्कृती आम्ही नाही जोपासणार तर कोण जोपासणार? हे काम फक्त आम्हीच करू शकतो.

आम्ही वसुंधरेबद्दल तितकेसे जागरूक नाही. वसुंधरेमधला आणि आम्हा तरूण पिढीमधला दुरावा कमी व्हायला हवा. त्यासाठी प्रयत्न हवेत. परीश्रम हवेत. जर वसुंधरेची हिरवी साडी तिला परत करायची असेल तर आम्ही आत्तापासून प्रयत्न करायला हवेत. नुसता विचार चालणार नाही, आचरणात आणले गेले पाहिजेत ते विचार. आम्ही वसुंधरेचे ऋणी आहोत, हे आमच्या मधल्या कित्येक जणांना लक्षातच येत नाही.

हा सगळा दोष समाजव्यवस्थेचा आहे, आईवडिलांचा आहे असे मला वाटते, 'Chatiry begins at home' ही म्हण येथे अगदी योग्य ठरते. म्हणूनच आईवडिलांनी आपल्या मुलामुलींना समजून घ्यायला हवे. त्यांच्यावर आपल्या महत्त्वाकांक्षा लादू नयेत. थोडेसे आमच्या कलाने घ्यावे. पण याचा अर्थ असा नाही की त्यांना काहीही करण्यास सूट द्यावी. म्हणूनच आईवडिलांनी 'Communalism under liberty' हे तंत्र वापरावे म्हणजे चूक होण्याचा प्रश्न उद्‌भवतच नाही. योग्य ती जाणीव आल्यास संपूर्ण मोकळीक द्यावी.

आम्हा तरूणांमध्ये काही जण लवकरात लवकर पैसा कमविण्याचे साधन शोधण्यात गुंतले आहेत. तो जितका जास्त मिळेल तितका चांगला. धीर धरण्याची व जबाबदारी वाहून नेण्याची क्षमता ही हळूहळू कमी होत चालली आहे. येथे एक गोष्ट

सांगावीशी वाटते, "एकदा एक तरूण एका धनिकाकडे सल्ला मागायला गेला. त्याने धनिकाला विचारले, "तुम्ही इतके श्रीमंत आहात, तेव्हा तुम्हाला एखादे साधन नक्की माहीत असेल, ज्याने मला लवकर श्रीमंत होता येईल." त्यावर तो धनिक म्हणाला, "प्रत्येक गोष्टीत धीर धरला पाहिजे मग सगळं व्यवस्थित होईल." त्यावर तो तरूण म्हणाला, "एक गोष्ट आहे, ज्याला धीर धरणं अशक्य आहे, ती म्हणजे चाळणीतून पाणी भरणे. त्यावर तो धनिक म्हणाला "मुळीच अशक्य नाही, चाळणीतील पाण्याचे बर्फामध्ये रूपांतर होईपर्यंत धीर धरा." याचा अर्थ असा, बौद्धिक क्षमता असूनही हा तरूण त्याचा उपयोग करत नाही.

म्हणूनच जर समाजाला योग्य मार्गावर आणायचे असेल, वसुंधरेचे ऋण चुकवायचे असेल आणि आपली नीतीतत्वे, जोपासायची असतील तर आम्ही सारासार विचार करून कुठल्याही धर्मवादात न अडकता, ज्या वादांमुळे विषमता निर्माण होईल, अशा वादात न अडकता, न भरकटता, जागरूक राहायला हवे. सिगारेट ओढणे, दारू पिणे, आईवडिलांच्या पैशावर ऐश करणे हे जीवनाचे ध्येय नक्की असू शकत नाही आणि ते असून चालणार नाही, चालवून घेतले जाणार नाही.

"मी दिशांचा यार मित्रा एक माझी वाट नाही
नाचवू झेंडा कुणाचा एक माझी जात नाही ॥
मी येथे मस्तीत माझ्या छेडतो गाणे मनाचे
गोडवे गाऊ कोणाचे मी कुणाचा भाट नाही ॥
घ्या कटोरा जा कुठेही जा मारीत तुम्ही हाका
काय मी मागू कुणा माझे रिकामे ताट नाही ॥"

वरील सांगितल्या गोष्टी साधायच्या असतील तर आम्हा तरूणांमध्ये समर्पणाची भावना यायला हवी. दोनच अवस्था खऱ्या – अहंकार नाही तर समर्पण – अहंकार म्हणजे संसार, समर्पण म्हणजे मुक्ती, अहंकार म्हणजे मी, समर्पण म्हणजे परमात्मा. आयुष्य म्हणजे समर्पण. आम्ही जितके आक्रमक होऊ, तितकी अशांती, जितकं सोपवून देण्याची तयारी ठेवू, तेवढे तरून जाऊ. एका शक्तिवर सगळं सोडून द्यावं व निरपेक्ष काम करावे, केले तर होईल मुक्ति या समाजाची, या वसुंधरेची, तर येईल आनंद या भूतलावर.

ज्ञान विज्ञानाच्या स्पर्धेवर इतर राष्ट्रे आकाशाला गवसणी घालत आहेत. तर आम्ही मागे का? सामर्थ्याला टक्कर देण्यासाठी तयार होण्याऐवजी अज्ञानात समाधान का? चिकित्सक वृत्तिचा अभाव का? अहंकार आला की ज्ञान, ज्ञान राहत नाही. केवळ शिक्षण म्हणजे ज्ञान हे आम्हाला का वाटते? शिक्षणापलीकडे ह्या जगात अनेक असंख्य गोष्टी आहेत. ज्यामुळे जीवन म्हणजे एक वरदान आहे असे वाटू लागेल.

ज्या प्रमाणे वेरूळ - अजंठा सारखी शिल्प, डोंगराएवढी उभी आहेत, पण त्यावर एकाही कलावंताचे नांव नाही, हे का? तर आपली नावनिशाणीही राहू नये, काळाच्या अखंड, अविरत प्रवाहात आपण आलो कधी गेलो कधी याचा मागमूसही राहू नये म्हणून. निरहंकारी जपत असत. पक्षी आकाशामध्ये विहार करतात. कोणत्या मार्गाने त्यांनी आकाशात विहार केला याचा मागमूसही राहत नाही. तशी कष्ट घेण्याची तयारी असली तर या वसुंधरेची मुक्ती दूर नाही. अहंकार सोडला आणि जबाबदारी वाहून नेण्याची क्षमता वाढविली तर आम्ही अर्जुनाच्या धनुष्यातला बाण होऊ शकतो. एवढे लक्षात ठेवले की विनम्रतेसारखा सम्राट नाही, म्हणजे ते आम्हाला पुरेल.

म्हणूनच मी श्रीहरीजवळ प्रार्थना करतो. त्याने आम्हाला सारासार विचार करण्याची शक्ती आणि युक्त मार्गाने चालण्याची बुद्धी द्यावी. ह्या प्रार्थनेत मागणी नाही, कारण मागणी आली की प्रार्थना संपली. ती भिक्षेची याचना झाली हेच सत्य.

॥ सुरवात ॥

श्रीकांत काशीकर
पारिजात सोसायटी,
बिबवेवाडी,
पुणे - ४११ ०३७.

Taste The Best
& forget the Rest

Kanchan is Real Kanchan

KANCHAN
GOLDEN TEA
An Impeccable Blend of
Exclusive Teas

KANCHAN TEA EMPORIUM
376, Shukrawar Peth,
Pune 411 002.

# झोपडीचे मनोगत

सौ. माधुरी पेंडसे

मी येथे उभी आहे - पाऊस - वारा यांच्याशी झुंजत निवारा देतेय, एका साध्या, गरीब पण सज्जन मजुराला म्हादू अन् गंगा दोन जीव राहतात. माझ्या निवाऱ्याला तीच राखतात माझी निगा.

रोज गंगा अंगण सारवते, स्वयंपाक करते, अन् मग ती दोघे कामावर जातात. मग या भयाण जगात मीच एकटी राहते. आसपासच्या हवेल्या मला हसतात – कुचेष्टेने – पण त्यांच्यात राहतात – लोकांच्या पैशाने – रक्ताच्या घामाच्या पैशाने आपले उखळ पांढरे करणारी सावकार, व्यापारी मंडळी! पण सुखी असतात का ती? छे सतत चिंतेत असतात – माझे पैसे कोणी चोरणार नाही ना? एवढी भक्कम हवेली तिला लोखंडी जाळ्या – पावलो पावली पहारेकरी अशा थाटात आहे. काळ्या पैशाने भरलेली तिजोरी सतत चिंतेत आहे.

कमाल आहे! त्यापेक्षा म्हादूच बरा. उद्याची चिंता नाही की पैसे जाण्याची भीती नाही. आहे त्यावर संतुष्ट राहून 'ठेविले अनंते तैसेची रहावे।।' यावर गाढ विश्वास ठेवून झोपतात माझ्या कुशीत निवांत! मी चंद्रमौळी आहे. चंद्र चांदण्या झरोक्यातून डोकावून या तृप्त जीवांचा हेवा करतात.

माझ्यात यावयास कुणाला बंदी नाही की दाराला कडी कुलूप नाही. साध्या तट्ट्याचीच आहे मी – चुकले मुकले, दीन गांजले माझा तया आसरा ।।

माझ्या समोरच्या देवळातील ज्ञानेश्वरीच्या स्वरांनी माझ्या साऱ्या व्यथा नष्ट होतात.

माझ्याच भाईबंदाच्या निवाऱ्याला ज्ञानेश्वर महाराज व त्यांची भावंडे त्यांना वाळीत टाकल्यावर राहत होती. माझ्याच आप्तांना मुक्ताबाईचा प्रेमळ स्पर्श लाभला होता. माझ्याच भाईबंदांच्या निवाऱ्याला तुकाराम महाराज राहत होते. तेही त्यांच्या रसाळ वाणीने भारून जात. मीही त्यांच्या इतकीच भाग्यवान आहे. फक्त त्यांनी त्या संतांच्या तोंडून ते ज्ञानभंडार ऐकले, मी इतरांच्या.

जेव्हा त्या ज्ञानेश्वरीतल्या आणि गंगाच्या ओव्यांच्या ध्वनीचा स्पर्श मला होतो. त्या वेळी निजानंदात डोलत मी म्हणते –

असेन क्षुद्र झोपडी मी एक<br>
मिळणार अशी ना शोधून दुसऱ्या लाख ।

खरंच सांगा मला मिळणारे सुख त्या श्रीमंत हवेलीला मिळत असेल काय? मी काय आज आहे अन् उद्या नाही. नुसत्या जोराच्या वाऱ्यानेही मी उन्मळून पडेन. पण मी कृतार्थ झाले आहे. मी जनसेवा केली आहे. मी चार पवित्र शब्द ऐकले आहेत. त्याच चिंतन करीतच मी माझ्या शेवटाला सामोरी जाईन .....

सौ. माधुरी चंद्रकांत पेंडसे<br>
२७४ ब पर्वती,<br>
विश्वनाथ कृपा, पुणे - ४११ ००९.



# संघर्ष

दीपा पाठारे

"जीवनात संघर्ष नसेल तर जगण्यात काय हशील? संघर्षातच जीवनाचे काव्य आहे." असे पूज्य स्वामी विवेकानंद म्हणतात. जन्माला आलेला जीव कोऽहम् म्हणतो तेथूनच त्याच्या संघर्षाची सुरूवात होते. आणि ती जन्म व मृत्यू यांतील या प्रवासात अखंडपणे चालूच असते.

प्रत्येक जीवाला कुठल्या ना कुठल्या रूपाने संघर्ष करावाच लागतो. संघर्ष नसेल तर सृष्टीचा खेळ चालणारच नाही. संघर्ष हा जीवनाचा प्राण आहे. संघर्ष माणसाचे जीवन घडवितो. संघर्ष म्हणजे काय शेवटी? झुंज, लढाई, (युद्ध) 'Struggle, Struggle for Existance' किडा मुंगीपासून प्रत्येक जण ही लढाई सातत्याने लढत असतो. ही लढाई असते जगण्यासाठी. जीवनातील कुठलीही बाजू घेतली, व्यावहारिक किंवा भावनिक, तरी झुंज आहेच. व्यावहारिक जगात अनेक स्तरांवर, उदाहरणार्थ, शिक्षण, खेळ, उद्योग इ. सर्व क्षेत्रांतील संघर्ष हा काहीतरी मिळवण्यासाठीच चालू असतो, म्हणजेच अपेक्षापूर्तीसाठी असतो. कारण जीवाची सहज ओढ सुखाकडे आहे. सुख मिळावे, दुःख टळावे ही प्रत्येकांची अपेक्षा असते. अपेक्षापूर्तीसाठी संघर्ष आणि अपेक्षा असते म्हणून अपेक्षाभंगाचा धोकाही असतोच, म्हणून अपेक्षाभंग झाल्यावरही संघर्ष.

सखोल विचार केला तर संघर्ष हा बाह्य स्तरांवर मर्यादित नसून आंतरिक स्तरांवर सतत चालू असतो; प्रतिक्षणी चालू असतो. लढाई स्वतःशीच असते. प्रत्येक वेळी संघर्ष ऐहिक गोष्टींसाठी असतो. असे नाही. तर भावनांचाही असतो. उदा. आपल्या प्रत्येकाला माहीतच आहे, सत्य बोलावे. पण काही वेळा तोंडून असत्य बाहेर पडते. पण नंतर मात्र आंतमध्ये संघर्ष चालू होतो, आपण असे का केले? कधी कधी बोलण्याच्या आधीही मनात संघर्ष होतो, बोलावे की न बोलावे? खरं बोलू का खोटं बोलू? खोटं बालले तरी कठीण. खरं बोललं तरी कठीण. अशी परिस्थिती कित्येक वेळा येते ना? अशा अनेक घटना आपल्या जीवनात सतत घडत असतात.

जेव्हा व्यक्ती काही मिळविण्याचा किंवा घडण्याचा प्रयत्न करते त्यावेळी संघर्ष आणखीनच तीव्र होतो. कारण ध्येयाप्रत पोहोचण्यासाठी मार्गातील अडथळे ओलांडावे लागतात. स्वतःतील दोष स्वीकारून दूर करावे लागतात. मनुष्याने प्रथम स्वतःचे दोष स्वीकारणे ही प्रगतीची पहिली पायरी आहे. इथे संघर्ष आहे. स्वतःबद्दलच्या अपेक्षा स्वतः पूर्ण करू शकला नाही तरी मनुष्य स्वतःला नाकारतो. Self acceptance साठी मनाशी संघर्ष करावा लागतो बुद्धीशी लढावे लागते. आणि दोषांना जाणीवपूर्वक शक्तिनिशी दूर करावे लागते.

साधे जीवन जगत असताना, संकल्प विकल्प मनात असताना, जीव जीवनयात्रेचा प्रवास करत असतो. जेव्हा मी कोण, कोठून आलो, कोठे जाणार? हे प्रश्न मनात येतात तेव्हा तो मुमुक्षु बनतो, जिज्ञासा जागृत होते आणि ती असते मोक्षयात्रा. आता संघर्ष अधिकच तीव्र होतो. बाह्य जगतातील संघर्षाबरोबरच अंतर्जगतातील वासना, विकार, विकल्प, मन, बुद्धी व षड्रिपु यांच्याशी झुंज सुरू होते. इंद्रिये मन व बुद्धी सतत विषयांचा आणि विकल्पांचा आहेर करीत असतात. म्हणून श्री संतश्रेष्ठ गोंदवलेकर महाराज म्हणतात, "आपण त्यांना नामाचा आहेर करू या" जितकी साधना अधिक वाढते तितकाच यांचाही जोर वाढतो. सिद्धावस्थेतही मन, बुद्धी आपली संकल्प विकल्प आणि अनिश्चितता ही कार्ये बजावीतच असतात. पण त्यावर आधिपत्य श्रीगुरुदेवांचे असते आणि निष्ठा आपली.

संघर्ष शब्द आला की डोळ्यासामोर उभे राहतात प. पू. स्वामी विवेकानंद. प्रचंड गुरुकृपा, प्रचंड निष्ठा, तेज, वैराग्य असणारे स्वामीजी आपल्या चरित्रातून प्रत्येकाला परिस्थितीशी सामना करण्याची स्फूर्ती देतात. प्रतिकूल परिस्थितीला अनुकूल बनवून प्रगति करून स्वहित साधणाराच विवेकी माणूस होय.

'Life is a Struggle, fight it' बच जाऐ तो और लढे पाऊल राहिल सदा पुढे

'Struggle is a challencge let us all meet it.'
life is a struggle, fight it.
Life is a Challenge meet it.
Life is a Puzzle, Solve it.
Life is a goal, achieve it.

कु. दीपा पाठारे
चंद्रिका सोसायटी,
बिबवेवाडी, पुणे-४११ ०३७.

# अध्यात्म व ग्रहयोग

ब. दा. भट

'अध्यात्म' हा प्रांत सर्वच बाबतींत सामान्य बुद्धीच्या पलीकडील आहे. श्री सद्गुरू स्वामी स्वरूपानंदांच्या संबंधात असताना अनेक व्यक्तींशी ह्या ना त्या तऱ्हेने जो संबंध आला त्या वेळी ह्या प्रांतातील अनेक आश्चर्यकारक, गूढ गोष्टींचे ज्ञान झाले. एखाद्या जीवाला आध्यात्मिक जीवनाची आवड का निर्माण होते व दुसऱ्याला त्या गोष्टींकडे वळण्याची थोडीसुद्धा इच्छा का होत नाही ह्या संबंधी कोणतीही व्यावहारिक कारण मीमांसा करता येत नाही. एखादी व्यक्ती केवळ, नाव ऐकून, फोटो पाहून श्रीं च्या दर्शनास आलेली आढळली तर काही कुटुंबात संपूर्ण वातावरण स्वामीमय असूनही कुटुंबातील एखाद्या व्यक्तीस त्यांचे दर्शन घेण्याची इच्छाही कधी झाली नाही असे आढळले. 'बहुत सुकृताची जोडी' असल्याशिवाय जीव ह्या मार्गाकडे वळत नाही. फलज्योतिषशास्त्रांत जन्मकुंडली वरून जीवाची वाटचाल पूर्वजन्मीची, ह्या जन्मीची व पुढील जन्मीची स्पष्ट कळू शकते. मुळातच जन्मकुंडलीवरून पूर्वसुकृताचे दर्शन चांगले होऊ शकते. प्रत्येक जीवाची आध्यात्मिक वाटचाल जणू पूर्वनियोजितच असते. त्यामुळे 'योग्य वेळ, योग्य गुरू,' वगैरे प्रकार ह्यात आढळतात.

फलज्योतिषशास्त्र हे मुळातच जीवाच्या संचिताचे यथार्थ दर्शन घडवणारे शास्त्र असल्याने व्यक्तीची आध्यात्मिक पूर्वजन्मीची बैठक, ह्या जन्मीची त्याची त्या संबंधी वाटचाल, ग्रहयोगावरून स्पष्ट कळते. जन्मकुंडलीतील 'पंचम', 'नवम' व 'व्यय' ही तीन स्थाने ह्या बाबतीत महत्त्वाची आहेत. पंचम हे उपासनेचे स्थान आहे. ह्या स्थानावरून जीवाचे पूर्वपुण्य, पूर्वसुकृत, मंत्र वा जप, गुरुमंत्र, उपास्य दैवत वगैरे गोष्टींचा बोध होतो. ह्या स्थानातील ग्रहावरून व्यक्ती कोणत्या देवतेची उपासना, भक्ती करील, ती कोणत्या सांप्रदायातील आहे हे कळू शकते. जसे :- बुध - विष्णू उपासनेला, चंद्र - देवी- शक्ती उपासनेला, गुरु - शिव - दत्त सांप्रदायाला, मंगळ - गणेश उपासनेला अनकूल असतात. पंचमातील ग्रहाप्रमाणेच पंचमेश हा ग्रह उपासनेचा बोध करतो. सर्वसाधारण पंचमात बलवान ग्रह, पंचमेश लग्नात, व्ययांत, नवमांत असणे किंवा त्या स्थानाच्या अधिपतीबरोबर असणे हे व्यक्तीच्या ठिकाणी पूर्वजन्मीचा आध्यात्मिक वारसा असल्याचे निदर्शक तर आहेच शिवाय सत्प्रवृत्ती, मूळ शुद्धपिंड व आध्यात्मिक उन्नतीचे द्योतक आहे. उदाहरणे अनेक देता येतील.

श्री स्वामी स्वरूपानंद – पंचमेश पंचमात स्वगृहीचा

रामकृष्ण परमहंस – पंचमांत गुरूसारखा ग्रह

विवेकानंद – पंचमेश पंचमांत - मेहेरबाबा - व्ययेश गुरूपंचमांत

रावसाहेब सहस्त्रबुद्धे – पंचमेश भाग्यात. गुळवणी महाराज - पंचमेश उच्च राशीचा. सोनोपंत दांडेकर - पंचमेश गुरू उच्च राशीचा व्ययांत. महर्षी पटवर्धन - पंचमेश व्ययांत स्वगृहीचा. – – गोंदवलेकर महाराज :- पंचमेश व्ययात. अशी यादी देता येईल.

कल्याणीचा हा श्रीज्ञानेश्वर महाराज विशेषांक असल्यानें श्रीज्ञानेश्वर महाराजांची कुंडली पुढे देत आहे.

**श्री संत ज्ञानेश्वर**

श्रावण कृष्ण अष्टमी शके ११९७-१५ ऑगस्ट १२७५ मध्यरात्री आळंदी.




| रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि |
|---|---|---|---|---|---|---|
| १५ | रोहिणी | १ | २९ | २४ | २९ | २६ |

| राहु | हर्शल | नेप. | प्लुटो | केतु |
|---|---|---|---|---|
| २२ | ३ | ११ | २८. | २२ |

श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या कुंडलीत भाग्येश शनी पंचमात असताना पंचमेश बुध कर्क राशीत मीन नवमांशी, गुरूच्या दृष्टीत व गुरूच्या नवपंचमयोगांत आहे. शिवाय बुध ज्या राशीत आहे त्या राशीचा अधिपती चंद्र उच्च राशीत असल्याने हा बुध अनेक गोष्टी दर्शविणारा आहे. ते साक्षात् विष्णूचे अवतारच होते. शिवाय तृतीयस्थान भावंडाचे निदर्शक आहे. ज्येष्ठ बंधू निवृत्तिनाथ हेच त्यांचे आध्यात्मिक गुरू ह्या दृष्टीनेही चंद्र बुध गुरू संबंध अभ्यासण्यासारखा आहे. पंचमातील शनी गुरू दृष्ट ह्यामुळे ते नाथसांप्रदायी होते. बुध पंचमेश तृतीयात गुरू नवमांशी, तृतीयेश

उच्च राशीचा ह्यामुळे 'ज्ञानेश्वरी' निर्माण झाली.

सर्वसाधारण कुंडलीत प्रथमस्थान हे वर्तमान जन्माचे, पंचमस्थान पूर्वजन्माचे व नवमस्थान पुढील जन्म, व्ययस्थान मोक्ष दाखवणारे आहे. नवमस्थान हे धर्म, तपाचरण शुद्ध आचारविचार, आध्यात्मिक अनुभूती, गुरू, गुरूकृपा वगैरे सर्व दृष्टीने महत्त्वाचे असते. नवमातील ग्रह विशेषतः गुरू, हर्षल, नेपच्यून सारखे, नवमेश, हे आध्यात्मिक उपजत गुण, दैवी शक्ती, आध्यात्मिक अनुभूती, अतिंद्रियशक्ती ह्या गोष्टी दाखवतात. कुंडलीतील पंचम व नवम ह्या दोन स्थानांना तप धर्म स्थानें म्हणतात. त्यांच्या आधिपतींची युति, अनोन्ययोग किंवा पंचमेश भाग्यात, किंवा भाग्येश पंचमात किंवा पंचमेश, नवमेश ह्यांची गुरूशी युती हे योग आध्यात्मिक उन्नतीला अत्यंत पोषक असतात. उदाहरणार्थ

*स्वामीसमर्थ – भाग्येश मंगळ उच्च राशीचा.*
*स्वामी स्वरूपानंद – भाग्यात गुरू नेपच्यूनच्या नवपंचमयोगात*
*रामकृष्ण परमहंस – भाग्येश शुक्र उच्च राशीचा तसेच भाग्यात शनी उच्च राशीचा.*
*विवेकानंद – भाग्येश रवी धनु राशीचा लग्नात*
*महर्षी पटवर्धन – भाग्येश भाग्यात,*
*गोंदवलेकर महाराज - भाग्येश पंचमेशासह व्ययात.*
*जे. कृष्णमूर्ती – भाग्येश पंचमात.*
*पॉल ब्रँटन –भाग्येश उच्च राशीत.*
*पंत बाळेकुंद्री – भाग्येश भाग्यात.*

संत ज्ञानेश्वरांच्या कुंडलीत भाग्येश शनी पंचमात असून स्वगृहीच्या गुरूच्या दृष्टीत आहे.

कुंडलीत पंचम, नवमस्थानाबरोबर व्ययस्थानातील ग्रह हे आध्यात्मिक दृष्टीने महत्त्वाचे असतात. व्ययस्थान हे त्याग, विरक्ती, एकांतवास मोक्ष, आसक्तीनाश वगैरे दृष्टीने परिणामकारक असते. व्यक्तीची मरणानंतरची स्थितीसुद्धा हे स्थान दाखवते. व्ययातील बलवान शुभग्रह, गुरू, केतु, हे आध्यात्मिक उन्नीतीचे निदर्शक आहेत. व्ययेशाचे पंचम-नवम स्थानाशी असणारे संबंध उच्च स्वरूपाची आध्यात्मिक उन्नती दाखवणारे असतात. उदाहरणार्थ –

स्वामी स्वरूपानंद – व्ययेश पंचमात स्वगृहीचा
विवेकानंद – व्ययेश पंचमात स्वगृहीचा
रामकृष्ण परमहंस – व्ययेश उच्च राशीचा भाग्यात
मेहेरबाबा – व्ययेश पंचमात.
गुळवणी महाराज – व्ययेश पंचमात.
सोनोपंत दांडेकर – पंचमेश गुरू व्ययात, व्ययेश चंद्राच्या युतीत.
महर्षी पटवर्धन – व्ययेश व्ययात.

श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या कुंडलीत व्ययेश मंगळ मुळातच गुरूच्या राशीत असून मेष ह्या स्वनंवमाशी आहे व त्याचा पंचमेश तसेच गुरूशी नवपंचमयोग आहे.

कुंडलीत कर्क वृश्चिक मीन ह्या मोक्ष त्रिकोणाच्या राशी आध्यात्मिक प्रगतीला अत्यंत पोषक असतात. त्याचप्रमाणे गुरू ग्रहाच्या धनुमीन राशी जास्त शुभफलदायी आहेत. ह्या राशींचे नवमांश हे सुद्धा परिणामी आढळतात. ग्रहांच्या दृष्टीने गुरू हा ग्रह स्वगृहीचा म्हणजे धनु-मीन राशीत तसाच उच्च म्हणजे कर्क राशीत जास्त शुभफलदायी असतो. अनेक सत्पुरूषांच्या कुंडलीत गुरूची राशी व स्थान ही फार महत्त्वाचे आढळते.

*श्री स्वामी समर्थ – गुरू धनु.*
*स्वामी स्वरूपानंद – गुरू भाग्यात.*
*रामकृष्ण परमहंस – गुरू पंचमात.*
*मेहेरबाब – गुरू पंचमात.*
*रावसाहेब सरस्त्रबुद्धे – गुरू उच्च राशीत - कर्केत*
*सोनोपंत दांडेकर – गुरू कर्केच्या उच्च राशीत.*
*गोंदवलेकर महाराज – गुरू मीनेचा.*
*अरविंद घोष – गुरू उच्च राशीत.*

श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या कुंडलीत गुरू मीन राशीचा स्वगृहीचा आहे.

ज्या व्यक्तींना काही दैवी शक्ती असतात, ज्यांना काही दिव्य अनुभूती येतात किंवा ज्याच्या ठिकाणी काही असामान्य गुण असतात अशा व्यक्तींच्या कुंडल्यात हर्षल, नेपच्यून ह्या ग्रहांचे रवी, चंद्र, गुरू, ह्यांची ग्रहांशी होणारे प्रथम दर्जाचे योग, युती, नवपंचमयोग, प्रामुख्याने आढळतात. साक्षात्कारी, उन्मनी, सिद्धपुरूषांच्या किंवा महान चमत्कार ज्यांच्या जीवनात झालेले आढळतात त्यांच्या कुंडलीत असे योग आढळतातच.

*स्वामी स्वरूपानंद – पंचमेश शुक्र नवपंचमयोग नेपच्यून.*
*रावसाहेब सहस्त्रबुद्धे – चंद्रनेपच्यून युती, रवीनेपच्यून प्रतियोग*
*सोनोपंत दांडेकर – चंद्र हर्षल नवपंचम.*
*गोंदवलकर महाराज – गुरूहर्षल, रवी, नेपच्यून युती.*
*श्रीधर स्वामी – शुक्रहर्षल, गुरूहर्षल, नवपंचम.*
*नारायण महाराज – रवीनेपच्यून युती,*
*मिटकर महाराज – रवीहर्षल युती.*

श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या कुंडलीत रवी स्वगृहीचा नेपच्यूनच्या पूर्ण युतीत आहे. ऐहिक जीवनाच्या दृष्टीनेही त्यांच्या कुंडलीतील ग्रहयोगांचे विवरण करता येईल पण ते करण्याचा लेखाचा उद्देश नाही.

व. दा. भट
१४१२, सदाशिव पेठ,
पुणे - ३०.

# “गुण लावण्याची खाणी । संताच्या रूपे उभे माझे चक्रपाणी”

अ. के. पाकणीकर

**अध्यात्म संचित**

'सत्य संकल्पाचा दाता भगवान' परमेश्वराच्या सत्तेने हे विश्व चालते हा बोध अध्यात्म शास्त्राच्या वाटेवरील वाटसरूंना नविन नाही. त्यांची परमेश्वरावरील निष्ठा, श्रद्धा, भक्तीमधील एकरूपता सहजपणे पूर्णपणे जाणवते. म्हणूनच आज कित्येक वर्षे आळंदी ते पंढरपूर वारकरी देहभान विसरून सत्-चित्-आनंद उपभोगित श्री विठ्ठलाच्या दर्शनासाठी जात आहेत. त्यामधीलच मी एक माऊली भक्त गेली पंचेचाळीस वर्षे आळंदीची वारी करीत आहे.

हेचि थोर भक्ति आवडती देवा । संकल्पावी माया संसाराची
ठेविले अनंते तैसेचि रहावे । चित्ती असो द्यावे समाधान
वाहिल्या उद्वेग दुःखचि केवळ । भोगणे ते फळ संचिताचे
तुका म्हणे घालू तयावरी भार । वाहूं हा संसार देवा पायी

समाधान केंव्हा मिळते? संत श्रेष्ठ तुकारामांनी वरील अभंगात उत्तर दिले आहे. ते सर्वस्वी तुमच्यावरच अवलंबून आहे व ते एक प्रकारे प्रत्येकाच्या संचितावर अवलंबून आहे. संचिताची त्रिपूटी तीन प्रकारची खालील प्रमाणे –

१) आपल्या कुळाकडून आलेला अध्यात्मिक वारसा
२) अध्यात्मिक सद्‌गुरूकडून मिळालेले आत्मधन
३) सद्‌गुरूच्या मार्गदर्शनाखाली मिळालेली स्वतःची अनुभूती

ह्या सर्व गोष्टींचा विचार करून जो साधक आपापल्या संसारात राहूनही परमार्थाची वाटचाल करीत असेल व स्वतःच्या साधनेत आत्मतृप्त असून परमेश्वराचे नित्य चिंतन-मनन, जपजाप्य, भजन थोडेसे संत वाङ्‌मय - ज्ञानेश्वरी, दासबोध, एकनाथी भागवत असे ग्रंथवाचून अभ्यास करीत असता सहजपणे आलेली कर्मे निष्कामपणे आचरीत असेल तर परमेश्वर त्यांच्यावर निश्चितच कृपा करील असा माझा स्वतःचा अनुभव आहे.

**१) कुळाकडून मिळालेला अध्यात्मिक वारसा**

आमच्या घरचे 'कुलदैवत' आंध्र प्रदेशामधील 'गिरीबालाजी' हे शेषाद्री पर्वतावर सात डोंगराच्या पलीकडे वसलेले आहे. श्री. विष्णूचा अवतार घेऊन विराजमान झालेले भारतामधले प्रमुख तीर्थक्षेत्र आहे. हे तीर्थक्षेत्र सर्वात श्रीमंत गणले जाते. माझे आजोबा व आजी तिकडील 'मध्वाचार्य' संप्रदायातील अनुग्रहीत होते. त्यांच्याकडूनच मला अध्यात्मिक वारसा मिळाला. आजोबा व आजीची जन्मतिथी माघ शु ॥ १० व निर्वाण दिन वद्य॥ ११ फक्त महिनें निराळे व ॥ ११ एकादशी ही माऊलीची एकादशी समजली जाते. तेव्हा त्यांच्या स्मरणार्थ मी १९५० पासून आळंदीची वारी करीत आहे.

'इवलेसेंरोप लावियेले द्वारी । त्याचा वेलु गेला गगनावरी
मोगरा फुलाला मोगरा फुलला । फुले वेचिता अतिभारू कळियासी आला
मनाचियें गुंतीं गुफियेला शेला । बापरखुमादेविवरू विठ्ठली अर्पियेला
(संत ज्ञानेश्वर महाराज)

आधि बीज एकले । बीज अंकुरले रोप वाढले
एका बीजा पोटी । तरू पोटी । कोटी जन्म घेती सुमनेफळे
व्यापुनि जगता । तूही अनंता । बहुविध रुपे घेसी तेचि ब्रह्म एकले
(संत तुकाराम)

ह्या संत ज्ञानेश्वर महाराज व संत तुकाराम महाराज ह्या दोघांच्या अभंगाप्रमाणे मी लावलेल्या वेलाला सुद्धां अतिभार येऊन, आलेल्या अनुभूतीनें सत्-चित्-आनंद अक्षरशः उपभोगित आहे.

परमार्थामध्ये व संसारामध्ये जवळची नातेवाईक मंडळीसुद्धा चांगली असणे हे सुद्धा भाग्य आहे.

दोन घडीचा डाव । याला जीवन ऐसे नांव
मनासारिखा मिळे । सवंगडी
संसारी मग अविट गोडी...

परमार्थामध्ये व संसारात आपल्या सहधर्मचारिणीची उत्तमशी जोड असणे हे सुद्धां मोठे भाग्य, मुले, सुना, व्याही, चांगली असणे हे सुद्धां मोठे भाग्य ह्या सर्व गोष्टी मला अनुकूल असल्यामुळे हा कुळाकडून आलेला अध्यात्मिक वारसा समजतो.

**२) अध्यात्मिक सद्‌गुरूचा शोध व मिळालेला वारसा**

प्रत्येकाच्या जीवनांत सद्‌गुरू मिळतीलच असे नाही हे फक्त आपल्याव संचितावर निश्चित अवलंबून आहे. माझेही असेच झाले. सद्‌गुरूचा शोध घेत असता भिरनिराळ्या संप्रदायामधील सद्‌गुरूचा सहवास घडला परंतु माझे सद्‌गुरू नाथ संप्रदायामधील आहेत व ते मला लवकरच भेटतील असे तिघांनी सांगितले त्यांची नांवे १) परमपूज्य बापू महाराज (मानवतकर) त्यांचा ह्या मासिकांत आशिर्वादपर लेख आहे. व ते आजमितीस हयात आहेत. २) योगीराज गुळवणी महाराज ३) स्वामी प्रणवानंद. दोघांनी देह ठेविला आहे. ह्या तिघांच्या सांगण्याप्रमाणे घरचे श्री विष्णूचे कुलदैवत असल्यामुळे आदिनाथापासून चालत आलेल्या नाथ

संप्रदायामधील पावसचे परमहंस स्वामी स्वरूपानंद यांचे अंतरंग शिष्य परमहंस सद्गुरू स्वामी माधवनाथ यांच्याकडून १९७७ सालच्या 'अनंतचतुर्दशीस' (माझ्या वाढदिवसादिवशी) आम्ही उभयतां अनुग्रह घेतला. आज १७ वर्षे होत आहेत. त्यांच्या मार्गदर्शनाखाली माझी अध्यात्मिक वाटचाल होत आहे. अनुग्रहानंतर आळंदीस जाताना जे चिंतन-मनन होत गेले त्याचे पद्यरूपांतर म्हणजे 'आळंदीच्या वाटेवर' म्हणून अभंग रचना होऊ लागली. त्या रचना माऊलीच्या समाधीस स्पर्श करून स्वामी माधवनाथांस अर्पण करू लागलो. त्या रचनापैकी कांही रचना ओंकार ट्रस्टच्या 'कल्याणी' च्या संत श्री ज्ञानेश्वर महाराज विशेषकांत देण्याची विनंती ओंकार ट्रस्टचे विश्वस्त श्री. सातवळेकर यांनी केल्यामुळे आळंदीच्या वाटेवरची स्फुरणे प्रथमच संत श्रीज्ञानेश्वर महाराज विशेषांकात याव्यात ही सुद्धा माऊलीची कृपा असे गृहीत धरले तर वावगे होणार नाही. कांही रचना पुढीलप्रमाणे –

आळंदीच्या वाटे । माऊलीची कृपा ।
स्वरूपाचा ध्यास । लागे जीवा लागे जीवा ॥१॥
भक्तांच्या पाऊला । अणुरेणू विसावती ।
टाळ मृदंग नादे । वारकरी हो नाचती वैष्णव हो नाचती ॥२॥
ज्ञानोबा-तुकाराम । रामकृष्ण हरि ।
नामघोष ऐकता । अवतरले श्रीहरि विश्वात्मक रूपे ॥३॥
आळंदीची वाट । चालता पाऊली ।
भक्त होई लीन । सद्गुरूपायी ॥४॥
आळंदीची वाट । कैवल्याची पेठ ।
भक्तांचा विसावा । निर्गुणाची भेट दास म्हणे ॥५॥
(श्रावण व॥ ८ गोकुळ अष्टमी १९-८-८४)

**सात्विक आहार**

सात्विक आहार । साधके सेवावा ।
हाचि नेम व्हावा । साधना मार्गी ॥१॥
सात्विक आहारे । रज-तम-जाई ।
चंचल मन ते । स्थिर ते होई ॥२॥
सात्विक आहारे । पुण्याचा संचय ।
मी-तू-पण । जाई रे सत्वर ॥३॥
सात्विक आहारे । अहंकाराचा नाश ।
चित्ति समाधान । बाणतसे दास म्हणे ॥४॥
(विजया दशमी २ ऑक्टोबर १९८७)

**भक्तांच्या घरी**

भक्तांच्या घरी ।
वास करी श्रीहरि संतांच्या रूपे ।
भक्तांच्या अंतरी ।
वास करी श्रीहरि संताच्या रूपे ॥१॥
भक्तांचे योगक्षेम ।
वाही हा संसारी ।
देई मुक्ती तयांस ।
साधना परीक्षा खरी ॥२॥
संत येती घरा ।
तोचि दिवाळी-दसरा ।
तोचि भक्तांचा सण ।
अंतरी उमटे संत खूण ॥२॥
करू संताचे पूजन ।
भक्तीभावे -भक्तीभावे ।
घालूं लोटांगण ।
जीवेभावे - जीवेभावे ॥४॥
श्रीहरिचा वास ।
कधी कोणा न कळे ।
ज्यासी अनुभूती ।
त्यासी कळे ॥५॥
संताचा आशिर्वाद ।
देवाचाच प्रसाद ।
तोचि साक्षात्कार मज ।
दास म्हणे ॥६॥
मुक्काम - कन्याकुमारी
स्वामी विवेकानंद स्मारक ध्यान मंदीर ११-९-८७

आजपर्यंत बऱ्याच रचना स्वामी माधवनाथाचा दास म्हणून माधवदास ह्या टोपण नावाने स्वामी माधवनाथांच्याच कृपेने होऊ शकल्या हेच अध्यात्मामधील सद्गुरूच्या कृपेचे संचित.

**३) परमहंस सद्गुरू स्वामी माधवनाथ यांच्या मार्गदर्शनाखाली स्वतःला आलेल्या अनुभूती हे अध्यात्म मार्गामधील तीसरे संचित**

गेल्या सतरा वर्षामध्ये आलेल्या निरनिराळ्या अनुभूती पुष्कळच आहेत. त्या सर्व ह्या ठिकाणी देणे शक्य नाहीत. सद्गुरू तत्व एकच असल्यामुळे प्रत्येक जन्मामध्यें आपल्या शिष्यास सद्गुरू साथ देत असतात त्यामध्ये कुठेही खंड पडत नाही. अशी माझी गुरूतत्वावर अखंड श्रद्धा, सद्गुरूवर पूर्ण विश्वासाने निष्ठा ठेवून माझ्या पारमार्थिक जीवनाची वाटचाल करीत आहे. त्यामुळे उच्च कोटीमध्ये गणना होईल अशा अनुभूतीची कमतरता नाही. त्या अनुभूती इतर सामान्य लोकांना कळणार नाहीत. परंतु सद्गुरू तत्वाचा ज्या साधकांना स्पर्श झालेला आहे त्यांना त्या निश्चितच कळू शकतील. थोड्याशा खालीलप्रमाणे अनुभवलेल्या अनुभूती.

१) मागील जन्मामधील सद्गुरूंनी ह्या जन्मी स्वामी माधवनाथास मला अर्पण केल्यामुळे स्वामी माधवनाथांचा अनुग्रह होण्यापूर्वी म्हणजे १९४६ साली माझ्या अंगावर रात्री झोपेमध्ये घराचा संपूर्ण पहिला मजला पडल्यामुळे मी मृत्यूच्या अगदी जवळ

जाऊन सुद्धां त्या गंडांतरामधून मी निर्विघ्नपणे बाहेर पडलो. याचाच अर्थ की, गुरूतत्व आपल्या शिष्यास संकटाच्या वेळी निश्चित साथ देते. पुढे होणाऱ्या शिष्यास स्वामी माधवनाथांनीच सावरले अशी माझी श्रद्धा व विश्वास आहे.

२) या गंडातरानंतर त्यावेळी बसलेल्या मारामुळे माझ्या पाठीच्या पांच मणक्याचे व स्लीपडीस्कचे ऑपरेशन १९९१ साली झाले. हॉस्पिटलमध्ये ॲडमिट केले तेव्हां ३% हेमोग्लोबीन रक्त शिल्लक असतांना सुद्धां मी ह्या दुसऱ्या गंडातरामधूनही सहिसलामत वाचू शकलो. ही सुद्धा माझ्या सद्‌गुरूच्या कृपेची साक्षच आहे. व ज्यांनी मला मृत्यूच्या दाढेमधून वाचविले ते डॉ. ह. वि. सरदेसाई व डॉ. तळवळकर यांचे उपकार मी कधीही फेडू शकणार नाही त्यांचा मी सर्वथा ऋणी आहे.

३) ऑपरेशन झाल्यानंतर कमीत कमी एक वर्ष मला एक पाऊलसुद्धा टाकण्याची ताकद नव्हती. परंतू सद्‌गुरूकृपेने व स्वतःच्या मनोबलावर विश्वास ठेवून माझे पूर्वी असलेले पारमार्थिक जीवन पुनः नॉर्मलवर आणले आहे. १९९४ साली श्रीज्ञानेश्वर माऊलीच्या कृपेने व श्री पांडुरंगाच्या आशिर्वादाने आम्ही उभयंता आळंदी ते पुणे व गोंदवले ते पंढरपूर संत गोंदवलेकर महाराजांच्या पादुकांबरोबर पायी वारी करून आलो. तीन वर्षे काठी घेऊन चालत होतो. पंढरपूरी श्री पांडूरंगानी माझी काठी काढून घेतली. आता काठीशिवाय चालत आहे.

**संताचे आशिर्वाद**

४) झालेल्या रचनेवर प्रथमतः संत धुंडामहाराज देगलूरकर ह्यांनी खालीलप्रमाणे अभिप्राय दिला.

'अंतरातल्या भावनेतून सहज स्फुरलेले हे काव्य आहे. परमार्थाची ओढ आहे संताच्या काव्याची छाया मधूनमधून सहज पडलेली दिसते. अशीच स्फूर्ती वृद्धिंगत होत राहो."

जेष्ठ व॥ ११ २५-६-८४ धुंडा महाराज देगलूरकर

'भगवंताच्या प्रेमाने अंतःकरण द्रवित होणे ही अत्यंत अमोल देणगी भगवंताच्या कृपेनेच काहींच लोकांना प्राप्त होते. श्री. पाकणीकरांच्या काव्यातून त्याचा प्रत्यय अभंग वाचताना येतो. ही अमूल्य देणगी त्यांनी जन्मभर जपून ठेवावी एवढीच आमची इच्छा. माऊलीच्या कृपेने ती पूर्ण होईलच आम्ही फक्त त्यांचे अभिनंदन करू शकतो.'

२५-१२-९४

डॉ. वा. ना. पंडीत, संत गुलाबराव महाराज संप्रदाय.

**तात्पर्य**

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्म संस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥

'परित्राणाय साधूनाम' म्हणजे सज्जनांच्या पुण्यकर्मनिंच मी त्यांचा नाश करितो व 'विनाशायच दुष्कृताम्' म्हणजे दुष्टांच्या पाप कर्मानेच मी त्यांचा नाश करितो. स्वतः माझ्याकडून त्यांचा नाश होत नाही. म्हणून परमेश्वरांच्या ठिकाणी निर्दयपणाने व विषमपणानें वागण्याचा दोष राहू शकत नाही. परंतु भगवंत म्हणतात की, मी दाखविल्यावाचून माझी भक्ति स्थापन करणारा दुसरा कोणी जीव समर्थ नसल्यामुळें भक्ति मात्र मी स्वतः स्थापन करतो. म्हणून परमेश्वर निष्काम, निस्वार्थी व विश्वामधील सर्व प्राणीमात्रावर कृपा करणारा असे 'धर्म संस्थापनार्थाय' ह्या वचनाचा अर्थ. 'युगेयुगे' म्हणजे जेव्हां जेव्हां भक्त तीव्रसंवेगाने माझे स्मरण करतील तेव्हां तेव्हां.

'जगाच्या कल्याणा संताच्या विभूती'

ह्या सूत्राने परमेश्वर निरनिराळ्या ठिकाणी सद्‌गुरू रुपाने अवतार घेतात व सद्‌गुरू आपल्या भक्तांना (साधकांना) जीवाचे मूळ स्वरूप जो परमात्मा सर्वांच्या हृदयांमध्ये वास करीत आहे त्याचे ठायी ज्या सत्वगुणात रजोगुण व तमोगुणाचे मुळींच मिश्रण नाही त्या सत्वगुणाची वृत्ती कायम बहाल करून साधकास सर्व प्रकारच्या विषय सुखापासून निवृत्त करतात व प्रेमाच्या ओलाव्यातून सत्-चित्-आनंदाने परमेश्वराच्या चरणीं भक्तीने एकरूप करतात व साधकांचे अध्यात्मिक जीवन अपूर्ण न ठेवता परमेश्वराच्या ठिकाणी एकरूप करून जन्म-मरणाच्या फेऱ्यातून सोडवून पूर्ण करतात. आपणा सर्वांचे जीवन पूर्ण व्हावे हीच तळमळीची इच्छा.

'एथ एकचि लीला तरले । जे सर्वभावे मज भजले ।
तया ऐलीच थडी सरले । मायाजळ ॥

सद्‌गुरू कृपेने वरील जीवनाची अवस्था प्रत्येकांच्या जीवनांत येवो.

दोन महिन्यापूर्वी श्री. फणसळकर (माझे व्याही) यांनी ओंकार ट्रस्टच्या विश्वस्तांची ओळख करून दिली. संत ज्ञानेश्वर महाराज विशेषकांत विशेष सेवा करण्याची सुसंधी त्यांनी मला दिली.

शेवटी ह्या विश्वामधील अध्यात्माची वाटचाल करणाऱ्या सर्व साधक बंधू-भगिनींना, अध्यात्म प्रेमी लोकांना व माझे परमहंस सद्‌गुरू स्वामी माधवनाथांना वंदन करून माझ्याकडून अशीच संत ज्ञानेश्वर माऊलींची सेवा घडून जन्मोजन्मी सद्‌गुरू सेवेचा लाभ ह्या दासास व्हावा ही सद्‌गुरू माऊलीच्या चरणी 'संताचा सहवास नित्य घडत रहावा अशी प्रार्थना करतो.'

"ज्ञानेश्वर स्वामी माझा कृपावंत "
प्रेम राहो तेथ जन्म जन्म
॥ श्रीमत्सद्‌गुरूज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥
- हरिः ॐ तत्सत् -

संतचरणरज
माधवदास उर्फ अनंत केशव पाकणीकर
१२५ शुक्रवार पेठ, पुणे - ४११ ००२.

**सत्यसंकल्प अथवा विकल्प परमेश्वर आपल्या माध्यमातून करीत असतो. आपण मात्र सत्य संकल्पच परमेश्वराच्या माध्यमातून नित्य करावा. योग्य वेळी आपल्याला फळ मिळेलच.**

# श्रीमद् ज्ञानेश्वरीतील पसायदान

सुनील चिंचोलकर

स्थूल मानाने आध्यात्मिक ग्रंथांचे दोन प्रकार असतात. सकाम उपासनेचे ग्रंथ आणि मोक्षप्राप्ती करून देणारे ग्रंथ. सकाम उपासनेच्या ग्रंथात भौतिक लाभाच्या आशेने एखाद्या देवतेची स्तुती केलेली असते आणि त्या स्तुतीची फलश्रुती शेवटी दिलेली आढळते. मोक्षप्राप्तीच्या ग्रंथात तत्त्वज्ञानावर भर असतो आणि त्याची प्रत्यक्ष अनुभूती साधकांनी घ्यावी अशी अपेक्षा असते. अशा ग्रंथात आधिभौतिक फलश्रुती आढळत नाही, तर वाचकाने आपले जीवन प्रत्यक्ष बदलावे अशी ग्रंथकर्त्याची अपेक्षा असते. अशा ग्रंथ कर्त्याला ग्रंथाबद्दल स्तुती केली जावी असे वाटत नाही. उलट माणसाने आचरण करून आपले जीवन बदलावे अशी अपेक्षा असते.

ज्ञानेश्वरी हा तत्त्वज्ञानपर ग्रंथ आहे. पसायदान ही त्याची फलश्रुती आहे. ज्ञानेश्वरीतील अखेरच्या अध्यायातील १७९३ ते १८०१ या नऊ ओव्या पसायदान म्हणून ओळखल्या जातात. अनेक धार्मिक सभांमध्ये राष्ट्रगीतासारखा सन्मान पसायदानास मिळाला आहे. या नऊ ओव्या म्हणजे ज्ञानेश्वरीची फलश्रुती आहे. तत्त्वज्ञानपर ग्रंथांच्या फलश्रुतीचे एक खास वैशिष्ट्य आहे. ही फलश्रुती केवळ ग्रंथवाचनाने मिळत नाही. त्यासाठी साधकाला प्रयत्नपूर्वक आचरणात बदल घडवून आणावा लागतो. खरे म्हणजे स्वतःचे जीवन बदलण्याच्या या प्रयत्नांनाच साधना असे म्हणतात. हे जीवन बदलण्याची जबाबदारी त्या त्या व्यक्तीवर शंभर टक्के वैयक्तिक पातळीवर अवलंबून आहे. या कामी विशिष्ट मर्यादेपर्यंत सद्‌गुरु मार्गदर्शन करतील. पण साधकाने जीवनपरिवर्तन हे आपल्या प्रयत्नांनी आणि ईश्वराच्या कृपेने करवून घ्यावयाचे आहे. त्या दृष्टीने ज्ञानेश्वरीतील पसायदानाचा विचार करू.

आता विश्वात्मके देवे । येणे वाग्यज्ञे तोषावे ।
तोषोनी मज द्यावे । पसायदान हे ।।

संत ज्ञानदेवांनी पसायदानाचे हे मागणे, विश्वात्मक देवाकडून, याचा अर्थ समाजरूपी परमेश्वराकडून मागितले आहे. आचरणातला बदल समाजरूपी परमेश्वराकडून अपेक्षित आहे. खऱ्या अर्थाने सगळ्याच समाजाने हे पसायदान माऊलींना द्यावयाचे आहे. पण निदान ज्ञानेश्वरीच्या वाचकांकडून तरी या पसायदानाची विशेषत्वाने अपेक्षा आहे. जसे "क्रिया पालटे तत्काळ" ही दासबोधाची फलश्रुती प्रधानत्वे दासबोध वाचणाऱ्यांकडून अपेक्षित आहे. त्याप्रमाणे ज्ञानेश्वरीचा हा वाग्यज्ञ ज्याने ऐकला, वाचला अगर पाहिला त्याच्याकडून या परिवर्तनाची अपेक्षा आहे. ज्ञानेश्वरी हा वाग्यज्ञ आहे. ही वाणी साधकाला मौनात नेणारी आहे. हे शब्द वाचकाला निःशब्द करणारे आहेत. वाणीचे सार्थक या यज्ञाद्वारे साधले आहे. विश्वात्मक देव या शब्दाद्वारे ज्ञानेश्वरांनी समाजाला परमेश्वर संबोधले आहे. "जे जे भेटिजे भूत । ते ते मानिजे भगवंत ।" ही त्यांची भक्तीची व्याख्या. ते समाजाकडे पाहाताना म्हणतात. अशा समाजरूपी परमेश्वराकडून ज्ञानेश्वर माऊली पुढील मागणे मागते -

जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।
भूता परस्परे पडो । मैत्र जीवांचे ।
दुरितांचे तिमिर जाओ । विश्व स्वधर्मसूर्ये पाहो ।
जो जे वांछील तो ते लाहो । प्राणिजात ।।

या ठिकाणी लोकांकडूनच वागण्यात बदल व्हावा अशी अपेक्षा माऊली व्यक्त करते. संत दुष्टांचे निर्दालन करीत नाहीत तर दुष्टत्वाचे निर्दालन करतात. विसोबा खेचरांना त्यांचे खलत्व सोडून द्यायला ज्ञानदेवांनी भाग पाडले. माणसांचे परस्परांवर प्रेम असावे ही विश्व-बंधुत्वाची संकल्पना सर्वच संतांनी सर्वकाळ मांडली आहे. सामान्य माणसाला स्वतःहोऊनच सत्कर्माविषयी प्रेम वाटले पाहिजे. त्यालाच चांगले वागल्याचे महत्व पटले पाहीजे. लहान मुलाप्रमाणे मोठ्या माणसांकडून धाकदपटशा दाखवून सदाचरण करवून घेता येत नाही. त्यासाठी त्यांना आतुनच प्रेरणा व्हावी लागते. एवढे कायद्याचे राज्य असूनदेखील समाजात गुन्हेगारीचे प्रमाण वाढत आहे. रामराज्य याचा अर्थच असा की प्रत्येक माणसाला स्वेच्छेने चांगले वागावेसे वाटते. त्यासाठी मनातील पाप प्रवृत्तीचा अंधकार नाहीसा व्हावा व जीवनात स्वधर्मसूर्याचा उदय व्हावा. जगात प्रत्येक माणसाने आपल्या वाट्याला आलेले कर्तव्य प्रामाणिकपणे पार पाडले तर कोणताही संघर्ष निर्माण होणार नाही. ज्ञानदेव कर्तव्यपूर्तीलाच यज्ञ मानतात. त्यांच्या मते हा स्वधर्मयज्ञ अखंडपणे चालणारा नित्ययज्ञ आहे. तो जीवनयज्ञ आहे. अशा प्रकारे कर्तव्यपालन करणाऱ्या सत्प्रवृत्त माणसाच्या सर्व सात्त्विक इच्छा निश्चित पूर्ण होतील असा माऊलींना विश्वास वाटतो. या ठिकाणी "जो जें वांछील तो ते लाहो" मध्ये माणसाच्या इच्छा सात्त्विक आहेत असे गृहीत धरले आहे.

या नंतरच्या तीन ओव्यात माऊलींनी अशा मानवी समाजात संतांचे किंवा सत्पुरुषांचे स्थान कसे असावे याचे विवेचन केले आहे. त्यांच्या मते असे संत समाजात अल्पसंख्य असून चालणार

नाही तर आकाशातील ताऱ्यांप्रमाणे भूमंडळी अगणित संतांनी अवतार घेऊन मांगल्याचा वर्षाव या चराचर सृष्टीवर अविरतपणे करीत रहावा. माऊलींच्या मते संत कल्पवृक्षाप्रमाणे किंवा चिंतामणी प्रमाणे दुर्मिळ नसावेत तर कल्पवृक्षांची मालिका असावी किंवा गावागावांत चिंतामणी असावे तसे संत विपुल प्रमाणात असावेत. कल्पवृक्ष अचल असल्यामुळे त्याला साधकांपर्यंत जाता येत नाही. पण संतरूपी कल्पवृक्षाने साधकाचा शोध घेत तेथपर्यंत जावे आणि त्याच्या सत्संगाच्या अपेक्षा पूर्ण कराव्यात. चिंतामणी अचेतन असल्यामुळे तो फक्त चिंतानिवारण करील पण संतरूपी चिंतामणी साधकाच्या चित्तात चिंताच निर्माण होणार नाहीत अशी काळजी घेतील. संतांचा उपदेश हा सागराप्रमाणे विपुल आहे. मात्र समुद्राचे पाणी खारट असते, तसे संतांच्या वचनाचे नाही. त्यांची वाणी साधकाला संजीवनी प्राप्त करून देणारी अमृतवाणी आहे.

"शब्द जैसे कल्लोळ अमृताचे" असे माऊली म्हणते असे. संत चंद्र व सूर्यासारखे असतात. मात्र चंद्राचे आणि सूर्याचे दोष त्यांच्यामध्ये नसतात. चंद्र परप्रकाशित असतो तर संत स्वयंप्रकाशित असतात. चंद्राला सुखदुःखाच्या पौर्णिमा आणि अमावास्या असतात तर संत अखंड आनंदाच्या साम्राज्यात असतात. चंद्राला डाग आहे तर संत हे निर्वासन आणि निश्कांचन असल्याने निर्मळ जीवन जगणारे आहेत. माध्यान्हीचा सूर्य तापदायक असतो पण संतांचा ज्ञानरूपी सूर्य साधकाला कधीही तापदायक ठरत नाही. उलट संतांच्या ज्ञानसूर्याने साधकाचे अंतःकरण पूर्ण निवते. या ठिकाणी माऊलीने संतांबद्दल समाजपुरुषाला एक महत्वाची अट घातली आहे समाजाला असे संत सज्जन सोयरे म्हणजे प्रिय वाटले पाहिजेत. तुकाराम महाराज सत्पुरुष असूनही गावातल्या लोकांना प्रिय वाटले नाहीत. ज्ञानदेव पांडुरंगाचा अवतार असून देखील आळंदीतील लोकांनी त्यांना सुखाने जगू दिले नाही. तेव्हा संत विपुल असावेत, सर्वकाळ उपलब्ध असावेत आणि सामान्य माणसाला ते प्रिय वाटावेत. संत जर प्रिय वाटत नसतील तर जनसामान्यांच्या दृष्टीने ते असून नसल्यासारखे आहेत. कारण श्रद्धा नसल्यामुळे जीवनपरिवर्तनासाठी संतांच्या ज्ञानाचा जो लाभ जनसामान्यांना व्हावयाचा तो होणार नाही. म्हणून संतचरणी श्रद्धा-बुद्धी निर्माण होणे अतिशय महत्त्वाचे आहे.

शेवटच्या तीन ओव्यांमध्ये माऊली म्हणते –

"किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिंही लोंकी ।
भजिजो आदि पुरुखीं । अखंडित ॥
आणि ग्रंथोपजीवियें । विशेषीं लोकीं इयें ।
दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥
येथ म्हणेश्री विश्वेश्वरावो । हा होईल दानपसावो ।
येणे वरे ज्ञानदेवो । सुखिया झाला ॥"

संत बहुसंख्य असावेत; सहजोपलब्ध असावेत आणि समाजाला ते प्रिय वाटावेत ही माऊलींची संकल्पना केवळ आदर्शवादी नव्हे तर समाजाच्या दृष्टीने परमकल्याणकारी आहे. ज्या समाजरचनेत साधूसंतांना सन्मान प्राप्त होतो, तो समाज सर्व दृष्टीने सुखी होतो. तिन्ही लोकांत पूर्णत्व संपादन करून असा समाज अखंड आदिपुरुषाचे म्हणजे आपल्या मूळ स्वरूपाचे चिंतन करीत राहतो. आपण मूलतः ईश्वरस्वरूप आहोत ह्याचे साधकाला अखंड भान असले पाहिजे. संत साधकाला त्याच्या ह्या मूळ स्वरूपाची वारंवार आठवण देत असतात. मोठ्या कळवळीने समर्थ म्हणतात.

ऐक शिष्या येथेच वर्म । स्वयें तूंची आहेसि ब्रह्म ।
ये विषयी संदेह भ्रम । धरोंची नये ।

आपल्या या मूळ स्वरूपाचे अखंड भान साधकाला असले तर संत व्हायला साधकाला तरी किती वेळ लागणार! खरे म्हणजे हे संतत्व प्रत्येकाचा मूळ स्वभाव आहे. ग्रंथोपजीवियेमध्ये माऊलींना साधकाकडून हे संतत्व अपेक्षित आहे. ग्रंथ हेच साधकाचे जीवन व्हावे. याचा अर्थ ग्रंथातील विचार त्याच्या जीवनातून फुलावेत. तो साधकच चालतीबोलती ज्ञानेश्वरी व्हावा अशी अपेक्षा ग्रंथोपजीवियेमध्ये आहे आणि माऊलींची ही अपेक्षा आपण याच लोकी आणि याचा जन्मी पूर्ण करायची आहे. असे संतत्व प्राप्त करून घेताना आपला अधिभौतिक जीवनात पराभव होईल की काय किंवा भौतिक सुखाना वंचित व्हावे लागेल की काय अशी भीति साधकाच्या मनात निर्माण होण्याची शक्यता आहे. पण दृष्ट आणि अदृष्ट म्हणजे भौतिक आणि आध्यात्मिक या दोन्ही क्षेत्रांत साधक विजयी होतो. अशा साधकाला त्याच्या भावप्रवणतेमुळे ईश्वराची प्राप्ती तर होतेच पण वैभवही त्याच्या पायाशी लोळण घेते कारण ईश्वराबरोबर ही सारी भौतिक सुखे चालत येतात. ऐश्वर्य हा ईश्वराचा स्थायी भाव आहे. यश, कीर्ति, ऐश्वर्य या साऱ्या गुणांनी तो नटलेला आहे. म्हणून साधकाला भौतिक जीवनाची काळजी करण्याचे खरोखरच कारण नाही. अध्यात्मामुळे तुकाराम महाराजांसारख्या संताचे संसारिक नुकसान झाले हा जनसामान्यांनाचा गैरसमज असतो किंवा अज्ञान असते. तुकाराम महाराजांचे दारिद्य हा त्यांच्या प्रारब्धाचा फेरा होता आणि जेव्हा शिवाजीमहाराजांकडून संपत्ति चालून आली तेव्हा तुकोबांनी त्याचा स्वीकार केला नाही. भगवंतांनी त्यांना जे द्यायचे होते ते दिले होतेच. तात्पर्य, आपल्या मूळ ईश्वर स्वरूपाचे अखंड चिंतन करणाऱ्या साधकाला ईश्वराची शांति पण प्राप्त होते आणि ऐश्वर्य देखील प्राप्त होते.

पसायदानाच्या शेवटी समाजरूपी परमेश्वराने ज्ञानदेवांना आश्वासन दिले की तुम्ही म्हणता त्याप्रमाणे आम्हीं दुष्टत्व सोडून

देऊ, सत्कर्मविषयी प्रेम निर्माण करू, सर्व जीवसृष्टीवर मायेची पाखर घालू, पापप्रवृत्ति नष्ट करू, कर्तव्यकर्माचे निष्ठेने पालन करू, संतांचा योग्य तो सन्मान राखू, आमच्या मूळ स्वरूपाचे सतत भान ठेवू आणि ग्रंथोपदेश प्रत्यक्ष जीवनात उतरवू तेव्हां या आश्वासनामुळे ज्ञानदेवांना समाधान वाटले. आता हे उत्तरदायित्व तुमच्या आमच्यावरती आहे. प्रत्येक साधकाची ही जबाबदारी आहे. त्याने ही जबाबदारी पार पाडण्यात ज्ञानेश्वरांवर कोणते उपकार होणार नाहीत तर त्यात साधकातील अनुस्यूत संतत्व विलसित होणार आहे, तर ज्ञानेश्वरांचा वाग्यज्ञ सार्थकी लागणार आहे. केवळ ज्ञानदेवांचा वाग्यज्ञ नव्हे तर आजपर्यंत शब्दबद्ध झालेले जगातील सारे आध्यात्मिक वाङ्मय सार्थकी लागणार आहे. ज्ञानदेवांना हे पसायदान देण्याची, हे आश्वासन पूर्ण करण्याची आध्यात्मिक शक्ति पंढरीनाथाने आम्हाला द्यावी हीच त्याच्या चरणी प्रार्थना!

॥इति॥

सुनील चिंचोलकर
भागीरथी निवास,
शुक्रवार पेठ, पुणे - ४११ ००२.

## ज्ञानेश्वरी जन्मा आली

*उडावयाची शक्ति अजुनी पंखातच नाही आली*
*तोच विधीने घरट्याची ही वाताहातच केली ॥धृ॥*
*मायबाप हे निघून गेले*
*भावंडांना कुणी न उरले*
*पंख पिलांचे क्षण फडफडले*
*शून्यामधुनी तरिहि पिलांनी कशी उभारी धरली ॥१॥*
*एकामेका धीर देउनी*
*चालू लागले ते अनवाणी*
*परिस्थितीला गुरु मानुनी*
*वंद्य जगाला "ज्ञानेश्वरी" ती अशीच जन्मा आली ॥२॥*
*रेड्या मुखि का वेद बोलले*
*निर्जिव भिंतहि समोर चाले*
*समाधिसमयी विठ्ठल आले*
*आळंदीला ज्ञानाची ती गंगा अवतरली ॥३॥*

वि. आ. कुलकर्णी

With Best Compliments From

Sai Kripa Dairy
Wholesale supplier of milk
110, Krishna Kunj Society,
Near Old Poolgate,
Pune 411 001.
Phone : 665154

## समर्थ रामदास विरचित संत ज्ञानेश्वरांची आरती

कलियुगीं ग्रासुनि गेले सज्जन भवउष्णे ।
ते समयी अवतारा घेउनि श्रीकृष्णें ॥
तोजविले सज्जन त्या नाना प्रश्नें ।
तेणें निरसुनि गेले अज्ञान तृष्णे ॥१॥
जयदेव जयदेव जय ज्ञानदेवा
मंगल आरती करतो दे स्वपद ठेवा ॥धृ॥
गीतादेवी केली सोपी सकळांला ।
निर्जरगुरु परिसुनिया घोटिति मुखलाळा ॥
टीकारूपी घालुनि दासांला माळा ।
तेणें छेडुनि नेली अज्ञान ज्वाळा ॥२॥
करिता वाद द्विजांशी रेडा बोलविला ।
विप्रांचा गर्वनिधि तेणें कालविला ॥
अज्ञानांधःकार ज्ञाने घालविला ।
ब्रह्मज्ञाने मत्सरदीप मालविला ॥३॥
दासांचा सारथी म्हणवुनि मी तुजला ।
बाहता दीनदयाळा न पवसि कां मजला ॥
नुबंधिसी या मातें अज्ञविपिन मजला ।
दास म्हणे मम जीव हा तयोगीं बुजला ॥४॥


*With Best Compliments From*

**DHUPAR BROTHERS**

***Authorised Stockists***
***L & T Switchgear***
***Dhupar Electric Corporation***

***Authorised Stockists***
***Wipro Lighting, Deccan Cables***

*A/2/5 Karmayog Complex,*
*Opp. Dr. Beck & Co. Pimpri,*
*Pune 411 018.*
***—: Phone :—***
***Office : 777160 , Resi. : 681103***


## श्रीमत् ज्ञानेश्वरीची आरती

**कै. डॉ. रा. य. परांजपे**

(श्रीमत् भगवत् गीतेची आरती सर्वत्र प्रचारांत आहे. परंतु तशी ज्ञानेश्वरीची आरती आतापर्यंत प्रसिद्ध नव्हती. रत्नागिरी येथील एक भगवद्भक्त कै. डॉ. रा. य. परांजपे यांना ती स्फुरली.)

जय जय श्रीमत् ज्ञानेश्वरि अमृत सरिते ।
उजळिसि चिन्मय दीपा स्वयंप्रभाभरिते ॥धृ.॥
त्रिभुवन-पावनकारक गीतामृत झालें ।
अर्जुनव्याजें भगवद्वचनें जें प्रवलें ।
संत महंती प्राशुनि ज्याते गौरविलें ।
तेंचि ज्ञानेशकृपें तवरूपें नटलें ॥१॥
भवसागरतारक तूं अति अद्भूत तरणी ।
श्रवणें मननें पठणें होसी उद्धरणी ।
निजभक्तां योसंगी घेऊनि हे जननी ।
भक्तिसुधा पय पाजुनि निजविसी बुझवोनी ॥२॥
धर्माची तूं मूर्ती ज्ञानमयी निखिला ।
आरति करितां नुरविसि माया-मोह-मला ।
आत्मपदींची सोपरि कलिमल हर अमला ।
आत्मरामीं रमवुनि सुखमय करि सकलां ॥३॥


*With Best Compliments From*

**ASHWADEEP**

*S.T.D. / I.S.D. Tele Centre*
*Travel Centre*
*Ice Cream & Cold Drink Centre*

*5/17, Shree Sadaguru*
*Jangli Maharaj Society,*
*Senapati Bapat Road,*
*Pune 411 016.*
***Phone No. : 358312, 358861***